


V. S. चे मार्मिक, ऐतिहासिक लेख.

# द्वितीय गुच्छ.

धुंडिराज सदाशिव जोशी,
ह्यांनीं तयार केलें तें

पुणें, " जगद्धितेच्छु " छा० छा०.

सन १८९६ इसवी.

V. S. चे मार्मिक, ऐतिहासिक लेख!

# द्वितीय गुच्छ.

हें पुस्तक

ढुंडिराज सदाशिव जोशी वांईकर

ह्यांनीं तयार केलें तें

पुणें " जगद्धितेच्छु " छापखान्यांत छापिलें.

इसवी सन १८९६.

## प्रस्तावना.

V. S. च्या ऐतिहासिक लेखांविषयीं कित्येक महाराष्ट्रीय वाचकांनीं जी आदारबुद्धि दाखविली, प्रथम गुच्छावर उत्साह उत्पन्न करणारे जे उत्तम अभिप्राय दिले, त्यामुळें हा द्वितीय गुच्छ वाचकांपुढें मांडण्याची उमेद आली, हें लिहिण्यास आनंद वाटतो. अशा प्रकारचे लेख वाचकांच्या संग्रहीं असणें किती अगत्याचें झालें आहे, याचा विचार प्रथम गुच्छांत विस्तारानें झाला असल्यामुळें प्रस्तुत स्थलीं द्विरुक्ति करण्याचें प्रयोजन नाहीं. आणि हा द्वितीय गुच्छ वाचतांना वाचकांना हेंही कळून येईल कीं, ज्यांच्यावर विशेष टीका होणें जरूर, असे प्रसंग द्विरुक्तीचा दोष न यावा यास्तव कडक टीका न करितां नुसत्या दिशा दाखवून सोडले आहेत.

अलीकडे स्वराज्याच्या इतिहासाकडे पुष्कळ विद्वानांचें लक्ष लागलें आहे व चांगले चांगले लेखही प्रसिद्ध होऊं लागले आहेत ही संतोषकारक गोष्ट आहे. कारण ज्या देशानें आपल्या पूर्वजांच्या इतिहासाकडे नजर दिली, तो उन्नतीच्या मार्गाला लागला, अशा अर्थाचे उद्गार मोठमोठ्यांनीं काढलेले आहेत. स्वराज्यांतील कर्त्या पुरुषांच्या संबंधाचे जे लेख अनेकांकडून प्रसिद्ध केले गेले आहेत, त्यांत परस्पर विरोधी मतें असणें स्वाभाविक आहे. त्यांच्या संबंधानें या

लेखांतून विचार व्हावा असें कित्येक मित्रांनीं सुचविलें होतें. परंतु लेखकाला तसें करणें ह्मणजे कुस्तीचा चांगला आखाडा पडल्यावांचून बक्षिसांना मंदील काढण्याप्रमाणें वाटल्यामुळें, त्यानें परकीय इतिहासकारावांचून कोणावरच टीका केली नाहीं इतकेंच नव्हे, तर या गुच्छांत अपूर्व मुत्सद्दी नाना फडणवीस यांच्या कारकीर्दीचा पुष्कळ भाग आला असून, त्यानें नानांविषयी आपलें स्पष्ट असें मत देखील दिलें नाहीं. इतिहास हा विषय किती महत्त्वाचा आहे, किती गहन आहे व उपलब्ध असलेली स्वराज्याची ऐतिहासिक माहिती किती तुटपुंजी आहे याचा ज्यांनीं विचार केला असेल ते लेखकाच्या ह्या वर्तनाबद्दल त्याला दोष देणार नाहींत. हल्लीं इतिहासाकडे जसे प्रयत्न चालले आहेत तसें आणखी कांहीं वर्षें झाल्यावर व्यक्तिविचार करण्याचा लेखकाचा इरादा आहे. सिद्धिदाता परमेश्वर आहे.

मिळतील तितक्या दंतकथा जुळवायच्या हा या लेखकाचा यत्न आहेच. प्रथम गुच्छाच्या प्रस्तावनेंत वाचकांपैकीं ज्या कोणास दंतकथांचे माहीतगार असे वृद्ध गृहस्थ माहीत असतील त्यांनीं त्यांच्यापासून मिळतील तेवढ्या दंतकथा मिळवून आमच्याकडे पाठवाव्यात अशी सर्वांपाशीं प्रार्थना केली होती, त्या प्रार्थनेचा व्हावा तसा झाला नाहीं तरी कांहीं उपयोग झाला, हें लिहिण्यास संतोष वाटतो. हा द्वितीय गुच्छ वांचून वाचकांस दंतकथा मिळविण्याविषयींची स्फूर्ति अधिक होईल अशी आशा आहे. हे लेख लिहिण्याच्या संबंधांत ज्यांची आह्मांला मदत झाली त्यांचे आह्मीं आ-

भारी आहेत. प्रथम गुच्छांत रामाजी महादेवांनीं उं-
देरीचा किल्ला घेतला या संबंधाची एक दंतकथा लिहि-
ली आहे. तो किल्ला वसईजवळ नसून हबशाच्या मु-
लखांत आहे असें आमच्या एका वाचकांनीं कळविलें
याबद्दल आह्मी त्यांचे उपकार मानितों. हा गुच्छ छा-
पत असतां मजकूर वाढत चालल्यामुळें व शिवचरित्र
पूर्ण करायचें असा निश्चय झाला असल्यामुळें, कित्येक
लेखांतील कांहीं भागांची ऐन वेळीं छाटाछाट करावी लागली
याबद्दल वाईट वाटतें ! पण गरीबीपुढें इलाज नाहीं. प्र-
थम गुच्छानंतर हा द्वितीय गुच्छ छापण्यास जो एवढा
कालावधि लागला त्याचें कारण तरी गरीबीच होय. म-
ध्यंतरीं अकल्पित अशीं बरींच संकटें आलीं, परंतु त्यां-
ना मागें सारून ज्या जगदीशानें हा आजचा दिवस
दाखविला, तोच ही स्वीकारलेली स्वदेशाच्या इतिहासा-
ची सेवा पुढें चालविण्यास आह्माला शक्ति देईल व
वाचकांस वाचण्याची स्फूर्ति देईल, अशी बळकट आ-
शा आहे.

महाराष्ट्रभूचा नम्र सेवक

पुणें. } धुंडिराज सदाशिव जोशी
वांईकर.

# अनुक्रमणिका.

पृष्ठ.

अव्वलीराशरीर एकाराभळ पुनावलिन्

# मुरारराव जाधव.

स्वराज्यांत वेळोवेळीं तलवार-बहादुरी करून, त्याचें वर्धन करणारीं जीं बाणेदार मराठ्यांचीं घराणीं होतीं, त्यांतीलच जाधव हे एक प्रसिद्ध होत. पुण्याहून साताऱ्याला जो रस्ता जातो, त्यावर क्षेत्र वांईपासून सुमारें चार कोसांवर कृष्णेच्या तटाकीं भुइंज ह्मणून एक लहानसाच पण टुमदार व उत्तम हवेचा गांव आहे, तेथें अद्याप जाधवापैकीं कथानायकाच्या घराण्याचा वंश आहे. स्वराज्यांतल्या मोकासगिरी, जहागिरी, सरंजाम व तदंगभूत वैभव जरी आतां नष्ट दशेंत आहे, तरी महाभाग पूर्वजांच्या पुण्याईनें, या घरण्याची स्थिति अन्नाला मोताद अशी झाली नाहीं. सध्यांचे या घराण्याचे वंशज पूर्वींचा थोरपणा संभाळून ठाकुरकीनें आहेत.

इतिहासांत नमूद करून ठेवण्यासारखा या घराण्याचा संकलित इतिहास प्रकृतस्थळीं लिहिण्याचा उद्देश नसून, केवळ मुरारराव जाधव याची जी दंतकथा ऐकली आहे व पूर्वींच्या कागदपत्रांवरून जिची सत्यता दिसूं लागते, तिच्या संबंधानें लिहिण्याचाच जरी उद्देश आहे, तरी रायाजीराव जाधव या शूर शिपायाची वाचकांस ओळख करून दिल्यावांचून राहवत नाहीं. रायाजीराव हा सत्यप्रतिज्ञ शिपाई होता. त्याच्या विशाळ वक्षःस्थळांत दर्द ह्मणून कसलीच नव्हती.

तिरासारखा निसटून रिपुहृदयावर समशेर चालवायची, एवढें तो जाणत असे. त्याच्या वेळीं कर्त्या पुरुषांत छत्तिसाचे आंकडे पडले होते व ते इतके वाढत होते कीं, तक्तनशीन राजपुरुष अवतारी आहे असा बहुतेकांचा समज होता. तरी त्यांच्यांत पडलेले आढेवेढे स्वराज्याला अपाय करतील असें कैक वेळां हरघडीं वाटूं लागलें होतें. रायाजीरावाची गणना कर्त्या पुरुषांत होण्यासारखी होती, तरी तो होऊन पुढाकारानें या भानगडींत कधींच पडत नसे. शिवरायानीं स्थापन केलेल्या गादीची चाकरी करायची, ती मरेपर्यंत अढळ चालवायची, गादीवर बसणाराला देवाप्रमाणें मान द्यायचा, त्याच्याकरितां हातावर शीर घेऊन समरंगणांत उभें राह्यचें, त्याच्या शत्रूच्या नरडीचा घोट घ्यायचा, हें ब्रीद रायाजीराव जाधव याच्या नखशिखांत भरलें होतें. आणि शेवटीं तें राखण्याकरितांच कीं काय, त्यानें मोंगलाबरोबर लढत असतां आपला देह धारातीर्थीं ठेवला! छत्रपती शाहू महाराजांचा रायाजीरावावर जो विशेष लोभ होता, तो त्याच्या एकनिष्ठपणामुळें होता.

रायाजीरावाचा पुत्र, खंडेराव म्हणून होता. रायाजीरावाच्या शौर्याप्रमाणें त्याच्या शौर्याची ख्याति नव्हती. तरी तो शिपाईबाण्यानेंच होता. तथापि तो देवभोळा इतका, कीं सदोदित मुखानें रामभजन चालविणारा होता. त्याला दोन पुत्र होते. थोरला मुरारराव व धाकटा गोविंदराव. मुराररावाच्या शैशवांतच हा पुढें बांका शिपाई होणार, आपल्या आजाचें नांव

वाढविणार, अशीं अनुमानें त्याच्या बालक्रीडा पाहून जवळचीं मनुष्यें करूं लागलीं होतीं. पुष्कळ असेंही म्हणत कीं, रायाजीराव लढाईंत पडला, तेव्हां त्याच्या आशा राहून तोच हा जन्मास आला आहे. मुरारराव जसजसा मोठा होत चालला, तसतशी त्याची चपलता व मानीस्वभाव पाहून जवळच्या मनुष्यांचे तर्क दृढ होऊं लागले. मराठे सरदारांच्या मुलांना त्यावेळीं शिपाई शिक्षणापलीकडे दुसरें शिक्षण देत नसत. स्वदस्तुरची सही करायची बहुतेकांना माहीत नव्हती. पण मुराररावाची स्थिति अशी नव्हती. त्यावेळीं ब्राह्मण सरदारांच्या मुलांना जें शिक्षण देत, तें लहानपणीं मुराररावाला मिळालें होतें. मिळालेल्या शिक्षणानें मनुष्य सदसद्विवेकी, नीतिमान्, धर्मभीरु असा होतोच असा कांहीं नेम नाहीं! तारुण्याच्या भरांत व ऐश्वर्याच्या मदांत सुशिक्षणाचा शेणसडा झाल्याचीं उदाहरणें इतिहासांत पुष्कळ दिसतात, सध्यां अनुभवाला येत आहेत व भविष्यकाळींही झाल्यावांचून रहाणार नाहींत. परंतु मुरारराव जातीचा मराठा असून त्याचें आचरण शुचिर्भूत ब्राह्मणासारखें होतें. युद्धप्रसंगाखेरीज तो कधींही क्रूर व अविचारी नसे. हातोहातींच्या युद्धांत शेंकडों शिपायांचीं गर्दनें फोडणारा हा पुरुषव्याघ्र आहे, असा इतर प्रसंगीं कोणाला संशय येऊं नये, अशा प्रशांत वृत्तीनें मुरारराव राही. त्याची नीतिमत्ता नांव काढण्यासारखी होती. परधन व परकांता यांकडे तो वांकड्या नजरेनें पहात नसे. त्याला जेवढा मोकळा वेळ सांपडे, तेवढा तो ईशचिंतनांत व

ईशभजनांत घालवीत असे. वाड्यांत शास्त्री असे, त्याचें काम सायंकाळीं देवघरांत माईसाहेब, काकीसाहेब वगैरे वंदनीय वृद्ध स्त्रिया बसल्या असतां, त्यांना पुराण सांगण्याचें एवढेंच नव्हतें. मुराररावाला अध्यात्म विद्येचा भारी नाद असे. तत्कालीन मराठे सरदारांपैकीं पुष्कळांनीं संस्कृत स्फुट, अन्योक्ती वगैरे पांच पंचवीस श्लोक पाठ केलेले असत. कैकांची बोली इतकी राठ असे कीं, ते त्यांना शुद्ध रीतीनें म्हणतांही येत नसत. परंतु सारख्या तोलाचे चार मराठे सरदार एका बैठकीला जमले असतां, प्रत्येकजण आपला बहुश्रुतपणा व विद्वत्ता दाखविण्याकरितां भाषणौघाप्रमाणें त्यांचा उपयोग करी. मुरारराव अशांतला नव्हता. खंडेरावांनीं मुलाची ग्राहकबुद्धि पाहून घरच्या शास्त्र्यांकडून रूपावली, समासचक्र, अमरकोश, रघूचे कांहीं सर्ग वगैरे त्याला सांगितले होते. भारत, रामायण, देवीपुराण, गणेशपुराण इत्यादि प्रचारांतील पुराणें त्यानें लक्षपूर्वक ऐकलीं होतीं, व त्या संस्कारामुळेंच कीं काय त्याला अध्यात्म ज्ञानाची गोडी लागली. प्रत्येक दिवशीं दोन घटका मुरारराव शास्त्र्याबरोबर अध्यात्म विषयावर सस्पृह भाषण करीत असे. पहाटेस तालीम व सायंकाळीं आवडीच्या घोड्यावर बसून फेरफटका हा नित्याचा क्रम असेच. तरी तो महिन्यांतून एकदोन वेळ चार आठ दिवस शिकारीला जात असे. परंतु त्याची शिकार व्यर्थ गरीब सावजें मारण्याकरितां नसे. करावी तर पटाईत वाघाची शिकार करावी, असें तो म्हणे. नेहमींच असले वाघ

मरायला कोठचे येणार ? व आले अशी कल्पना केली, तरी त्यावेळीं सध्यांच्या आपल्या मायबाप सरकाराप्रमाणें रयतेपासून शस्त्रें हिसकावून घेतलेलीं नव्हतीं. आतां जितकी हिंस्रपशूंपासून रयतेची हानी होत आहे, तितकी त्यावेळीं होत नव्हती. गांवचें एकादें वांसरूं वाघानें पटकावलें असें कळतांच, गांवांत जे शिपाई म्हणविणारे असत, ते गांवठाणाच्या भोंवतालच्या त्याच्या रहाण्याच्या जागा धुंडाळून धैर्य नसल्यास बंदुकीला व असल्यास आपल्या तलवारीला त्याचा बळी घेत. अशा स्थितींत मुराररावाला नेहमीं पटाईत वाघाची शिकार करायला कोठून मिळणार ? महिन्यांतून दोन वेळ नियमानें शिकारीला जाण्यांतला त्याचा हेतु, पुष्कळ व्यायाम व्हावा व चांगली कसरत व्हावी एवढाच होता. गोरगरीब, पंगू, दुर्बल अशांची तर्तूद व विद्वज्जनप्रशंसा हा त्याचा बाणा होता. थोड्यांत सांगायचें म्हणजे तत्कालीन थोर कुलांतल्या ब्राह्मणांना ओषाळविणारें त्याचें आचरण होतें. भाषादेवीचे सेवेकरी, एकदां एकाद्या व्यक्तीवर प्यार झाले, कीं त्या व्यक्तीला सद्गुणखनि बनवितात हें खोटें नसेल. परंतु सद्यःप्रसंगासंबंधानें पहातां, दंतकथेवर कितपत विश्वास ठेवावा या विषयींचा संशय अरबासारखा पहाऱ्यावर खडा असल्यामुळें मुराररावाचें यथातथ्य वर्णन करितांना लेखणी चांचपडत चालली आहे ! मुराररावाच्या स्पृहणीय शुद्धाचरणाविषयीं वर जें लिहिलें आहे, तें अपुरें आहे इतकें वाचकांनीं ओळखिलें ह्मणजे पुरें आहे.

सवाई माधवरावांच्या कारकिर्दींत, कारकुनीचें जवाद कसब पुढें येऊन त्यानें अहंताभावानें जवानमर्द मराठे गड्यांचा पाणउतारा व कुचमणूक केल्यामुळें, ते कांहींसे बेदील झाले होते. पानपतच्या महानाशाच्या अगोदर महाराष्ट्रांतील सरदार, दिम्तहुजूर, पागे पथकी यांची जी तयारी होती, ती या लेखणीच्या कारकिर्दींत नव्हती. कैकांचे सरंजाम व जहागिरी, ( आतां यांची काय गरज आहे अशा समजुतीनें ) जप्तींत गेल्यामुळें, त्यांच्या पदरच्या लढाऊ शिपायांत, ज्यांच्या जमिनी होत्या त्यांनीं नांगर धरले व ज्यांना कांहीं आधार नव्हता त्यांनीं गोसावी व पेंढार माजविलें ! प्रत्यक्ष गादीशेजारीं असणाऱ्या बिनिवाले व पानशे यांना राज्यकर्त्या लेखणीनें बेदील केलें होतें. तरी ती चाणाक्ष होती. पेशव्यांची दर वर्षीची स्वारी तिनें मागें पडूं दिली नव्हती. सारांश महाराष्ट्रांत पूर्वी इतके शिपाई नव्हते, म्हणून सगळेच कमी केले होते असें नाहीं. किल्यांच्या संबंधांत मात्र लाजिरवाणा प्रकार झाला होता. आणि यामुळेंच दिवस जाऊन रात्र यावी, तशी हं हं ह्मणतां पेशवाईला काळरात्र आली असें कित्येक वृद्धांचें ह्मणणें आहे ! सगळे किल्ले पूर्वीप्रमाणें शत्रूबरोबर झगडायला तयार असते, तर काय बिशाद होती भित्र्या बाजीरावाला इंग्रजांच्या हातीं जाण्याची वांछा होती व एका दिवसांत पेशवाईची इंग्रजी होती ! किल्ल्याच्या रक्षणाला लोक नाहींत, वर शस्त्रें नाहींत, तोफा नादुरुस्त, दारूगोळा नाहीं, अन्नाची सामुग्री नाही, अशी बहुतेक स-

वेत्र स्थिति होत आल्यामुळें, राज्यक्रांति नाटकांतला पडदा उघडण्याप्रमाणें झाली, असें बऱ्याच लोकांचें ह्मणणें आहे. असो. मुरारराव जाधव यांची मिळकत जप्तींत गेलेली नव्हती, ते पेशव्यांच्या चाकरींत होते. दर वर्षीं दसरा झाल्यावर पेशव्यांचें सैन्य मुलुखगिरीला निघायचें, त्याबरोबर जाण्याकरितां मुरारराव पुण्यास येत. या जाधवांच्या गोटाची जागा पर्वतीखालीं आहे.

मुराररावाच्या अंगांत बहुतेक त्याच्या आजाचे गुण होते. पुढें पुढें करून आत्मश्लाघेचे प्रसंग आणणें त्याला आवडत नव्हतें. सरकारची येईल तेवढी अंगचोरपणा न करितां चाकरी करायची, हें तो विशेष जाणत असे. मेजवान्या, नाच, रंग यांपासून होईल तितकें करून तो दूर असें. कांहीं म्हणण्यासारखें विशेष काम नसतां याच्याकडे भेटायला जा, त्याच्याकडे भेटायला जा, हें मुराररावाला मनापासून नकोसें होतें. त्याचे कांहीं ठरावीक स्नेही व आप्त होते त्यांजबरोबर मात्र त्याचें रहस्य चालें. त्यांच्यापासूनच त्याला दरबारच्या भानगडी समजत. एके दिवशीं त्याच्या त्या ठराविकांपैकीं एक भेटायला आला. त्याला येतांना मुराररावाच्या माणसांपैकीं ज्यांनीं ज्यांनीं पाहिलें, त्यांनीं त्यांनीं हे आज कांहीं विशेष बातमी घेऊन आले आहेत, हे त्याच्या फिरलेल्या चर्येवरून जाणलें. तो जों आला तों मुराररावाला एकीकडे घेऊन गेला. ह्यानें मुराररावाच्या माणसांच्या तर्काला अधिक बळकटि आली व ते आपापल्यापरी गुप्त भेटीचें कारण शोधूं लागले. बाहेर नाना प्रकारचे तर्क निघूं लागले, पण तिकडे

आपल्या धन्याला पूर्वीं कधीं आला नाहीं इतका क्रोध आला आहे, लाल झालेल्या लोखंडाप्रमाणें त्याचा देह तापून गेला आहे, हें कोणाच्याही ध्यानीं आलें नाहीं.

नागाच्या शेपटीवर पाय पडला असतां किंवा त्याला दुखविलें असतां, तो जशा फणा आपटून फूत्कार टाकूं लागतो, तशा प्रकारचा त्वेष मुराररावाला, त्याच्या मित्रानें जें त्याला सांगितलें त्यानें आला. त्याचे डोळे लाल झाले. उच्छ्वास जोरानें बाहेर पडूं लागले. तो दांत ओंठ खाऊं लागला. ब्रह्मांडाला आग लावीन, आकाशपाताळ एक करीन, प्रत्यक्ष यम आपलें उग्र रूप धारण करून आला तरी त्याला भिणार नाहीं, अशी अपूर्व वीरश्री मुराररावाच्या अंगांत संचरली. त्याची वृत्ति नेहमीं शांत असायची, पण तिचा मागमूस देखील उरला नाहीं. केव्हां जाऊन नरडीचा घोट घेईन असें त्याला होऊन गेले. त्याला अशक्यता अशी कोठेंच दिसेना. ही सहन करण्याची गोष्ट नव्हे, सूड हा घेतलाच पाहिजे, तरी घाई व अविचार कामाचा नाहीं, तुम्ही आतां शांत व्हा; याची भरपै करून घेतल्यावांचून आपण राहणार नाहीं; असें मुराररावाच्या मित्रानें जातेवेळीं सांगितलें होतें. पण मुराररावाला जो त्वेष चढला होता त्यावर शांतीची छाप बसावी इतक्या तो भुसभुशीत पायावरचा नव्हता. सध्यांच्या काळीं त्या त्वेषाची साम्यता दाखविणारा त्वेष हिंदु कुलांत दृष्टीस पडेल याचें नांवच घ्यायला नको ! पावसानें भिजविलें, नवऱ्यानें मारलें, तर फिर्याद कोणाकडे न्यायची ? व रागावायचें तरी बाई कोणावर ? अशा अ-

र्याची एक म्हण बायकांच्या बोलण्यांत येत असते, तिचा दीनवदनानें उच्चार करणें हाच या काळचा त्वेष ! मुराररावाला ज्या गोष्टीनें अपरिमित त्वेष चढला, तशी गोष्ट सध्यां झाली तर आधुनिक वीर ह्मणायला लागायचें कीं, गोष्ट होऊं नये ती होऊन गेली, आतां तिच्यापासून आपला कांहीं फायदा होत असला तर तो तरी करून घ्यावा ! हा अशा प्रकारचा लाजिरवाणा नेभळेपणा एका शतकाच्या आंत आमच्यांत कसा आला, याचें राहून राहून सखेदाश्चर्य वाटतें ! मुराररावाला जो संतापविषय झाला, त्याचा सूड हलका नव्हता. वर जो मुराररावाला भेटायला आला म्हणून सांगितलें, तोंही कांहीं रडव्या तोंडानें येणारा निरोप्या नव्हता, शिपाईच होता. पण करतो काय; श्रीमंतांच्या खजिन्याला किंवा जिवाला जितका पहारा, तितकी किंवा त्याहून कांकणभर अधिक सूड घेण्याची जागा कडेकोट पहाऱ्यांतली ! ! त्याच्यावर झडप टाकायची, ह्मणजे दीपपतंग न्यायाचें जगाला उदाहरण दाखविणें आहे, हा शरीरांतील धमन्या मंदवाही करणारा विचार मनांत यायला अवसर द्यायचा नाहीं ही शपथ घेऊनच कीं काय, मुराररावानें जामानिमा करून आपली यशस्विनी तलवार तिचें वंदन करून हातांत घेतली व देवघराची वाट धरली. परंतु अर्ध्याच वाटेंतून तो मागें परतला, आणि त्याची हत्यारें ठेवण्याची जी जागा होती तिकडे गेला. त्यानें तेथून त्याच्या आवडीचीं लहान लहान हत्यारें दोन चार घेतलीं व तीं लोकांना न दिसतील अशीं पोषाखांत दडवून ठेवलीं. मग तो देवघरां-

त गेला. तेथें साष्टांग प्रणाम करून वर जों तो उठतो तों खिन्नतेनें इतकें गांठलें, कीं प्रभूपाशीं काय प्रार्थना करायची याचाही त्याला क्षणभर विसर पडला. भक्कम गहिंवर आला. पण मुारराव जाधवाच्या घराण्यापैकीं खऱ्या खऱ्या शिपायांतला एक असल्यामुळें, ठिणग्या टाकीत असलेल्या अत्युग्र झालेल्या त्याच्या नेत्रांनीं गहिंवराच्या महापुराला अमर्याद होऊं दिलें नाहीं. तरी मुारराव मनांत खजील झाला. एकपरि हा शुभ शकुन नव्हे असेंही त्याच्या मनानें घेतलें. ह्मणून त्यानें आपला निश्चय ढळूं दिला नाहीं. मनांतल्या मनांत थोडक्यांत प्रभूची प्रार्थना करून त्यानें देवघर सोडलें. बाहेर पडतां पडतां जमादारांस, येथें असलेल्या सर्व लोकांनीं एकेक शस्त्रांनिशीं माझ्या पाठीवर कांहीं अंतरावर असलें पाहिजे अशी जरबेची मुाररावानें ताकीद दिली, व हा मीं चाललों असें सांगितलें. आणि वास्तवीकच तो तेथून लागलाच बाहेर पडला.

मुाररावाच्या त्या वेळच्या स्थितींत त्याच्या बरोबर, मी व वाचक जाऊं, ही गोष्ट मनांत आणायला नको. त्याच्या बरोबर चालण्याला शक्ति नाहीं, व ती छातीही नाहीं. दहा हजार असलों, तरी पोलीसनें दस्त्याचें नांव काढतांच मुलूख वैराण करून घराचीं दारें लावून, अडसर, कडी, कुलूप घालून, कुकूचकू करणारे आपण अशा खुनी मनुष्याबरोबर जाऊं कीं कसें, हें आपलें आपल्याला माहीत. चोर चोरी करून गेल्यावर मग पोलीसला अर्ज द्यायचा ! चोराला धरण्याचा प्रयत्न केला आणि आवेशांत कांहीं कमजास्त प्रकार

झाला तर न बोलावतां पोलीस घरीं येतें. व वेळेनुसार अंदमान पहाण्याचा प्रसंग येतो हें आपण कसें विसरूं? बायको दुराचारी निघाली, तर तिला बोट लावायचें नाहीं; ( मग जाराच्या पाठीवर वेताचे फोंक उठविण्याची बात कशाला? ) शिक्षाच करायची असल्यास फरासखान्यांत जावें; या किस्त्याचें आपल्याला वळण लागलेलें, त्या आपल्याला मुरारराबाबरोबर चार पावलें तरी जाववेल का ? असो. मुरारराबाच्या पाठोपाठ त्याच्या जिवाला जीव देणारीं दहा पांच माणसें गेलीं.

मुरारराव या निकराच्या तयारीनें कोणाचा कंठनाळ चिरण्याकरितां गेला व त्याच्या क्रोधाचें कारण काय, हें समजून घेण्याची वाचकांची जिज्ञासा प्रबल झाली असेल. परंतु त्याच्या क्रोधाचें कारण संशयित आहे तें सांगणें मला बरें वाटत नाहीं; व तें ऐकण्याचा वाचकांनींही आग्रह धरूं नये. मुराररावाला पेशवाईचा त्या वेळचा कर्णधार नानाफडणवीस याचा इतका तिटकारा आला व त्याचाच अंत करण्याच्या निश्चयानें त्यानें त्याच्या वाड्याची वाट धरली ! मुराररावाला नानाच्या वाड्यांत जायला मना कोण करणार ? तो तडक वाड्यांत शिरला. नानाचें शहाणपण, त्याची हुषारी, त्याची दक्षता माहीत नाहीं असा पुरुष महाराष्ट्रांत तरी नसेल. ज्याला प्रत्यहीं सर्व हिंदुस्थानांतल्या बातम्या समजत असत, तो नाना आपल्या वाड्यांत कोण आला, कोण गेला, हें दिसण्यासारख्या जागीं बसत असे हें सांगितलेंच पाहिजे असें नाहीं. मुरारराव त्याच्या वाड्यांत शिरला त्यावेळीं नाना त्याच्या सु-

दैवानें त्या जागीं होता, यामुळें मुराररावाकडे तेव्हांच त्याची दृष्टि गेली. त्यावेळची त्याची चर्या पाहिल्याबरोबर शहाण्या नानानें, हा दुष्ट हेतूनें आला आहे हें जाणलें. मुराररावाचें शौर्य नानाला पक्कें माहीत होतें. यावेळीं मुराररावाला धरविण्याचा आपण प्रयत्न करविला, तर तो आपल्या वाड्यांत कितीक मुडदे पाडील त्याचा नेम लागणार नाहीं, आणि शहरांत लोक बरे वाईट हजारों तर्क करतील; त्यापेक्षां आतां मुराररावाच्या नजरेस न पडतां आपण वाड्यांतून निसटून जावें हें बरें; असा विचार करून नाना तत्क्षणीं वाड्यांतून नाहींसे झाले. मुराररावानें वाड्यांत पुष्कळ चौकशी केली व सर्व वाडा मनगटाच्या जोरानें धुंडाळला, पण त्याला नाना सांपडला नाहीं.

कल्पना केल्याप्रमाणें मुराररावाची शिकार त्याला साधली नाहीं, तेव्हां मात्र तो सर्द झाला. त्याचा क्रोध व आवेश आपोआप निमाले; इतकेंच नव्हे, त्याला स्वतःच्या प्राणांची भीति वाटूं लागली. आपण अविचारानें फार घाई केली असेंही त्याला वाटूं लागलें! मग तेथून तो निमूटपणें आपल्या जागीं आला. परंतु सूड घेण्याच्या विचारांची व त्याची अगदीं फारकत झाली. नाना आतां आपले पाय भुईला लागूं देणार नाहीं, केव्हां घात करील याचा नेम नाहीं, अशा विचारांनीं त्याच्या मनमंदिरांत गर्दी उडविली. मुरारराव मानी शिपाई, त्याला पुढें होणारा अपमान मूर्तिमंत दिसूं लागला. जेथें आपण मोतीं वेंचलीं तेथें नाना आपल्याकडून शेणी वेंचायला लावील हें मुराररावाला पुरें कळून

चुकलें. परछत्राचा अवलंब करण्याचें मुरारराव मनांत आणता तर अशा प्रकारचें भय पुढें येऊन उभें राहण्याचा संभव नव्हता. त्याला कोणीही हांसत त्याच्या पथकासह चाकरीला ठेवला असता. परंतु हा शूर मराठा शिपाई तशा अधम कोटींतील नव्हता. क्रोधावेशांत आपण जें कृत्य करण्याचें मनांत आणलें तें तडीस गेलें नाहीं याबद्दल तो थोड्याच वेळानें ईश्वराचे अनंत उपकार स्मरूं लागला. नाना शहाणे आहेत ते झाल्या गोष्टीची मरेपर्यंत ओळख देणार नाहींत असेंही त्याच्या मनांत येऊं लागलें. तथापि मुरारराव मानी स्वभावाचा; तो अशा ओषाळगतींत कोठचा राहणार ? कोणाला कळूं न देतां मुराररावानें स्वदेशाला शेवटचा रामराम ठोकण्याचा निश्चय केला व तो लागलींच अमलांत आणला ! मुरारराव जाधव नाहींसे झाले असें जग बोलूं लागलें !

ही मुराररावाची दंतकथा सध्याची आपली स्थिति लक्षांत आणतां खेदजनक ठरते ! एका शतकाच्या परिभ्रमणांत आपल्या समाजाला किती तरी भिन्न स्वरूप प्राप्त झालें ! न्याय, नीति, सदाचरण, सद्धर्म यांच्या रक्षणाकरितां जिवावर उदार होणाऱ्या महात्म्यांच्या वंशांत, न्यायाला हरताळ, नीतीच्या गळ्याला फांस, सदाचरणावर कृष्णवस्त्राचें आवरण व सद्धर्माची राखरांगोळी होण्याची वेळ आली तरी मैंदासारखे बसणारे आपण जन्मास तरी कसे आलों याचें राहून राहून सखेदाश्चर्य वाटतें ! वाचकहो, आपले पणजे निपणजे यांच्या काळीं मुराररावासारखीं माणसें पुष्कळ होतीं.

आणि म्हणूनच त्या काळीं स्वराज्याचें अनुपम सुख प्राप्त झालें होतें. स्वराज्याच्या बळकटीकरितां प्रतिज्ञा-भंगाचें पातक शिरावर घ्यायचें, अंगांत मनस्वी रग असतां अनेकांच्या सुखाकरितां स्वतः पड घ्यायची हें या दंतकथेचें सार प्रियवाचकांनीं अक्षय मनांत वागवावें व मुराररावं जाधवासारख्या महात्म्यांचें अनुकरण करण्याची हाव धरावी एवढें शेवटचें अगत्याचें सांगणें आहे.

---

# दाजीसाहेब घोरपड्यांचा फितूर.

पेशवाई कळसाला आली त्यावेळचा हा फितूर आहे. हा झाला नसता तर कुंजवनांतील कृष्णलीला करणाऱ्या, पितृतर्पणाला पायली पायली तीळ खर्चणाऱ्या, दातृत्वांत कर्णाशीं स्पर्धा करणाऱ्या, बेविश्वासी, भ्याड रावबाजीनीं पेशवाई कायम ठेवली असतीच, असें कांहीं ह्मणतां येत नाहीं. अशा पाजींच्या हातून राज्यसत्ता निखळून पडून शहाण्या ह्मणविणाऱ्या इंग्रजांच्या हातीं गेली, महाराणी सरकारचें शांततेचें निशाण फडकूं लागलें, ह्मणून या फितुराला वाटलें तर फितूर ह्मणूं नये. पण ज्याला हिंदुस्थानचा सविस्तर इतिहास लिहिण्याचें सामर्थ्य असेल, त्यानें या घोरपड्याच्या कृतीचा उल्लेख करून त्याला फितूर ही संज्ञा दिलीच पाहिजे. प्रभुपक्षाकडे या दंतकथेचा शिंतोडा जातो, ह्मणून लिहिण्याचें जिवावर येतें, अति वाईट वाटतें ! परंतु दंतकथांचा होईल तितका जीर्णोद्धार करायचा, हें व्रत स्वीकारलें असल्यामुळें नाइलाज आहे. आणि ज्याचा परिणाम चांगला, तें वाईट असलें तरी चांगलेंच. दाजीसाहेब घोरपड्यानें नीचपणानें फितूर करून आपल्याला झोटिंगपाछाईच्या हवालीं केलें नाहीं, तेव्हां त्याच्या फितुराला गोडवा फितूर असें ह्मणायला आपलें काय वेंचतें ? आणि त्यानें आपल्यावर थोर उपकार केले असें तरी कां न ह्मणावें ?

इंग्रजबहादूर, शिंदे, होळकर, नागपूरकर भोसले वगैरे उत्तरेकडच्या पेशवाईच्या आधारस्तंभांना जागच्या जागीं जखडून टाकून केवळ पेशव्याच्या राशीस लागले, त्यावेळीं ते स्वपरबलाबल ओळखून होते. बाजीरावाच्या रंगडच्या तेंव्हांच जिरवूं व राज्यसत्ता छिनावून घेऊन त्याच्या प्रजेला दिपवून सोडूं, ही त्यांना खात्री होतीच. आपल्या कवाइतीसैन्यापुढें, व आपल्या गोळीबारापुढें बाजीरावाच्या सैन्याच्यानें घटकाभर दम धरवणार नाहीं, हेंही इंग्रजांना पक्कें कळून चुकलें होतें. परंतु ससाच्या पारधीला वाघाच्या शिकारीच्या तयारीनें जायचें, हें धोरण त्यांचें बळकट असल्यामुळें दाजीसाहेब घोरपड्याच्या बुद्धीला त्यांनीं भ्रंश पाडला असावा असें या दंतकथेवरून दिसतें. आणखी या वेळासंबंधानें लिहितांना बखरीकार असें ह्मणतात कीं, "इंग्रजांचा फितूर सगळ्या सरदारांत जाहलेला. कोणी इंग्रजांचा पैका खाल्याशिवाय राहिला असें नाहीं." या संबंधांत इंग्रजी ग्रंथांचा आधार मिळत नाहीं व तो न मिळावा हें धोरणी राज्यकर्त्यांच्या व्यवहारदक्षतेला उचित आहे. असो.

घोरपडे हे पहिले कोल्हापूरकरांच्या पदरचे, बाजीरावानें यशवंतराव घोरपड्याला रिसालदार केलें. यशवंतरावापाशीं एक यवनी रखेली होती. तिच्यावर यशवंतराव अगदीं आषक होता. दाजीसाहेब त्या यवनीपासून झाला. हा यशवंतराव घोरपड्याचा दासीपुत्र त्याच्याप्रमाणें शूर होता. परंतु यशवंतरावाच्या अंगीं जी स्वामिभक्ति होती, ती दाजीसाहेब दासीपुत्र अस-

ल्यामुळेंच कीं काय, त्याच्या अंगीं नव्हती. यशवंतरावाला नकळत तो इंग्रजबहादुरांच्या नादीं लागला. राज्यक्रांति करायच्या वेळीं, कपटकारस्थानें रचणारे मुत्सद्दी जरी स्वभावानें कृपण असले, तरी तोंडच्या वाफा सोडण्यांत मोठे उदार होतात. दाजीसाहेबासारख्या सिधा वारस नसणाराला, त्या अघळपघळ वाफांचा मोह सुटावा हेंही स्वाभाविक आहे.

घोडनदीपाशीं कारेघाट या नांवाचा एक लहानसा घाट आहे. या घाटाच्या पलीकडे पेशवाई निर्मूळ करण्याकरितां निघालेलें इंग्रजबहादुरांचें सैन्य होतें. घोरपड्यांचा रिसाला घाटाचें तोंड धरून उभा होता. इंग्रजबहादुरांच्या सैन्यानें घोरपड्यांच्या रिसाल्याची फळी फोडून घाट उतरून अलीकडे येण्याची जोराची खटपट चालविली होती. रावबाजी स्वतः भ्याड होते. पण त्यांच्या अन्नाचे सगळेच लोक कांहीं तसे नव्हते. इंग्रजांच्या शिकलेल्या व अत्यंत टापटिपीच्या सैन्याबरोबर चार हात करण्यासारखे पेशवाईचा कळस होण्याच्या वेळींही, पेशव्यांच्या पदरच्या सेनेंत लोक होते. ब्राह्मण योद्धा बापू गोखले यानें ज्याप्रमाणें कांहीं वेळ इंग्रजबहादुरांच्या सैन्यास विश्वस्वरूप दाखविलें, तोच प्रकार कारेघाटांत चालला होता. मराठा योद्धा यशवंतराव यानें आपल्या रिसाल्याकडून घाटाचें तोंड असें दाबून धरलें होतें कीं, इंग्रजबहादुराच्या सैन्याला एक पाऊल पुढें येतां येईना. त्यांनीं आपली शिकस्त चालविली होती. पण यशवंतरावानें आपल्या रिसाल्याला एक पाऊलभरही मागें सरूं दिलें नाहीं.

परंतु एके रात्रीं दाजीसाहेब घोरपडे आपल्या रिसाल्यांतील लोकांना तो पहा, पलीकडच्या डोंगरांतून पेटलेल्या मशालींचा उजेड पडला आहे, व त्या मशाली स्थिर नाहींत, पळताहेत, असें दाखवूं लागला. रिसाल्यांतील पुष्कळ लोकांनीं हा प्रकार पाहिला, परंतु आडरानांत, डोंगरांत, रात्रीच्या मशाली पाजळलेल्या कां दिसत आहेत, याबद्दल कोणाचा कांहीं तर्क चालेना ! या डोंगरांत भुतावळ उठली असेल, असेंच रिसाल्यांतील पुष्कळ लोक म्हणूं लागले, व कित्येक तर आपापल्या अनुभवाच्या भुतावळीसंबंधाच्या गोष्टी सांगूं लागले. ते, आपल्याला जो प्रकार दिसत आहे, तो भुतावळीवांचून दुसरा नाहीं असा इत्यर्थ ठरवूं लागले. आपल्या रिसाल्यांतील लोक जी कल्पना करतील असा दाजीसाहेब घोरपड्यांना भरंवसा होता, ती कल्पना कोणींच काढिली नाहीं व जो तो भुतावळीची कल्पनाच खरी ह्मणूं लागला, हें पाहून दाजीसाहेबांनीं आपल्या अंगांत कांहीं विलक्षण आवेश आणला. ते ह्मणाले,—गडे हो, तुह्मी काय वेडे आहांत ! बाबानों, ही भुतावळ नव्हे. या तुमच्या हातावर तुरी आहेत. तुह्मी या घाटाचें तोंड धरून असेच बसा ! टोपीवाल्यांचीं पलटणें आपल्यापुढें सहा कोस गेलीं असें तुह्मीं उद्यां ऐकाल. हें दाजीसाहेबांचें भाषण ऐकून रिसाल्यांतील एक ह्मातारा नाईक म्हणाला,—छोटेसरकार साहेब तुमचा तर्क काय या घाटांतून रस्ता मिळेना, ह्मणून टोपीवाले त्या डोंगरांतून चालले असा आहे ? दाजीसाहेब ह्मणाला,—ह्मातारीं माणसं याकरितां पाहि-

नेत. माझा तर तर्क असा आहे आणि तो अक्षरशः खरा आहे. टोपीवाले एकाच मार्गावर अवलंबून बसणारे नाहींत. एक नाहीं तर दुसरे दहा मार्ग ते काढल्यावांचून राहत नाहींत. आपण त्यांना या वाटेनें खास अलीकडे येऊं देत नाहीं, अशी त्यांची खात्री झाल्यावर त्यांनीं त्या डोंगरांतून मार्ग काढला असावा, असें मला वाटतें. ते असें केल्यावांचून रहाणार नाहींत.

तो ह्मातारा नाईक पुढें सरून ह्मणाला,—छोटेसरकार, तुमच्यासारख्या मुलांनीं ह्मातार्‍यांचे उपदेश ऐकत बरीं रहावें. यावेंसेंच वाटलें, तर मुकाट्यानें बसावें. तुह्मीं पळत्या मशाली दाखविल्यात, तें नीट; पण पुढें जो तर्क केलात, तो अगदीं चुकीचा. अजून मराठे शिपाई सगळे मेले नाहींत. त्या पळत्या मशाली जर त्या हडेलहप्पांच्या असत्या, तर एव्हांना माझा घोडा त्यांच्या छातीवर नाचूं लागता. दिवसां ज्यांची डोंगरांत गाळण उडते, ते रात्रीचे कशाला तिकडे मरायला जातील ? आह्मी इथें आहोंत हें त्यांना माहीत आहे. तरी गडे हो, कांहीं दगा आहे. दाजीसाहेब ह्मणाला,—ह्मणूनच सांगतों कीं शिंगें वाजवा, चला पाठलाग केला पाहिजे. ह्मातारा नाईक उग्र स्वरूप करून ह्मणाला,—खबरदार शिंगें वाजवाल तर. मी याच रानचा आहे. लहानपणीं लाख वेळां मी त्या डोंगरांतून हिंडलों आहें. टोपीवाल्यांच्या पलटणांचा धीर रात्रीं त्या डोंगरांतून जाण्याचा होईल, इतका तो सवघड नाहीं. त्या मशालींच्या उजेडांतून त्यांचीं पलटणें जाताहेत असें धरून आपण हें तोंड सोडून त्यांच्या मागें धांवलों,

तर 'तेल गेलें तूप गेलें धुपाटणें हातीं आलें', अशी स्थिति होईल व आपल्या मागें निर्भयपणें ते हा घाट उतरतील.

तो म्हातारा नाईक तयारीचीं शिंगें न वाजविण्याकरितां आपली पराकाष्ठा करून सांगत होता. पण दाजीसाहेब घोरपड्यांच्या पुढें त्याचें कोण ऐकतो? दाजीसाहेबाच्या हुकुमावरून तयारीचीं शिंगें झालीं. घोरपड्यांच्या रिसाल्यानें कारेघाटाचें तोंड सोडलें व तो त्या मशालींच्या मागें लागला. रिसाल्यांतील लोकांनीं आपले घोडे त्वेषानें काढल्यामुळें दोन एक तासांत ते त्या डोंगरापाशीं गेलें. तों त्यांना दिसणाऱ्या मशाली डोंगरपार झाल्या. रिसाला ऐत्यावेळीं शत्रूचा पाठलाग करण्याकरितां निघालेला, त्याला उजेडाची चांगली व्यवस्था घाईत कशी करतां येणार? तात्पर्य डोंगर चढतांना त्याचे फार हाल झाले व रस्त्याची माहिती नसल्यामुळें वेळ फार लागला. पहाट होऊन थोड्या वेळांत स्वच्छ दिसूं लागले. तेव्हां घोरपड्याच्या रिसाल्याच्या दृष्टीस भाजलेले वीस पंचवीस बैल पडले. त्या बैलांच्या शिंगांत मोठमोठे पलिते घालून ते पेटविले होते, आपल्याला ज्या मशाली दिसल्या ते हे पलितेच होत. शत्रूंचे लोक या डोंगरांतून गेले नाहींत अशी रिसाल्यांतील लोकांची खात्री झाली. शत्रूंनीं आपल्याला चकविलें तर खरेंच, पण यांत दाजीसाहेबांचें अंग आहे, त्यावांचून नाइकांचें न ऐकतां त्यांनीं आपल्याला इकडे येण्याविषयीं हुकूम दिला नाहीं, असें रिसाल्यांतील लोक स्पष्ट बोलूं लागले. कारेघाटाचें आ-

पण तोंड सोडून इकडे आल्यावर मागें काय झालें असेल तें त्यांना मूर्तिमंत दिसूं लागलें. दाजीसाहेब फितूर झाला होता. पण रिसाल्यांतील लोकांची स्थिति अशी नव्हती. ज्याची आपण भाकरी खातों त्याची चाकरी बजाविली पाहिजे हें त्यांचें व्रत होतें. मागें काय प्रकार झाला तो पाहण्याकरितां ते त्याच पावलीं मागें परतले.

इकडे इंग्रज बहादुरांचीं पलटणें घोरपड्यांचा रिसाला बैलांचा पाठलाग करण्याकरितां केव्हां जातो, याची वाट पहात बसलींच होतीं. रिसाल्यांत शिंगें होऊन तो बैलांच्या मागें जातांच, विजयशाली इंग्रजांचीं पलटणें घाट उतरून आलीकडे आलीं. अशा प्रकारचा फितूर झाला नसता तर त्यांचीं पलटणें घाट उतरून आलीकडे आलीं नसतीं, असें कोणालाही ह्मणतां येणार नाहीं. असें घडवून आणण्याचें मुख्य कारण, व्यर्थ रक्तपात होऊं नये हेंच असलें पाहिजे. आणि इंग्रजांनीं जरी बहुतेक हिंदुस्थान पादाक्रांत केला, तरी त्यांनीं राक्षसी लढाया केल्या, पानपतसारखी रणधुमाळी माजवून लक्षावधी लोकांना मृत्युवश केलें, असें कधींही झालें नाहीं. हा इंग्रजांचा चांगुलपणा होय, असें ह्मणण्यास कांहीं एक हरकत नाहीं. तात्पर्य, पंचवीस वर्षांपूर्वींच्या पुष्कळ ह्मातान्यांच्या तोंडून ज्या या फितुराच्या गोष्टी ऐकूं येत, तो हा फितूर इंग्रज बहादुरांनीं व्यर्थ रक्तपात होऊं नये या सदिच्छेनें केला असला पाहिजे हें उघड आहे. या फितुराला लेखी पुरावा मिळण्याचा कांहीं एक संभव नाहीं. तथापि यशवंतराव घोरपड्यांना बाजीराव साहेबांचीच

देणगी असतांना, पुढें इंग्रजबहाद्दरांनीं यशवंतरावास पंचवीस हजारांची व दाजीसाहेबास निराळी दहा बारा हजारांची जहागीर करून दिली. हा उपकार इंग्रज बहाद्दरांनीं काय ह्मणून केला असा प्रश्न उत्पन्न होतो. कारण, बाजीराव साहेबांच्या सर्व देणग्या इंग्रजबहाद्दरांनीं पुढें चालविल्या असें ह्मणतां येत नाहीं. तसें असतें तर बापू गोखल्यांच्या कुळांतील सद्यःकालीनांना उदरनिर्वाहाकरितां अन्न कोठें मिळेल अशी विवंचना करीत भणभण फिरावें लागलें नसतें. बाळाजीपंत पटवर्धन यांच्या नातवांपणत्वांना पेशवाईंत आमच्याकडे इतके इतके गांव होते, सध्यां विश्रामबागेपाशीं ज्यांत ट्रेनिंग कॉलेज आहे, त्या आमच्या वाड्यांत अलोट संपत्ति होती असे दुःखोद्गार काढून, पण आतां काय करावें ? या काळजीला घट्ट धरून बसावें लागलें नसतें. गोखले व पटवर्धनच काय, बाजीरावाला ज्यांनीं मदत केली, जे बाजीरावाबरोबर स्वामिभक्ति स्मरून गेले अशीं कित्येक घराणीं सध्यां अन्नाला मोताद झालीं आहेत. असा प्रकार असतांना बाजीरावाच्या पदरच्या यशवंतराव घोरपड्यावर व त्याच्या यवनी राखेपासून झालेल्या दाजीसाहेबावर इंग्रजबहाद्दरांनीं कृपा केली त्याअर्थीं घोरपड्यांचा इंग्रजबहाद्दरांना पेशवाई कळसास नेण्यास कांहीं उपयोग झाला असला पाहिजे ही दिसती गोष्ट आहे. इंग्रजबहाद्दरांनीं घोरपड्यांना जी सनद करून दिली, तींत घोरपड्यांचा उपयोग झाला अशाच अर्थाचा कांहीं उल्लेख असल्याचा, ती सनद पाहिलेल्या एका वृद्ध गृहस्थानें

सांगितल्याचें स्मरतें. पेशव्यांच्या पदरच्या चोरपड्यांचा, इंग्रजबहादुरांना कांहीं उपयोग झालाच असला, तर ही जी वर दंतकथा लिहिली आहे, तिला थोडासा शाबितीचा मुळवा आहे अशी कल्पना केल्यास ती निव्वळ चुकीची आहे असें कोण ह्मणेल ?

---

# रामाजी महादेव.



स्वराज्यांत प्रख्यात असलेल्या या पुरुषाची प्रथम गुच्छांत जी एक दंतकथा दिली आहे, तिला कागदपत्रांचा पुरावा आहे. ज्यांनीं कालवशात् नानांचे वाड्यांतील दप्तर अति बारकाईनें पाहिलें, त्यांनीं, वसईचा सुभेदार रामाजी महादेव याच्या स्वदस्तूरचें उंदेरीचा किल्ला कसा हस्तगत झाला या संबंधाचें पत्र पाहिलें आहे. पूर्वींचे सर्व कागदपत्र अजून जिवंत राहिले असतील तर तें पत्र अजून दृष्टीस पडेल. पूर्वींचे कोट, किल्ले आमच्या सध्यांच्या माबाप सरकारानें धुळीस मिळविले तें राहो. पण सर्व कागदपत्रही सरकाराच्यानें जपून ठेववले नाहींत याचें आश्चर्य वाटतें ! सरकारानें नव्हे आईनें, मुलांशीं अशी प्रतारणा केल्यावर, तिच्या संसाराला अनुकरणीय स्वरूप कसें येईल ? !

ज्या सन्मान्य, वृद्ध, पेशव्यांच्या दप्तरच्या चांगल्या माहितगार, मला वंद्य असलेल्या गृहस्थांनीं आतां मी लिहिणार आहें ती दंतकथा सांगितली, त्यांचें मत असें आहे कीं, पेशव्यांच्या फडांतील कागदपत्रांपैकीं कित्येकांची अग्नीला आहुती झाली, ती न होती तर सध्यां जे इतिहास दिसतात त्याहून आणखी कांहीं निराळे झाले असते. कै. वा. सरदार गोपाळराव हरी देशमुख यांनीं, पेशव्यांची व ब्राह्मण मुत्सद्यांची आपलें सर्व कसब खर्च करून राळ उडविली ! इलाज नाहीं.

सरदार बहादुरांना कांहीं कारणानें तसें दिसलें ! पण त्या वेळीं त्यांना हातांत कागदपत्रें घेऊन स्वाभिमानपूर्वक मोडून काढायला जे भीत नसत, दप्तरांतला आमका कागद आमके ठिकाणीं सांपडेल असें वार्धक्यानें अगदीं थकले आहेत तरी जे अजून सांगतात, पुण्यांतल्या दहा पंधरा वर्षांपूर्वींच्या थोर गृहस्थांस जे चांगले माहीत होते व सध्यांही कित्येक थोर गृहस्थ प्रसंगानुसार ज्यांच्याकडे माहिती घ्यायला जातात, जे मला सदा पादवंदनाला योग्य आहेत ते डोळ्यांत आस्वें आणून " खोटं पुढें आलं " असें दुःखोद्गारांनीं सांगतात ! सरदारांनीं सरदारीकरितां, बहादुरीकरितां मोठ्या पगाराकरितां पूर्वजांना शिव्या देऊन प्रभुवर्गाला खुष करण्याची जादू कशावरून अंगीकृत केली नसेल? आपल्या चपात्या तुपांत तरंगाव्या ह्मणून मनुष्य काय करील याचा नेम नाहीं, हें हरघडीं प्रत्ययाला येत आहे. कोळसा उगाळावा तितका काळा ! असो. सांगायचें तात्पर्य, दप्तरच्या अधिकाऱ्यांनीं पुष्कळ कागद जाळल्यामुळें खरा इतिहास तयार होण्याच्या संबंधांत निराशा झाली !

दप्तरचे कागद अग्नींत न पडते, तर रामाजी महादेवांच्या आजच्या दंतकथेलाही आधार मिळण्याचा संभव होता. कारण मुंबईस त्यांच्यावेळीं असलेल्या इंग्रज अधिकाऱ्याच्या आग्रहावरून ते तेथें जे गेले, ते पेशव्यांची आज्ञा घेतल्यावांचून गेले नसतील. इंग्रज लोक आतां आपले राजे झाले आहेत, तेव्हां आपल्याला सध्यां हुजूर, हुजूर ह्मणून त्यांना मुजरे ठोकावे ला-

गतात, त्यांचे शब्द झेलावे लागतात, त्यांची आपल्याला थरत् भीति वाटते, पण स्वराज्यांत असा प्रकार नव्हता. तेच आपल्या पूर्वजांच्या आर्जवांत असत, त्यांच्याशीं दोस्ती करण्याकरितां अगदीं भुकेलेले असत, विशेष किंमतीच्या नव्हेतच, पण दिसण्यांत बऱ्या अशा विलायती चिजा नजराण्याच्या ऐवजीं पाठवीत. आणि आदबी राखण्याकरितां इतक्या गरिबीनें वागत कीं, आपल्या पूर्वजांनीं इंग्रज डोळ्यांत घातला तरी सलणार नाहीं असें ह्मणावें ! मुंबईपासून वसई फार दूर नाहीं हें पुष्कळांना माहीत आहे. मुंबईच्या इंग्रज अधिकाऱ्यानें रामाजी महादेवांना, एकदां तुह्मी आमची मुंबई पाह्यला या असा पुष्कळ दिवस आग्रह चालविला होता. त्यावरून त्यांनीं पुण्यास ही गोष्ट कळवून परवानगी मागितली. इंग्रज लोक शिवरायापासून आपल्या पूर्वजांची मैत्री संपादित आले होते. त्यामुळें पुण्याहून रामाजी महादेवांना मुंबई पाह्यला जायला परवानगी मिळाली. अगदीं गाफिलपणानें जाऊन, फाजील विश्वास ठेवून, आपलें हांसें करून घेऊं नये एवढें मात्र पुण्याहून सुचविण्यांत आलें होतें. रामाजी महादेव हा गाफील राहून फसणारा व पस्तावीं पडणारा मनुष्य नव्हताच. मुंबईला जायचें तर फार विचारानें गेलें पाहिजे, हा त्याचा प्रथमपासून विचार होता. पुण्याहून परवानगी आल्यावर रामाजी महादेवांनीं मुंबईच्या इंग्रज अधिकाऱ्यास, मी अमक्या दिवशीं सड्या स्वारीनें मुंबई पाह्यला येतो असें कळविलें.

इकडे रामाजी महादेवांनीं आपल्या कोंकणी शिपा-

यांस आज्ञा केली कीं, गवतांचे भारे व लांकडांच्या मोळ्या घेऊन आपल्या तलवारी कोणाला न दिसतील व वेळीं झट्दिशीं काढतां येतील, अशा त्यांत घालून मुंबईस जावें. व शिंगाचे आवाज ऐकतांच त्या ठिकाणीं जमावें. या आज्ञेप्रमाणें रामाजी महादेवांचे सुमारें हजार बाराशें शिपाई मुंबईस येऊन दाखल झाले. त्यावेळीं आतांसारखी मुंबई अजस्र पसरलेली नव्हती. रामाजी महादेवांचे भारेवाले व मोळीवाले, मुंबईच्या बाजारांतून भारे मोळ्या खालीं उतरून बसल्यावर, त्यांचा सवदा करण्याकरितां लोक दरदाम ठरवूं लागले. पण या वेषधारी भारेवाल्यांनीं व मोळीवाल्यांनीं भारी पैसे सांगून सवदा ह्मणून पटूं दिला नाहीं. जो भारा किंवा जी मोळी चार सहा आण्यांत मिळायची तिला यांनीं एकदम रुपया घेतल्याखेरीज हालणार नाहीं ह्मणून सांगावें आणि गिऱ्हाइकांशीं बेफिकिरी दाखवावी. असो.

ठरल्याप्रमाणें रामाजी महादेव दोन शिंगाडे व दोन चार हुजरे अशा अगदीं सड्या स्वारीनें मुंबई पहाण्याकरितां साधेसे येऊन दाखल झाले. मुंबईचा इंग्रजांचा अधिकारी त्यांना सामोरा गेला. दोघांचे कुशल प्रश्न झाल्यावर इंग्रज अधिकाऱ्यानें तेथल्या रामाजी महादेवांना दाखवाव्याशा वाटल्या तितक्या चिजा दाखविल्या व तो आपल्या जातीच्या लोकांच्या कौशल्याच्या, धाडसाच्या व शौर्याच्या गोष्टी सांगूं लागला. रामाजी महादेव शांतपणें तो सांगे तें तें ऐकून घेत होते. इंग्रज लोकांचा, त्यांच्या देशाचा त्या अधिकाऱ्यानें यथास्थित स्तुतिवाद गाइल्यावर तो रामाजी महादेवांना हळूंच म्ह-

णाला, तुह्मी लोक फार भोळे. आमच्यावर भरंवसा ठेवून तुह्मी चार सहा लोकांनिशीं येथें आलां आहां. पण मीं जर तुह्मांला आतां येथें कैद केलें तर तुह्मी काय कराल? रामाजी महादेव शूर होते हें वाचकांस कळलें आहेच. ते व मुंबईचा इंग्रज अधिकारी असे हातांत हात घालून चालले होते. रामाजी महादेवांनीं त्याच्या तोंडचे शब्द ऐकतांच मागें असलेल्या शिंगाडच्यांना शिंगें फुंकण्याला इषारत केली व झट्कन आपली गुप्ती काढून तिचें जलाल पातें, त्या इंग्रज अधिकाऱ्याच्या हातावर विशेष इजा होणार नाहीं अशा बेतानें चालविलें. इतक्यांत रामाजी महादेवांचे कोंकणे शिपाई आपल्या तलवारी म्यानांतून काढून त्या जागेवर धांवून येऊं लागले. आपले शिपाई दिसूं लागतांच रामाजी महादेव त्या इंग्रज अधिकाऱ्याला ह्मणाले, ही माझ्या हातांतली गुप्ती दिसते लहान, पण माझें संरक्षण करण्यास खंबीर आहे. शिवाय हे पहा माझे कोंकणे शिपाई, ज्यांनीं आतां तुमच्या भोंवतीं घेरा घातला आहे ते मला तुमच्या कैदेंत राहूं देतील काय? दोन मिनिटांत, हातांत नागव्या तलवारी असलेल्या शें दोनशें कोंकण्या शिपायांचें आपल्या भोंवतालीं कडें पडलें व आणखीही पुष्कळ शिपाई धांवून येत आहेत असें पाहून तो इंग्रज अधिकारी नुसता आश्चर्य चकीतच नाहीं झाला, तर गर्भगलित होऊन गेला! त्याच्या तोंडावाटें एक शब्द निघेना. हें प्रकरण वाढविल्यास याचा फार भयंकर परिणाम झाल्यावांचून रहाणार नाहीं, हें मनांत आणून त्याच्या हातांतून जरी रक्त वहात होतें, तरी

त्याचा विषाद न मानितां तो रामाजी महादेवांची क्षमा मागूं लागला. ज्यानें उलट्या गोष्टी सांगण्यास आरंभ केला होता तो आपण होऊन क्षमा मागूं लागला हें पाहतांच रामाजी महादेवांनीं बरेंच ओढून धरलें. त्यांनीं त्याला सांगितलें, हें सर्व वर्तमान मला पुण्यास श्रीमंतांना कळविलें पाहिजे. पुण्याचें नांव ऐकतांच त्या इंग्रज अधिकाऱ्याच्या छातीवर मोठा थोरला दगड येऊन पडल्यासारखें झालें. त्यानें रामाजी महादेवांच्या पुष्कळ विनवण्या केल्या व सांगितलें कीं, मवाशीं मी तसें थट्टेनें बोललों. तुमच्या व आमच्या स्नेहांत कधींही अंतर पडूं नये. तुह्मी तुमच्या श्रीमंतांना ही गोष्ट समजावून त्यांचा आमच्यावर राग होईल असें करूं नका. त्यांची आमच्यावर कृपा आहे, स्नेह्याच्या भावानें त्यांचें आमच्याबरोबर वर्तन आहे ह्मणूनच आमचे पाय येथें टेकले आहेत. ह्या त्या इंग्रज अधिकाऱ्याच्या विनविण्यावरून त्याला चांगली उपरति झाली असें जेव्हां रामाजी महादेवांना वाटलें, तेव्हां त्यांनीं. ही हकीकत मी पुण्यास श्रीमंतांना कळविणार नाहीं असें त्याला अभिवचन दिलें व ते मुंबई पाहून वसईस परत आले.

---

# रेटरेकरांचें घराणें.

## प्रीतिसंगम.

सातार जिल्ह्यांत, कऱ्हाड तालुक्यामध्यें कृष्णेच्या काठीं रेटरेंबुद्रुक हा गांव आहे. ह्या गांवची लोकसंख्या सुमारें ३५०० असून घरें ६०० आहेत. त्यांत ब्राह्मणाचीं घरें सुमारें ५० आहेत. या गांवांत या घराण्याला ऊर्जित दशेला आणणारा पुरुष भिवराव रेटरेकर हा रहात होता. त्याला या गांवचें कुळकरण होतें. परंतु प्रपंच फार मोठा असल्या कारणानें कुळकरणाच्या वतनांत त्याचा खर्च भागत नसे. भिवराव कर्तबगार पुरुष होता. आपण बाहेरगांवीं जाऊन कोणाची चाकरी पत्करूं, तर सध्यां आपल्या कुटुंबाचे जे हाल होताहेत ते टळतील व नशीब असलें तर आपल्या कुटुंबाला बरे दिवस येतील असा त्याला दम होता. तो लेखणीचा बळकट व हिशोबांतही तरबेज होता, यामुळें कारकुनीच्या कामावर आपल्याला कोणीही ठेवून घेईल, अशीही त्याला पक्की खात्री होती. बाहेर कोठें गेल्यावांचून गत्यंतर नाहीं असें खास झाल्यावर, तळेगांवीं दाभाड्याकडे जाण्याचा भिवरावानें निश्चय ठरविला. भिवराव तेथें गेल्यावर दाभाडे यांनीं त्याला कारकुनीचें काम सांगून आपल्या पदरीं ठेवून घेतला. भिवराव कारकुनीचें काम करीत असतां यजमानांना त्याची हुषारी कळून येऊं लागली. यामुळें

तो चढतां चढतां दाभाड्यांचा फडणीस बनला. सारांश भिवरावानें ज्या हेतूनें घर सोडलें तो हेतु बराच तडीस गेला. कारण त्या वेळची दाभाड्यांची फडणिशी. मानाची व मिळकतीची होती.

या रेटरेकरांच्या घराण्याच्या इतिहासाला जितकें महत्त्व द्यावें तितकें थोडें आहे. शिंदे. होळकर. गायकवाड यांच्याप्रमाणें हें घराणें जरी उदयास आलेलें नसलें, तरी पेशव्यांनीं जो या घराण्याला मान दिला आहे व या घराण्यांतील पुरुषांनीं पेशव्यांची जी चाकरी बजाविली आहे, ती संस्मरणीय आहे. पेशव्यांच्या घराण्यांतील पुरुष या देशस्थ घराण्यांतील पुरुषांना. बंधूच्या नात्यानें वागवीत. आणि लक्ष्मणानें ज्याप्रमाणें श्रीरामचंद्राची सेवा केली त्याप्रमाणें या घराण्यांतील पुरुषांनीं पेशव्यांची सेवा केली. हें वाचकांच्या निदर्शनास येईल. असो. भिवराव रेटरेकर तळेगांवीं दाभाड्यांच्या फडणीशिचें काम पहात असतांना. बाळाजी विश्वनाथ हे धनाजी जाधव यांच्या पदरीं राहून जमाबंदीचें व वसुलाचें काम पहात होते. दाभाडे व जाधव यांचा फार स्नेह होता. बाळाजी विश्वनाथ यांना कामाच्या संबंधांत तळेगांवीं जाण्याचा वारंवार प्रसंग येई. तेथें भिवराव रेटरेकर यांच्या नजरेस बाळाजी विश्वनाथ यांची हुषारी आली. दोघेही चांगले कारकून, यामुळें दोघांचा प्रत्येक भेटीला स्नेह वाढत चालला. तो वाढतां वाढतां इतका वाढला कीं ते जरी देशस्थ व कोंकणस्थ होते, तरी एकमेकांस भाऊ ह्मणूं लागले. ते परस्परांच्या निर्लोभपणें उपयो-

गीं पडूं लागले. भिवराव रेटरेकरांनीं बाळाजी विश्वनाथ यांस अनेक वेळां मदत केली व त्यामुळें त्यांचा अभ्युदय झाला. एकवेळ तर भिवरावांनीं बाळाजी विश्वनाथ यांस प्राणसंकटांतून वांचविलें असें दंतकथा सांगतात. आणि हें असत्य नसावें असें पुढील इतिहासावरून सिद्ध होतें.

बाळाजी विश्वनाथापेक्षां भिवराव रेटरेकर हे वयानें थोडे मोठे होते. यामुळें बाळाजी विश्वनाथ त्यांना थोरल्या भावाचा मान देत. दोघांनीं एके ठिकाणीं रहावें असें बाळाजी विश्वनाथ यांना वाटे, पण भिवरावाला तें नको होतें. बाळाजी विश्वनाथाचें वैभव शुक्लेंदुवत् वृद्धि पावूं लागलें, तरी भिवराव आपली फडणिशी संभाळून होते. भिवरावांना रेटऱ्यास जाण्याचें कांहीं कारण उत्पन्न झाल्यावरून ते रेटऱ्यास गेले, तों त्यांचा मृत्युसमय जवळ आल्यानें, ते आजारी पडले व त्यांतच त्यांचा अंत झाला. भिवरावांना दोन मुलगे होते. वडील मुलाचें नांव बाजीराव व धाकट्याचें चिमणाजीपंत. बाळाजी विश्वनाथांच्या दोघां मुलांचीं अनुक्रमें हींच नांवें होतीं, हें इतिहासवाचकांस सांगितलें पाहिजे असें नाहीं. मुलांच्या या नांवांवरूनही, चाणाक्ष वाचकांस भिवराव रेटरेकर व बाळाजी विश्वनाथ या दोघांतील स्नेह पाहून फार कौतुक वाटेल. भिवरावांच्या प्रमाणेंच त्यांचीं मुलेंही कर्तबगार होतीं. भिवराव वारल्यावर त्यांचीं मुलें कांहीं वर्षें रेटरे या गांवीं खाऊन पिऊन स्वस्थ होतीं. परंतु त्यांचा थोरला मुलगा बाजीराव हा चांगला सज्ञान झाल्यावर, त्याला घरांत असेल

तें मोडून खात माशा मारीत राहण्याचा कंटाळा आला. आपल्या वडलांची, दाभाड्यांच्या पदरीं फडणिशीची नौकरी आहे ती जाऊन आपण करावी, असें बाजी भिवराव याच्या मनानें घेतलें. त्यानें आपल्या मातोश्रीपाशीं ही गोष्ट काढली व त्यांची आज्ञा घेऊन तो तळेगांवीं गेला.

बाजी भिवराव तळेगांवीं येऊन पोंचल्यावर, त्यानें आपल्या यजमानांची भेट घेतली व त्यास आपली सर्व हकीकत सांगितली. परंतु ह्यापुढें रेटरेकरांच्या हातून दाभाड्यांची नौकरी व्हावयाची नसल्यामुळेंच कीं काय एक अति विचित्र गोष्ट घडून आली, पण तींत बाजी भिवराव याचा आवेश कळून आला. दाभाड्यांना आपली सर्व हकीकत सांगून बाजी भिवराव कचेरींत बसला असतां, फडणिशीचें काम जो मनुष्य पहात होता, त्यांजकडे कित्येक कामाचे कागद सह्यांला आले. ते वाचून फडणिशीचें काम पहाणारा मनुष्य त्यांजवर सह्या करूं लागला. ही गोष्ट या मानी पुरुषाच्या मनाला फार झोंबली! या गादीचा हक्कदार मी असतांना, माझ्या देखत हा तिऱ्हाईत कोण सह्या करणार, असें मनांत येऊन त्याचें माथें फिरलें. त्यानें रागाच्या सपाट्यांत फडणिसांची दौत घेऊन ती त्यांच्या डोक्यांत घातली ! हें बाजी भिवरावाचें कृत्य पाहून त्याला दाभाडे कांहीं बोलणार, इतक्यांत तो उठून ह्मणाला, मी येथें हजर असतांना, मीं करायच्या त्या सह्या दुसऱ्यानें केल्या, हा माझा मोठा अपमान झाला. एकदां ज्या ठिकाणीं असा अपमान झाला त्या ठिकाणीं चाकरी कर-

ण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. यजमानांनीं जायला मला परवानगी द्यावी. हा मी चाललों. असें ह्मणून बाजी भिवराव कचेरींतून जों निघाला तों तो पुढें तळेगांवांतही फार वेळ राहिला नाहीं. त्यानें सरळ परत आपल्या घराचा रस्ता धरला ! अशा प्रकारच्या विलक्षण मानी स्वभावाचे पुरुष आपल्या समाजांत सध्यां विरळा दृष्टीस पडतात, हेंच आपल्या अवनतीचें कारण नसेलना ?

बाजी भिवराव परत घरीं गेल्यावर त्यानें आपल्या मातोश्रीस झालेला सर्व वृत्तांत सांगितला. त्या बिचारीला मुलानें विलक्षण आवेशाच्या भरांत, आपले यजमान दाभाडे यांना राग येण्यासारखें कृत्य केलें, याचें फार वाईट वाटलें. तूं केलेंस तें चांगलें केलें नाहींस, मनुष्यानें प्रसंग ओळखून काय करणें तें करावें, मुंगी होऊन साखर खावी, आपले सध्यांचे दिवस पडीचे आहेत, अशा दिवसांत मानापमान पाह्यचा नव्हे, थोरांचा आश्रय मिळवायला अंगीं लीनता आणावी लागते, अशा प्रकारें तिनें आपल्या मुलाला पुष्फळ बोध केला. पण बाजी भिवराव यानें एकच गोष्ट सांगितली कीं, दाभाड्यांचा आश्रय कितीही दिवसांचा व कितीही मोठा असला तरी तो मला नको. जेथें एकदां अपमान झाला तेथें मी, तोंड खालीं घालून कधींही जाणार नाहीं. हा मुलाचा दृढनिश्चय पाहून त्या बिचारीला अधिकच वाईट वाटलें व पुढें काय करावें या विवंचनेंत ती पडली. ती याप्रमाणें चिंतामग्न झाली असतां तिला बाळाजी विश्वनाथ ह्यांच्या, भिवरावाबरोबर असलेल्या अ-

कृत्रिम स्नेहाची, व भिवरावानें बाळाजी विश्वनाथावर केलेल्या उपकारांची आठवण झाली. तरी तिला धीर येईना. कारण बाळाजी विश्वनाथ कैलासवासी होऊन पेशवाईचें काम बाजीराव पहात होते. बाजीरावाला आपली ओळख पटेल कीं नाहीं याचा तिला संशय वाटूं लागला. तरी तिनें आपला मुलगा बाजी भिवराव यांस सर्व हकीकत सांगितली. रेटऱ्यास राहून निभाव लागण्यासारखें नसल्यामुळें बाजी भिवराव यानें पुण्यास जाऊन बाजीराव साहेबांनीं आपल्यास ओळखल्यास पहावें असा निश्चय केला व मातोश्रींच्या पाया पडून त्यांचा मंगल आशीर्वाद घेऊन तो पुण्यास आला.

बाजी भिवराव पुण्यास कोणी देशपांडे होते त्यांजकडे उतरला होता. त्यानें देशपांड्यांपाशीं बाजीरावसाहेबांची भेट करून देण्याबद्दल पुष्कळ वेळां गोष्ट काढली. परंतु आज जाऊं, उद्यां जाऊं अशाखालीं बरेच दिवस गेले. शेवटीं एके दिवशीं बाजी भिवरावानें विशेष आग्रह धरला. तेव्हां देशपांडे बाजीरावसाहेबांची स्नानाची वेळ गांठून वाड्यांत गेले. त्यांनीं त्यांना भेटून असें सांगितलें कीं, आपल्या वडलांचे भिवराव रेटरेकर परम स्नेही होते. त्यांचे चिरंजीव बाजी भिवराव आपल्या भेटीकारितां रेटऱ्याहून येथें आले आहेत. त्यांना येथें येऊन बरेच दिवस झाले, परंतु अद्याप त्यांची दाद लागून भेटीचा योग आला नाहीं. बाजीरावसाहेबांनीं याबद्दल पुष्कळ विचार केला, परंतु भिवराव रेटरेकर कोण ते त्यांच्या ध्यानांत आले नाहींत. पुढें भोजनोत्तर बाजीरावसाहेब यांनीं त्यांच्या मातो-

श्री राधाबाईसाहेब यांस भिवराव रेटरेकरांविषयीं माहिती विचारली. त्यांनीं डोळ्यांत अश्रू आणून सांगितलें ते कोठें असतील तेथून त्यांना घेऊन या. आपल्यावर त्यांचे अत्यंत उपकार झाले आहेत. त्याची अंशतः फेड होण्याचा प्रसंग आला असला तर ही आपली पुण्याईच समजली पाहिजे ! त्यांचें थोरल्या भावाचें नातें आहे. मी त्यांना भावजी ह्मणत असें. मातोश्री राधाबाईसाहेबांना माहिती सांगतांना अशा सद्गदीत झालेल्या पाहतांच, सुपुत्र बाजीरावाला, स्नानाच्या वेळीं अशी चौकशी केली नाहीं याबद्दल फार विषाद वाटला. बाजीरावसाहेब म्हणाले, भिवराव काका तर आमच्या दुर्दैवानें वारले, पण त्यांचे थोरले चिरंजीव बाजीराव येथें आले आहेत, त्यांना मी आतां घेऊन येतों. असें ह्मणून बाजीरावसाहेब पादवंदन करून मातोश्रींची आज्ञा घेऊन निघाले. ही जागा अशी नाहीं का ? कीं येथें आपण आश्चर्यचकितच झालें पाहिजे ! पूर्वीं कधीं कांहीं कामाच्या संबंधांत उपयोगीं पडलेल्या गृहस्थाचा मुलगा, आश्रय मागण्याकरितां आलेला त्याला कोण विचारतो ? ! आपल्या सध्यांच्या सत्ययुगांत त्या बिचाऱ्यानें बाहेर पोट जाळून सहा महिने जोडे फाडल्याखेरीज रावसाहेबांची भेट झाली तर मग ते रावसाहेब नव्हेत. आमचे सहज होणारे रावसाहेब, यथास्थित गप्पा, आणि वेळ जातच नाहीं ह्मणून क्रिकेट, बिझिक, बुद्धिबळें किंवा फांसे यांतल्याच कांहीं प्रकारांत गुंतलेले असायचे ! पण सबब सांगायचे नेहमीं फुरसतीची ! साध्या भेटीचा हा प्रकार. मग अंगाला

झीज लावणारें गिऱ्हाईक आल्यावर काय विचारावें ? तोंड काळें. हे त्याचे समजतात, तो ह्यांचेंही ह्मणायला लागतो ! पण एकंदरींत हा प्रकार चांगला नव्हे. आपण उन्नतीच्या वाटेला लागलों, असें यावरून कोणीही ह्मणणार नाहीं.याचें एवढ्याकरितां वाईट वाटतें, या शहाण्यांना, आपण गतानुगतिकांना, समाजबंधनांवर कातऱ्या चालविण्याचें वळण देत आहोंत, हें समजत नाहीं ! याचा परिणाम काय होतो हें पेशवाईच्या शेवटच्या काळांत चांगलें झणझणीत कळलें असून, अजून वळत नाहीं. त्याचीच चव घेत राहणारे रावसाहेब बहुतेक ठिकाणीं कसाला उतरतात ! असो; हीही स्थिति जाईल. स्नानाच्या वेळीं ही बातमी समजली असतांना आपण कानागाडा केला याची बाजीराव साहेबांना चटपट लागली. कधीं खजील न होणारा तो महाविक्रमशाली चित्पावनकुलोत्पन्न एक वीर कृतापराधाबद्दल खजिल झाला. जातिभेदामुळें आपल्याला स्वराज्य वर्ज्य झालें आहे असें विधान करणारे पंडित असल्या बहुमोल गुणांची स्पृहा करीत नाहींत. त्याच्याकडे ढुंकून पहात नाहींत. कोंकणस्थांचा व देशस्थांचा जर तंटा असता, तर बाळाजी विश्वनाथ व भिवराव रेटरेकर यांचा इतका अकृत्रिम स्नेह जडला असता काय ? बाजीराव साहेबांनीं नित्याच्या अल्प वामकुक्षीचेंही मनांत आणलें नाहीं. ते बाजी भिवराव याला वाड्यांत घेऊन येण्याकरितां, पालखींत बसून देशपांड्यांच्या घरीं गेले. तेथें गेल्यावर, बाजी भिवराव दृष्टीस पडतांच त्याला कडकडून भेटले ! बाजीराव साहेबांचें हें अत्यंत प्रेमाचें

वर्तन पाहून, बाजी भिवराव कुढ्या मनाचा होता अशी कल्पना केली, तरी तो आपल्या दिलांत किती खुलला असेल याचा अदमास वाचकांवर सोंपविणें बरें. जरासा मनुष्य गबाळ दिसला कीं त्याचें वारें कामाचें नाहीं असले जे विकार आहेत, ते बाजीराव साहेबांना मुळींच शिवले नाहींत. हें पाहूनच, बाजी भिवराव, त्याच क्षणाला त्याचा एक एकनिष्ठ सेवक बनला. तो बाजीराव साहेबांच्या पायांवर लोटांगण घालतो आहे, इतक्यांत त्याला त्यांनीं वर केलें व मोठ्या विनयानें सांगितलें, वंदनाचा अधिकार माझा आहे. आपण वडील आहांत. आपण आशीर्वाद द्यावा. बाजीराव साहेब इतक्या प्रेमळ अंतःकरणाचे होते ह्मणूनच लाखों लोक हातांवर शिरें घेऊन देशाचा परदेश करीत. थोर पुरुषाच्या अंगीं असेच थोर गुण लागतात. त्याखेरीज जग त्याला वश होत नाहीं. वक्तृत्व करणें हें इतकेंसें अवघड नाहीं. वागणें अवघड आहे. ह्या मनुष्यांचा वर्गच निराळा. आपलें भाग्य खडतर, ह्मणून त्या वर्गांतलें एकादेंही रत्न आपल्याला लाधत नाहीं.

बाजीराव साहेबांनीं बाजीभिवरावाला आपल्या बरोबर पालखींत घेऊन वाड्यांत नेलें. त्यांनीं त्याचा योग्य पाहुणचार केला कीं नाही ह्या गोष्टी ल्याह्यला नकोत. बाजी भिवराव श्रीमंत बाजीराव साहेबांबरोबर त्यांच्या वाड्यांत कांहीं दिवस राहिल्यावर त्याला त्या स्थितीचा कंटाळा आला. त्यानें बाजीराव साहेबांना विनंति केली, मला कांहीं चाकरी सांगावी. त्यावरून त्यानीं एक पथक बाजी भिवराव याच्या स्वाधीन क-

रून यावर करामत करून दाखवावी असें सांगितलें. बाजी भिवराव आपल्या ह्या पथकासह श्री. चिमणाजी आप्पा यांचे बरोबर असे. त्यानें ही श्रीमंतांची नौकरी पत्करल्यापासून, रेटरेकरांच्या घरांत संपत्ति येऊं लागली. त्यांचें दारिद्य जाऊन गांवच्या लोकांना त्यांचा दबदबा वाटूं लागला. बाजी भिवरावाचा धाकटा भाऊ चिमणाजी भिवराव हा घरीं रेटऱ्यास असे. बाजी भिवरावानें चिमणाजी अप्पासाहेबांनीं ज्या स्वाऱ्या केल्या त्यांत तलवार गाजवून पुष्कळ संपत्ति मिळविली. त्याचें चिमणाजी भिवरावाशीं द्वैत नव्हतें. तो इकडून रेटऱ्यास पैसा पाठवी आणखी तिकडे चिमणाजीराव त्याचा सद्व्यय करी. त्यानें रेटऱ्यास, देवळें, वाडे, विहिरी, घाट, पाह्यऱ्या वगैरे बांधून रेटरे गांवाला शोभा आणली. अस्तु.

---

## मोहोरा पडला पण किल्ला हस्तगत झाला.

इसवी सन १७३९ त श्री. चिमणाजीराव अप्पासाहेबांनीं शिंदे, होळकर, यशवंतराव पवार, तुकोजीराव पवार, रामचंद्र हरी, बाजीभिवराव, व्यंकटराव घोरपडे, खंडोजी मानकर वगैरे सर्व रणशूर योद्ध्यांना बरोबर घेऊन कोंकणांत स्वारी केली. या स्वारींत पेशव्यांच्या सरदारांनीं शौर्यानें लढून गोंवेकरांस नरम केलें. ठाणें, केळवेंमाहीम, तारापूर, वसई, कतलवाडी, डाणू, शिरगांव वगैरे किल्ले घेतले. त्यांत तारापूरचा किल्ला हस्तगत करतांना फिरंग्यांचें व पेशव्यांचें तुमुलयुद्ध

झालें. त्या युद्धांत बाजी भिवराव सरकार कामास आला ! आणि हा किल्ला हस्तगत व्हायलाही पण कारण तोच झाला. त्या संबंधाची एक आश्चर्यकारक गोष्ट आहे. वर सांगितलेले किल्ले हस्तगत करीत असतां, तारापूरचा किल्ला कांहीं केल्या हस्तगत होईना. एकापेक्षां एक भारी, असे श्रीमंत अप्पासाहेबांच्या बरोबर रणशूर योद्धे असतां कोणाचा इलाज चालेना. पेशव्यांच्या सैन्यानें निकरानें हल्ला करावा पण त्यांना माघार घेणें भाग पडावें असा प्रकार कितीक दिवस चालला. सर्व नामांकित मंडळी चिंतातुर होऊन बसली. अशी स्थिति असतांना एके दिवशीं श्रीमंत अप्पासाहेबांच्या पंक्तीला सर्व सरदार मंडळी बसली होती. वाढपे पानावरून वाढीत होते. सर्व वाढणें झाल्यावर एकानें तूप वाढायला आणलें. पंक्तीला बसलेल्या सरदार मंडळींत एकाला तुपाची खोड होती. वासोळें तूप त्याला मुदलीं खपत नसे. तूप वाढणारा वाढीत वाढीत त्याच्या पानापाशीं आला. त्यानें वाटींत तूप घातलें. इतक्यांत त्या सरदारानें तुपाचा वास घेऊन पाहिला तों त्याला तुपाची घाण आली. जेवणाच्या संबंधांत मनुष्याची तब्यत तेव्हांच जाते. त्याप्रमाणें तुपाची खोड असलेल्या त्या सरदाराची तब्यत तेव्हांच गेली, आणि त्यानें श्रीमंत पंक्तींत आहेत याचा कांहीं एक विचार न करितां ती तुपाची वाटी ताडकन् तूप वाढणाराला मारली ! हा चमत्कार पाहून सर्व मंडळी अगदीं तटस्थ झाली. वाचकहो, ज्या गृहस्थानें रागानें फडणिसाच्या डोक्यांत दऊत मारली

होती त्याच बाजी भिवरावानें हें कृत्य केलें. हें त्याचें कृत्य पाहून पंक्तींत बसलेला एक मनुष्य ह्मणाला, आमच्या सरदार मंडळींना साजूक तुपावांचून घास गिळत नाहीं; पण तारापुरचा किल्ला आज कितीक दिवस श्रम करून हस्तगत होत नाहीं! हें कुत्सित भाषण कानीं येतांच, बाजी भिवराव पुढचें वाढलेलें पात्र बाजूस सारून उठला आणि जवळ बसलेल्या आपल्या बापूजी नांवाच्या १८ वर्षांच्या मुलास ह्मणाला चल, तारापूरचा किल्ला हस्तगत केल्यावर आपण अन्नग्रहण करूं. बाजी भिवरावाचा मुलगा पित्याच्या आज्ञेप्रमाणें लागलींच उठला व ते बापलेक, मंडळी अविचार करूं नका असें सांगत असतां वीरश्री संचरून बाहेर पडले! ते जे बाहेर पडले ते लागलींच आपल्या पथकाचे लोक घेऊन किल्याच्या तटाच्या तळाशीं जाऊन भिडले. त्यांनीं मागून आपल्याला मदत येत असेल इकडेही लक्ष दिलें नाहीं. एकसारखा जोरानें किल्यावर हल्ला चालविला. फिरंगी लोक किल्याच्या रक्षणाकरितां सज्ज होऊन बसलेले होतेच. ते वरून मोठ मोठे धोंडे ढकलीत, तप्त कढया पालथ्या करीत, पण यानें ते प्रतिज्ञा करून निघालेले पितापुत्र मुळींसुद्धां डगमगले नाहींत.

पंक्तींतून बाजी भिवराव व त्याचा तरुण मुलगा उपाशी उठल्यावर मंडळींना जेवण कसचें सुचतें? लागलींच सर्व सरदार आपापले लोक बरोबर घेऊन बाजी भिवराव व त्याचा मुलगा यांच्या मदतीला धांवले. सर्व मराठे सरदारांचा आजचा आवेश कांहीं आणिक होता.

तारापूरच्या किल्यावर आपलीं निशाणें लावल्याखेरीज आज मागें परतायचें नाहीं असा सर्वांचा संकल्प झाला. मराठे निकरानें हल्ले करताहेत असें पाहून वरून शत्रूनींही आपली शिकस्त चालविली. सुरुंग लावल्याखेरीज किल्ला खालीं होणें मुष्कील, असें जाणून राणोजी शिंदे यांनीं तटास चार सुरुंग पाडिले. त्यांतल्या दोहोंनीं चांगलेंच काम केलें. त्या दोन सुरुंगांनीं तटाला मोठ्या हत्तीच्या अंगाएवढें भोंक पडलें. यावेळीं बाजी भिवराव, बापूजी बाजी, रामचंद्र हरी, यशवंतराव पवार, तुकोजीराव पवार वगैरे शूर सरदार मंडळी निधड्या छातीनें, मी आधीं तटावर निशाण लावणार, अशा स्पर्धेनें तटावर चढण्याचा निकर करीत होते. शत्रूचे लोकही यावेळीं मरूं किंवा मारूं अशा निश्चयानें विजयोत्सुक झालेल्या मराठ्यांच्या सेनेबरोबर लढूं लागले. युद्ध अशा निकरानें सुरू झालें, कीं जय कोणाला मिळतो याचा कोणाला निश्चय करवेना. इतक्यांत बाजी भिवराव आपलें निशाण घेऊन वाघासारखा पुढें निघाला तों वरून एक गोळी सूं सूं करीत येऊन त्याच्या तोंडांत शिरली ! अशा मर्मस्थानीं गोळी लागल्यामुळें बाजी भिवराव मूर्च्छना येऊन खालीं पडला. त्यानें जवळच त्याचा मुलगा होता त्याला हाक मारली. बापूजी बाजी आपल्या पित्याची स्थिति पाहून शोकव्याकुल झाला. मुलाला शोकव्याकुल झालेला पाहून बाजी भिवराव ह्मणाला, बायकासारखा रडतोस काय, किल्याच्या तटावर जाऊन अगोदर आपलें निशाण फडकाव. त्याखेरीज मला सुखानें मरण

यायचें नाहीं. किल्ला सर केला असें मीं ऐकलें ह्मणजे हे माझे प्राण या शरीराला सोडतील. वाचकहो, बापूजी केवळ अठरा वर्षांचा होता खरा, पण त्याच्या अंगांत सध्यां जो आपल्याला पुरून उरला आहे तो नेभळेपणा नव्हता. पित्याची इच्छा प्रथम किल्ला सर करावा अशी आहे हें पहातांच त्या तरुण शूर ब्राह्मण कुमारानें छातीचा कोट करून तटाचा रस्ता धरला ! तिकडे रणशूर सरदार सेनासाहेबसुभा राणोजी भोसला उमरावतीकर हा आपली नंगी तरवार चमकावीत तटापर्यंत जाऊन त्याला शिडी लावून निशाण घेऊन वर चढत होता. तो वर जाऊन विजयश्रीच्या ऐश्वर्यभरांत गडे हो वर या, किल्ला आपला झाला, भिऊं नका, असें ओरडून सांगत आहे तोंच त्याच्या पाठोपाठ पितृ आज्ञेप्रमाणें बापूजी बाजी आपलें निशाण घेऊन तटावर गेला ! त्यानंतर पेशव्यांचे हजारो शिपाई किल्यांत शिरून त्यांनीं शत्रूंच्या लोकांना यमदरबार दाखविलें. शत्रूचे लोक प्रथम पुष्कळ वेळ जिवावर उदार होऊन लढले. परंतु पेशव्यांचें सैन्य किल्यांत भरलें व आपले फार लोक मेले असें तेथील मुख्य सरदार अलारकेओ याच्या लक्षांत येतांच त्यानें आपल्या लोकांकडून शस्त्रें खालीं ठेवविलीं. आणि ते टोप्या काढून व दांतीं तृण धरून श्रीमंत अप्पासाहेबांना शरण आले. इकडे किल्ला हस्तगत होईपर्यंत बाजी भिवराव यांचें प्राणोत्क्रमण झालें नव्हतें. किल्ला सर झाला असें जेव्हां ऐकलें तेव्हांच त्या मानी व करारी पुरुषानें प्राण सोडले. श्रीमंत अप्पासाहेबानीं बाजी

भिवरावाचें और्ध्वदेहिक मोठ्या समारंभानें करविलें. त्याच्या मृत्यूनें तर सर्वांसच अत्यंत दुःख झालें.

---

## दुखवट्याचीं पत्रें.

बाजी भिवराव पुण्यांत आला आहे एवढें कळतांच, त्याचें श्री. बाजीराव साहेबांनीं कशा प्रकारें स्वागत केलें व त्याला एक पथक दिलें, ही हकीकत वाचकांनीं वाचली आहे. तिजवरून श्रीमंत पेशवे व रेटरेकर सरदार यांच्या कुटुंबांतील स्नेहसंबंधाचा वाचकांना अदमास झाला असेलच. बाजी भिवराव तारापूरच्या हल्यांत पडल्यावर त्याची मातोश्री वेणुबाई व बंधु चिमणाजी भिवराव यांना पेशव्याकडून जीं पत्रें गेलीं तीं ही या संबंधांत चांगली साक्ष देतात. तीं अस्सल पत्रें पुण्यास इनाम कमिटीच्या दप्तरांत आहेत ह्मणून समजतें. त्या पत्रांची खरी नक्कल इंग्रजी शिक्याची व नंबराची रेटरेकर यांच्या वंशजांपाशीं आहे. तीं पत्रें येणेंप्रमाणें—

( इंग्रजी शिक्का बी ) **श्री** ( इंग्रजी अंक १०६७५ )

गंगाजान्हवी समान मातोश्री वेणुबाई काकी वडिलांचे सेवेसी अपत्य बाजीराव बल्लाळ प्रधान साष्टांग नमस्कार विनंति येथील तागाइत पौष व० ११ पावेतों स्वकीय लिहित जावें विशेष पौष शुद्ध ११ स तारापूरास हल्ला केला ते समयीं बाजी भिवराव यांस तोंडांस गोळी लागून देवाज्ञा झाली. ईश्वरें मोठें अनुचित केलें. तुह्मास मोठा शोक प्राप्त झाला. आमचा तर भाऊ गेला. त्यांस तुह्मी वडील. दुःखाचें परिमार्जन करून वि-

वेक करावा. त्यांचीं ( बाजी भिवराव यांचीं ) मुलें व चिमणाजी भिवराव आहेत त्यांचेही त्यापेक्षां अधिक चालेल. परंतु आमचा भाऊ गेला बाजू गेली उपाय नाहीं, त्यास चिमणाजी भिवराव पाठविले आहेत हें सांगतील तें ऐकावें. सारांश मीच तुमचा बाजीराव असा विवेक करून धीर धरावा. मजवर दृष्टी द्यावी. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंति.

( इंग्रजी शिक्का बी ) श्री. ( इंग्रजी १०६७९ )

राजश्रीया विराजित राजमान्य राजश्री चिमणाजी भिवराव स्वामीचे शेवेसी पोष्य चिमणाजी बल्लाळ नमस्कार विनंति उप्परी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष राजश्री बाजी भिवराव यांस देवाज्ञा झाली त्याचा परिणाम उत्तम प्रकारें ह्मणावा तैसा झाला. बाजीराव लौकिकानें गेला. आमची बाजू गेली या गोष्टीचे श्रम झाले त्याचा विस्तार लिहितां फार आहे, पत्रीं कोठवर लिहावा. मातोश्री वेणूबाई काकीस वृद्धापकालीं महत् दुःख प्राप्त झालें. होणार बलवत्तर ईश्वर इछेस उपाय नाहीं. मातोश्रीचें समाधान करून परिमार्जन करावें. सारांश विवेक करून दुःखाचा परिहार केला तरच होईल, अन्यथा होणें नाहीं. मातोश्री वडिल आहेत सर्वांचें समाधान करणें उक्त असे. वरकड गेली गोष्ट येतीशी नाहीं. चिरंजीव राजश्री बापूजीराव, गंगोबा ( बाजी भिवरावाचे मुलगे ) हे उभयतां आह्मांजवळ सुखरूप आहेत. त्यांचे विषयीं आपलें समाधान असों देणें. बहुत काय लिहिणें लोभ असो देणें हे विनंति.

ह्या वरच्या दोन पत्रांवरून श्रीमंत बाजीराव पेश-वे व त्यांचे बंधू चिमणाजी अप्पा रेटरेकरांच्या घराण्याला किती मानीत असत हें स्पष्ट दिसत आहे. यजमानांनीं आपल्या सेवकाशीं अशा प्रकारचा भाव ठेवणें हें श्लाघ्य होय. यजमान अशा उदार स्वभावाचे असल्यावर त्यांना माळ घालण्याकरितां जयश्री कां नाहीं तिष्ठत उभी राहणार ? रेटरेकरांच्या घराण्याशींच तेवढा पेशव्यांनीं अशा तऱ्हेचा संबंध ठेवला होता असें नाहीं. जे शूरवीर तळहातावर शिरें घेऊन पेशव्यांच्या करितां मरण्यास तयार असत. त्या सर्वांवर श्रीमंतांचें असें प्रेम असे. ते त्यांना आपल्या जिव्हाळ्याचे समजत व त्यांच्यावर आपल्या कुटुंबांतील मनुष्याप्रमाणें प्रीति करीत. व जोंपर्यंत अन्योन्यांत अशा प्रकारची भावना होती तोंपर्यंत स्वराज्याला उतरती कळा लागली नाहीं. असो.

---

## रेटरेकरांची स्वामिनिष्ठा.

पेशवाईच्या प्रारंभापासून शेवटापर्यंत पेशव्यांची एकनिष्ठपणें सेवा अशी याच घराण्यानें केली असें ह्मणावें लागतें. बाजीभिवराव यानें तारापुरचा किल्ला पेशव्यांना मिळवून देऊन प्राणत्याग केला. त्यांना तीन मुलगे होते. त्यांतील बापूजीबाजीराव हा पेशव्यांच्या स्वारीबरोबर नेहमीं असे. दुसरा मल्हारपंत हा रेटऱ्यांत घरची व्यवस्था पाही. तिसरा मुलगा गंगाधरपंत हा पेशव्यांच्या स्वारीबरोबर नेहमीं असे. हा इसवी

स० १७५५–५६ च्या सुमारास राघोबादादांनीं उत्त-रेस मथुरेकडे स्वारी केली तींत गंगाधरपंत होता व याच स्वारींत भयंकर जखमा लागून तो मृत्युमुखीं पडला. बापुजीबाजीराव याला तीन मुलगे होते. त्यांतले दोघेजण १७६१ सालीं पानपत येथें जो पेशव्यांचा महानाश झाला त्यांत गारद झाले. गंगाधर बाजीराव याचा त्रिंबकराव नांवाचा मुलगा शूर होता. त्यानें धोंडी वाघ याच्या बरोबर झालेल्या लढाईत नांव गाजण्यासारखा पराक्रम केला. त्रिंबकरावापाशीं द्वारका या नांवाची घोडी असे ती बारा हात रुंदीचा खंदक उडून जात असे! धोंडी वाघाबरोबरच्या लढाईत या घोडीनें त्रिंबकरावाचे प्राण बचावले. लक्ष्मणानें रामचंद्राची, तशी रेटरेकरांनीं पेशव्यांची सेवा केली, असें मागें म्हटलें आहे. ती लक्ष्मणाची उपमा त्रिंबकराव यालाच लागू पडते. शेवटच्या रावबाजीनीं मराठी राज्याची सोडचिठ्ठी इंग्रजांच्या स्वाधीन केली, त्यावेळीं आपण बाजीराव साहेबांना मदत केली तर इंग्रजांचा रोष आपल्यावर होईल, ते आपल्याला कांहीं देणार नाहींत असा विचार करून पेशव्यांच्या पदरच्या सरदार मंडळींनीं बाजीरावाचा संबंध सोडला. पण त्रिंबकराव रेटरेकरानें आपल्या कुलाचा व पेशव्यांच्या कुलाचा पूर्वींचा संबंध कसा आहे हें लक्षांत आणूनच कीं काय, इंग्रजांचा आपल्यावर रोष होईल, ते आपल्याला कांहीं देणार नाहींत, हें पुढचें कांहीं एक मनांत न आणतां, आपला मुलगा कृष्णराव यास बरोबर घेऊन बाजीराव साहेबास सुरक्षितपणें ब्रह्मवर्तास नेऊन पोंचविलें. सा-

रांश याप्रमाणें त्रिंबकरावानें शेवटपर्यंत यजमानांची एकनिष्ठपणें सेवा करून आपल्या कुलाचा लौकिक वाढविला. त्याच्या या एकनिष्ठ स्वामिसेवेमुळें रेटरेकरांचें पूर्वीचें वैभव इतर सरदारांप्रमाणें कायम राहिलें नाहीं. पण खरे खरे जे स्वामिसेवक असतात ते निमकहरामी करून आपलें वैभव कायम राखण्याची गोष्ट ही कधीं मनांत आणीत नाहींत. रेटरेकरांचे वंशज रेटऱ्यास आहेत. त्यांजकडे इनामी, जहागिरी उत्पन्नाचे एक दोन गांव असून वडील घराण्याला कांहीं पोलिटिकल पेन्शनही मिळतें. वास्तविक पाहिलें असतां, आपल्या इंग्रज बहादूरांनीं या घराण्यानें स्वामिसेवेपासून आपल्याला ढळूं दिलें नाहीं हा त्याचा गुण पाहून त्याला त्याचें सर्व पूर्वीचें वैभव उपभोगूं द्यायचें. कारण इंग्रज बहादूर ह्मणजे कांहीं जुलमी इमाम दांडगे बादशहा नव्हत. न्यायाचा तराजू हातांत धरून ते राज्य करितात. तेव्हां त्यांनीं इमानी नोकर जाणून जर त्याची वाहवा केली असती, त्याचें सर्व वैभव कायम ठेवलें असतें, तर त्यांच्या सत्कीर्तींत भरच पडली असती. तो तिकडचा भाग कशाही रीतीनें उरकला गेला असो. त्या संबंधानें लिहून फायदा होणार आहे असें थोडेंच आहे ! पण महाराष्ट्रीय ह्मणून जे असतील, त्यांनीं या गोष्टीचा अभिमान मानला पाहिजे. बाजीराव साहेबांनीं आपल्या राजैश्वर्याची गोष्ट मनांत न आणतां बाजी भिवरावाला कडकडून भेटणें, आपल्या पालखींत घेऊन त्याला वाड्यांत नेणें व नौकरी करण्याची त्याची इच्छा दिसतांच त्याच्या स्वाधीन एक पथक करणें व

पुढें त्रिंबक गंगाधर रेटरेकरांनीं वैभवहानीची फिकीर न करितां शेवटच्या बाजीला ब्रह्मवर्तास नेऊन पोंचविणें ह्या गोष्टी, एका कानानें ऐकली, दुसऱ्या कानानें सोडून दिली अशांतल्या नव्हेत. विचार करण्यासारख्या आहेत. अन्योन्याविषयीं अशा प्रकारचें प्रेम जडणें हेंच सुखरहस्य आहे.

# स्वामिभक्त सुभेदार मल्हारराव

तो काळच कांहीं विलक्षण होता. अफाट पसरले-ल्या वाळवंटांत, चटाचट पाणीदार मोतीं दिसूं लागा-वींत, अशांतलाच त्यावेळीं प्रकार झाला ह्मणावा लाग-तो. रानावनांत शेळ्या मेंढ्या राखणाऱ्या धनगराच्या कुळांत साहसिक वीर, कुशल सेनानायक, विलक्षण समयसूचक व चांगला मुत्सद्दी जन्मास यावा, हें आ-श्चर्य नव्हे काय? पण याचें जों आश्चर्य करावें तों पुढचा प्रकार पाहून मन थक्क होऊन जातें! दुसऱ्या एका धनगराच्या कुलांत जन्मास आलेली कन्यका सु-भेदारांची स्नुषा होऊन, तिनें आपल्या निर्मल चरित्रानें आर्यावर्ताच्या इतिहासाला धन्यता आणली! मातोश्री अहिल्येची किती ह्मणून स्तुति करावी? सुभेदारांनीं राज्य मिळविलें आणि महासाध्वी अहिल्येनें त्याचें जतन केलें. सभोंवार रणधुमाळ्या माजून रक्तांचे पाट वाहत व प्रेतांचे खैच पडत, पण अहिल्या माईनें तीस वर्षें प्रजाजनांचें पालन पुत्रवत् केलें. भोजराजजींची क-न्या सुभेदारांची स्त्री गौतमाबाई ही देखील शहाणी व सद्गुणी होती. सारांश तो काळच चांगलीं मनुष्यें ज-न्मास येण्याचा होता, हेंच बारकाईनें पाहूं लागलें अ-सतां प्रत्ययाला येतें. असो.

निंबाळकराच्या फलटणापासून दहा बारा मैलांवर होळ ह्मणून एक लहान गांव आहे, त्या गावांत मल्हा-

रराव जन्मास आला. तो फारच गरीब घरांत जन्मास आला होता. त्यांत, तो पांच वर्षांचा झाला नाहीं तोंच त्याचा बाप मृत्यू पावला. तेव्हां अर्थातच पुढें सुभेदार ह्मणून हिंदुस्थानभर गाजलेला मल्हारी भाकरीच्या तुकड्याला महाग झाला! मल्हारीचा बाप वारल्यावर त्याची आई तिचा तळोद्यास भाऊ होता, त्याच्याकडे जाऊन त्याजपाशीं राहिली. त्याचें नांव भोजराजजी बारगल. तो पांढरे सरदार यांजपाशीं एक बारगीर होता. या मल्हारीच्या मामानें तो अंमळ मोठा होतांच त्याला थोडींशीं मेंढरें वळायला दिलीं. बिचारा पोरका मल्हारी रोज रानांत मेंढरें घेऊन जात असे. एके दिवशीं मेंढरें राखीत तो एका वृक्षाखालीं बसला असतां, त्याचा सहज डोळा लागला. तो निजला असतां, त्याच्या तोंडावर दिनपतीचे तीव्र किरण पडूं लागले. त्यांची त्याला बाधा होऊं नये अशी दयाबुद्धि उत्पन्न होऊनच कीं काय, जवळच्या वारुळांतून एक मोठा नाग बाहेर आला व त्यानें मल्हारीच्या मस्तकावर आपली फणा धरिली. कर्मधर्मसंयोगानें याचवेळीं त्याची आई त्याला भाकर घेऊन आली. मुलाकडे पहातांच तिच्या पोटांत धस्स झालें. ती त्याच पावलीं धांवत धांवत आपल्या भावाकडे गेली व भावाला आणि आणखी जवळच्या कांहीं मंडळींना घेऊन आली. ज्या नागराजानें मल्हारीच्या तोंडाला ऊन लागूं नये ह्मणून त्यावर आपली फणा छत्रीसारखी धरली होती, तो मंडळी येताहेत असें पाहून आपल्या वारुळांत गेला. आलेल्या मंडळींनी मल्हारीला उठवून घरीं नेलें. ही गोष्ट तेव्हांच

गांवांत पसरली. कित्येक ब्राह्मणांनीं भोजराजजीला सांगितलें, तुझा भाचा मोठा भाग्यवान् होईल. त्याला राज्यप्राप्ति व्हावी असा हा शुभशकुन आहे. भोजराजजीचा या सांगण्यावर विश्वास बसला व त्यानें मल्हारीला जें मेंढ्या वळण्याचें दरिद्री काम सांगितलें होतें तें त्याजकडून काढून त्याला पुढें उदयास यायला मार्ग व्हावा ह्मणून घोड्यावरचा राऊत बनविलें आणि पांढरे सरदारांच्या पथकांत नौकरी लावून दिली. पुढें त्यानें आपली बारगिरी मल्हारीला दिली. याचवेळीं मराठे व निजाम उल्मुलूख यांच्यांत लढाई उत्पन्न झाली. त्या लढाईत मल्हारीच्या भाग्योदयास सुरवात झाली. या होतकरू वीराच्या हातून निजामाकडला एक सरदार प्राणास मुकला. त्याची मोठी वहावा झाली व पांढरे सरदारांनीं त्याला पंचवीस स्वारांची मनसबी दिली. भोजराजजीला या गोष्टीनें आनंद होऊन त्यानें आपली सुगुणी व रूपवती कन्या गौतमाबाई इजबरोबर मल्हारीचा विवाह लावला. या पुढें मल्हारी पांढऱ्याच्या जहागिरींत आपल्या चाकरीवर असतां, पेशव्यांचें एक पथक माळव्यांत जावयास निघालें होतें तें त्याच्या यजमानाच्या जहागिरीच्या मुलखांतून जाऊं लागलें. त्याला हा पुढें पेशव्यांचा एकनिष्ठ सेवक बनलेला मल्हारी आडवा गेला व तुह्माला मी माझ्या यजमानाच्या मुलखांतून जाऊं देणार नाहीं, असें निकरानें सांगूं लागला. त्यानें रस्ताच बंद केला तेव्हां हें प्रकरण हातघाईवर आलें. तरी मल्हारी मुळींच डगला नाहीं. यावेळीं त्यानें जें धैर्य दाखविलें तें खुद्द श्रीमंत बाजीराव

साहेब पेशवे यांच्या कानापर्यंत गेलें. गुणी मनुष्याला गुणांची खरी पारख. त्यांचा मल्हारीवर लोभ जडला व बारगलापासून त्यांनीं त्याला मागून घेतलें आणि पांचशें स्वारांची मनसबी सांगितली. बाजीराव साहेबांच्या नौकरींत मल्हारी गेल्यावर त्याच्या शौर्यादि गुणांस विशेष भरती आली. त्याची कर्तबगारी पाहून श्रीमंत बाजीराव साहेब फार खुष झाले व चार वर्षांची नोकरी होते न होते तों मल्हारीला नर्मदेच्या उत्तरेकडचे बारा महाल मिळून तो मल्हारराव होळकर बनला. या पुढें तर सुभेदार मल्हाररावांनीं श्रीमंतांची विशेष मर्जी बसावी अशा प्रकारचे पराक्रम केले व माळव्यांत श्रीमंतांना पुष्कळ मुलूख मिळवून दिला. ज्याप्रमाणें सुभेदार पराक्रम करीत होते त्याप्रमाणें श्रीमंतही पण त्याला उत्तरोत्तर वाढवीत होते. इ.स. १७३२ सालीं दयाबहाद्दर माळव्याचा सुभेदार याचा पराभव करून जो मुलूख जिंकून घेतला त्यांतील बहुतेक मुलूख श्रीमंतांनीं मल्हाररावाला फौजेच्या खर्चाकरितां ह्मणून जहागीर करून दिला. श्रीमंत बाजीराव साहेब याप्रमाणें मल्हाररावाला प्रोत्साहन देत गेल्यामुळें श्रीमंतांवर त्याची विशेष भक्ति जडली.

श्रीमंत बाजीरावसाहेब पेशवे मरण येईपर्यंत स्वराज्याची वृद्धि करण्याकरितां तलवार चमकावीत होते. त्यांच्याबरोबर सुभेदारही पण आपली तलवार घेऊन होते. बाजीरावसाहेबांच्या मृत्यूनें सर्व मराठे सरदारांच्या कमरा बसल्यासारख्या झाल्या. त्यांत मल्हाररावाला तर भारीच खेद झाला. श्रीमंतांचें अकालमरण

हा स्वराज्याला अपशकुन झाला असेंही मल्हाररावाच्या मनानें घेतलें. आतां श्रीमंतांच्या मागें मिळविलेल्या मुलखांचें योग्य रक्षण कसें होईल, सर्व सरदार एक जुटीनें कह्यांत कसे राहतील याची त्याला चिंता वाटूं लागली. मल्हारराव एकटा बसला असला ह्मणजे, नर्मदा काठचा तो काकडेगांव, वैशाख महिन्यांतला रखरखीत दिवस, श्रीमंत बाजीरावसाहेबांची आसन्न मरणमूर्ति व त्या वेळचें त्यांचें केविलवाणें भाषण यांची त्याला आठवण होऊन मरणप्राय दुःख होई. बाजीरावसाहेबांच्या मागें चिमणाजी अप्पा नऊ दहा महिन्यांच्या आंत परलोकवासी झाले हें मल्हाररावाच्या मनांत वारंवार येऊन तो अगदीं दडपून जाई. सारांश मल्हाररावाला श्रीमंतांविषयीं व स्वराज्याविषयीं विशेष काळजी वाटे. नानासाहेबांनीं पेशवाईचीं वस्त्रें घेतल्यावर ते पेशवाईची व्यवस्था करण्यास असमर्थ होते असें मुळींच नव्हतें. तरी मल्हाररावाला नानासाहेबांची उमर लहान केवळ वीस वर्षांच्या आंतली, व आंतड्यांचा कोणी थोर मनुष्य बुद्धिवाद सांगायला नाहीं याची दहशत वाटे. तो पुण्यास आल्यावर नानासाहेब भेटीला बोलावोत अगर न बोलावोत, श्रीमंतांचें रोज एकदां दर्शन घ्यायचें व कुशल प्रश्न विचारायचे हा त्याचा नियम असे. मल्हारराव दर्शनाला गेल्यावर नानासाहेबांच्या चेहऱ्याकडे फार बारकाव्यानें पहात असे. नानासाहेब विनोदी स्वभावाचे व मोठे दिलदार होते. यामुळें सहज पहाणारांना ते आनंदी दिसत. तथापि सुभेदार मल्हाररावांना, नानासाहेब आनंदी दिसतात, पण

आंतून ते जळत असावेत, असा संशय आला होता. कित्येक दिवस ते आपला संशय खरा आहे कीं खोटा आहे याच विचारांत अडखळलेले होते. शेवटीं एके दिवशीं त्यानीं ही गोष्ट श्रीमंत नानासाहेबांना विचारायची असा निश्चय केला. सुभेदारांनीं नानासाहेबांना एकांतांत गांठलें व क्षमा मागून विचारलें कीं, आपल्या मनांत कशाची तरी मोठी काळजी असावी असें या सेवकाला वाटतें, तें खरेंच काय ? आह्मीं आपल्या पदरीं, घातलेल्या अन्नानें वाढलेले असतांना आपण काय ह्मणून असें सदां काळजींत रहावें ? आपल्याला कसली काळजी लागली आहे ती या सेवकाला सांगावी. आह्मीं असतांना आपण आपल्या मनांत जळत राहूं नये अशीं या पायांपाशीं विनंति आहे.

सुभेदार आपल्या काळजीचें कारण जें विचारीत आहेत, तें केवळ स्वामिभक्तीनें विचारीत आहेत हें नानासाहेबांच्या लक्षांत लागलींच आलें. तरी मनाच्या संकोचास्तव तें त्यांच्यानें सांगवेना. नानासाहेब आपल्या प्रश्नाचें उत्तर देत नाहींत असें पाहून सुभेदार ह्मणाले, या दासापाशीं काळजीचें कारण सांगण्यास आपल्याला संकोच वाटत असला, तें सांगण्यास सारखें नसलें तर माझा कांहीं आग्रह नाहीं. पण आपण, आह्मी आपल्या पायांपाशीं आज्ञा कराल ती सेवा करण्यास एका पायावर तयार असतांना काळजींत रहावें याचें आह्माला वाईट वाटतें. वयें झालीं नसतांना ईश्वरानें पुण्यप्रताप बाजीराव साहेब व आप्पासाहेब यांना नेलें, राज्याचा सर्व भार आपल्यावर पडला, या गोष्टीला कोणाचा

उपाय नाहीं. आपण धीर खचूं देऊं नका. हें सुभेदारांचें बोलणें ऐकून नानासाहेब ह्मणाले, मृत्यु कोणाच्या हातचा नाहीं. त्याबद्दल शोक करणें व्यर्थ आहे व तो मी करीतही नाहीं. तुमच्यासारखे या स्वराज्याचे अचल आधारस्तंभ असतांना मी धीर काय ह्मणून सोडीन ? शिंदे, तुह्मी, गायकवाड, जाधव, पवार, कदम वगैरे सरदार मंडळी कायम आहांत तर स्वराज्य आणखी वाढवाल, मुसलमानांना रसातळाला नेऊन पोंचवाल, ही मला पक्की खात्री आहे. मीं काळजी करावी असें कांहीं नाहीं. सुभेदार ह्मणाले, आपण आनंदानें राहावें, प्रजांचें पुत्रवत् पालन करावें, धर्म वाढवावा आणि तुह्मीं सांगितलेल्या कामगिऱ्या आह्मीं बजाविल्या ह्मणजे आह्माला प्रोत्साहन द्यावें हेंच आमचें या पायांपाशीं मागणें आहे. मग खरेंच आपल्या जीवाला काळजी नाहींना ? मला संशय आला ह्मणून मीं विचारिलें. यावर नानासाहेब सद्गदित होऊन ह्मणाले, सुभेदार तुह्मी खरे स्वामिनिष्ठ सेवक आहांत, आणि ह्मणूनच तुह्मीं मजकडे बारकाव्यानें पाहून, माझ्या हृदयांतलें शल्य ओळखलेंत. आहे, मला एका गोष्टीची मोठी काळजी आहे ! राज्य पुष्कळ वाढलें आहे, त्याच्या रक्षणाला पदरीं जय्यत सेना आहेत, शत्रू आपल्याला भिऊन आहेत, राज्याच्या व्यवस्थेला चांगलीं माणसें नेमलेलीं आहेत, वसूल खंडण्या येताहेत, हा आमचा वाडा शत्रू शहरांत घुसलाच, तर त्याच्या बरोबर लढविण्यासारखा आहे, पण राज्याला प्रसंगीं उपयोगीं पडणारा कोश तो रिता आहे व वडलांना स्वारी मागून

स्वारी करावी लागल्यामुळें गादीला बरेंच कर्ज झालें आहे. दक्षिणेंत वसूल वाढवून कर्ज फेडूं व कोश रिता आहे तो भरून काढूं असें मनांत आणलें तर दक्षिणची स्थिति तशी नाहीं. या प्रांतांतले लोक गरीब आहेत. सुभेदार, मला जी काळजी लागली आहे ती ही आहे, आणि ह्या काळजींतून आपण कसें पार पडूं तें मला कांहीं समजत नाहीं! हें नानासाहेबांनीं सांगितलेलें काळजीचें कारण ऐकून सुभेदार हांसले आणि ह्मणाले, दक्षिणचे लोक गरीब आहेत असें आपण मानतां व त्या लोकांवर अधिक बोजा कसा बसवावा असें आपल्या मनांत येतें हें उत्तम आहे. या आपल्या गुणांनीं आपण रामचंद्रासारखे लोकांना प्रिय व्हाल. नानासाहेब ह्मणाले हें खरें, पण अशा स्थितींत या अफाट राज्याचा निभाव कसा लागेल. एकाद्या प्रबळ शत्रूनें वर डोकें उचललें नाहीं तोंपर्यंत ही झांकली मूठ सव्वा लाखाची राहील. पण एकादा शिरजोर शत्रु उठला तर याची काय गत होईल? बाजीराव साहेब पुण्यप्रताप होते. अष्टसिद्धी त्यांच्या पुढें उभ्या होत्या. त्यांची गोष्ट निराळी. वाटेल तो सावकार त्यांना पैसे द्यायला तयार असे. यामुळें स्वारीची गोष्ट मनांत येण्याचा अवकाश कीं ते स्वारीची तयारी करीत. पूर्वीच्या सावकारांचे पैसे जर आह्मीं परत केले नाहींत तर आह्मांला कोण पैसे देईल? सुभेदार, बाकीच्या सर्व व्यवस्था ठीक आहेत, पण खजिन्यांत पैसा नाहीं त्यामुळें हा भव्य दिसणारा राज्यरथ केव्हां कलंडेल याचा नेम लागणार नाहीं, ही काळजी माझ्या हृदयांत घर करून

राहिली आहे, आणि हिच्यामुळें कांहींएक मला गोड लागत नाहीं. व वारंवार माझ्या मनांत ही गोष्ट येते, कीं वडलांनीं पेशवाई मिळविली ती माझ्या हातून राखली जाईल का ? का स्वराज्याचा मोक्षच माझ्या हातून व्हायचा आहे ? ! कारण चांगलें व्हायला वेळ लागतो, वाईट व्हायला मुळींच वेळ लागत नाहीं. हे नानासाहेबांच्या तोंडून निघालेले उद्गार ऐकून सुभेदारांना फार वाईट वाटलें. सुभेदार ह्मणाले, आपलें राज्य दक्षिणेंत तेवढें आहे, असें नाहीं. बहुतेक सर्व हिंदुस्थान देश आपल्या सत्तेखालीं आहे. दक्षिणेंतून पैसा गोळा होण्यासारखा नसेल. ह्मणून उत्तरेकडे स्थिति अशी नाहीं. तिकडे पुष्कळ संपत्ति आहे. आपली आज्ञा होण्याचाच काय तो अवकाश आहे. आपण ह्या गोष्टीची मुळीं देखील काळजी करूं नये. सर्व हिंदुस्थानांतली संपत्ति आपण आज्ञा कराल तर आपल्या वाड्यांत आणून सांठवूं. आपण याची काळजी करीत कां बसलांत ? आह्मांला आज्ञा करायची होती ह्मणजे एव्हांना सर्व सावकारांचें कर्ज देऊन टाकलें असतें. असो. आतां ह्या गोष्टीची काळजी करूं नये. दहाजण दहा मुठी आणूं तर तेव्हांच गादीला झालेलें कर्ज फेडून टाकूं. सुभेदारांच्या या भाषणानें नानासाहेबांना किती आनंद झाला असेल याचा वाचकांनीं विचार करावा.

पेशव्यांच्या पदरच्या इतर सरदारांसंबंधानें खात्रीनें सांगतां न येवो, पण मल्हारराव होळकरांची स्थिति हा काळपर्यंत व याच्याही पुढें दहा बारा वर्षें अशी होती कीं, पुण्यास श्रीमंतांना इजा व्हावी व त्याच्या

वेदना सुभेदार असतील तेथें त्यांस होत असाव्या! सुभेदारांची प्रभुचरणीं अशा प्रकारची निष्ठा होती ह्मणूनच त्यांना नानासाहेबांना कांहीं काळजी असावी असा संशय आला, व त्यांनीं त्याची शहानिशा करून घेतली. ही दंतकथा जेथून कळली तेथून असेंही समजण्यांत आलें कीं, सुभेदारांनीं श्रीमंतांची कर्जबाजारी स्थिति जाणून कांहीं दिवसांपूर्वीं पुष्कळ पैसे पाठविले होते, पण ते मधल्या मधें गडप झाले व या रागावरून सुभेदारांनीं आपल्या पदरचे कांहीं लोक कामावरून दूर केले. असो. नानासाहेबांच्या बोलण्यावरून राजाचा कोश भरपूर असणें फार जरूरीचें आहे याचा सुभेदारांच्या हृदयांत चांगला प्रकाश पडला. आणि ह्या वेळेपासून त्यांनीं मिळतील तिकडून पैसे ओढण्याचा निश्चय केला. सुभेदार मल्हाररावांचें चरित्र ज्यांनीं वाचलें असेल त्यांस ही गोष्ट तेव्हांच समजून येईल. यापुढें त्यांनीं लढाया मारून प्रांत काबीज केले नाहींत असें नाहीं. पण त्यांचें विशेष लक्ष लुटीकडे असे. एकदम छापा घालून दहा वाटांनीं दहांनीं निघून जायचें, व फिरून सर्वांनीं एके ठिकाणीं जमायचें, हें श्रीछत्रपतींनीं आपल्या शिपायांस दिलेलें शिक्षण लुटीच्या कामीं चांगला उपयोग करितें असें मनांत आणून सुभेदारांनीं आपल्या शिपायांना तसें शिक्षण दिलें व या कामीं सुभेदारांचे स्वार, शिपाई चांगलेच तरबेज झाल्यामुळें त्यांचा इष्ट हेतु चांगल्या प्रकारें तडीस जाऊं लागला. एकदां तर या कामांत तरबेज झालेले आपले शिपाई स्वार सुभेदारांनीं दिल्लीच्या तटापर्यंत नेले होते. तेथें

कालिका भवानीची मोठी थोरली यात्रा भरली होती व ती शिकार साधण्याचा सुभेदारांचा विचार होता. यात्रेकरितां जमलेले लोक ऐषआरामांत निमग्न आहेत तों एकदम जशी वावधूळ यावी त्याप्रमाणें सुभेदारांच्या स्वारशिपायांची फळी त्यांच्यावर पडून दुकानदार व गिऱ्हाईक यांना सरसकट लुटून वावधुळीप्रमाणेंच पाहतां पाहतां नाहींशी झाली. एकदां दिल्लीचा बादशहा महमदशहा व त्याची बेगम मलिका झमाना मोठ्या डामडौलानें कोठें चालली असतां सुभेदारांनीं चमेल शिकंदरा येथें त्यांची स्वारी गांठून एकाएकीं त्यांच्यावर हल्ला केला. बादशहाच्या स्वारींतले लोक मोठ्या खुषींत जेवत, खात, हुक्का पीत पडलेले होते. त्यांच्यावर सुभेदारांच्या लोकांची टोळधाड पडल्यावर मग त्यांचा तनाना काय पुसावा ? वेलींवरचीं किंवा पुष्पतरूवरचीं फुलें काढून घ्यावींत त्याप्रमाणें सुभेदारांच्या लोकांनीं बादशहा व बेगम यांच्या स्वारींतील लोकांची स्थिति केली. मोलवान पदार्थ असा त्यांजपाशीं राहूं दिला नाहीं. बादशाहीं रथ, गाड्या, तंबू, डेरे, सोन्यारुप्याचीं भांडीं, शालजोड्या, किनखापी भरजरी वस्त्रें, जनानखात्यांतील मोतीं व रत्नें यांचे बहुमोल दागिने अशीं अगणित लूट या हल्ल्यांत सुभेदारांनीं मिळविली. या हल्ल्यांत महमदशहा आपला जीव संभाळून दिल्लीस पळून गेला. बेगम मलिका झमाना तिच्या दासी व आणखी बरेच लोक सुभेदारांच्या हातीं लागले. परंतु सुभेदारांनीं मग त्यांस मुळींच ताप दिला नाहीं इतकेंच नव्हे, तर त्यांचा योग्य बंदोबस्त ठेवून त्यांस

दिल्लीस पोंचतें केलें. सुभेदारांनीं अशा ज्या लुटी मारल्या, त्यांतील पुष्कळ पैसा त्यांनीं पुण्यास श्रीमंतांकडे पाठविला. त्यांनीं आपल्या स्वतःचा तळिराम गार केला असला तर त्यांत कांहीं नवल नाहीं. तळें राखील तो पाणी चाखल्यावांचून रहाणार नाहींच. पण ह्या गोष्टीवरून ध्यायचें एवढें कीं, सुभेदार मल्हारराव होळकर यांच्या अंतःकरणांत श्रीमंतांविषयीं खरी कळकळ वसत होती. त्याखेरीज त्यांच्या हातून वरची गोष्ट झाली नाहीं.

---

# शेवटचे बाजीराव.

## सामान्य विचार.

या कपाळकरंट्या, पेशवाईचा नायनाट करणाऱ्या गृहस्थासंबंधानें कोणीही लिहूं किंवा बोलूं लागलें असतां, त्याच्यावर शिव्यांची लाखोली वाहिली जावी हें साहजीक आहे. रावबाजी पेशवाई चालविण्यास अगदीं अयोग्य ठरले हें कोणाला खोडून काढतां येणार नाहीं. रावबाजीविषयीं जी कांहीं माहिती झाली आहे, त्यांच्या लहानपणच्या ज्या गोष्टी ऐकल्या आहेत, त्यांचें येथें दिग्दर्शन करायचें आहे.

ज्या बाईचें नांव ठेवण्यांत नांव ठेवणारे सफई फसले, जी महा कजाग, दुष्ट, मत्सरी, कपटी, क्रूर, राक्षसी अंतःकरणाची ठरली, त्या बाईच्या पोटीं जन्मास आलेले हे बाजी ! अशा खराब स्त्रियेचे घुटीनें व दुधानें वाढलेला पाजी न निपजला तर तो चमत्कार. पण वाचकहो, बाजीरावाच्या शैशवांत व पुढें मिस्रूड फुटूं लागण्याच्या सुमारास त्याला ज्यांनीं ज्यांनीं पाहिलें होतें त्यांना त्यांना हा राजबिंडा पेशव्यांच्या कुलाची कीर्तिं वाढविणारा होईल असें वाटलें होतें ! बाजीरावाचा चेहेरा मोहरा फार सुंदर. डोळे पाणीदार. नेहमीं हसतमुख. बोलणें फार गोड. बाजीरावाच्या बोलण्यांत असें कांहीं प्रेम होतें कीं, तो बोलूं लागला ह्मणजे त्यानें बोलतच रहावें असें ऐकणाराला वाटे. कसाही अढी-

बाज असो, बाजीरावानें एकदां बोलण्यास सुरवात केली, कीं तो मोहून जाऊन त्याला अगदीं वश होई. नानांचा विश्वासू कामगार बळवंतराव नागनाथ, व खुद्द नानांनाही ज्यानें आपल्या प्रेमळ बोलण्यानें मोहनी घातली, त्याच्या वशीकरणगुणाची आणखी तारीफ ती काय करायची ? बाजीरावाचें नयनमनोरम सौंदर्य व बोलण्याची अप्रतीम ढब यांचा विनियोग सर्वस्वी रतिसंगर व रतिकूजित इकडे होईल असें त्यावेळीं फारच थोड्या लोकांना वाटलें होतें. कारण उत्तम नराला अत्यावश्यक असे वरचे दोनच गुण बाजीरावाजवळ होते असें नाहीं. सौंदर्याप्रमाणेंच प्रशंसनीय त्याची बुद्धिमत्ता होती. त्याच्या बुद्धीची त्यावेळीं प्रशंसा होत असे, आणि ही प्रशंसा ऐकूनच सवाई माधवरावसाहेबांची भक्ति बाजीरावावर बसली होती. बाजीराव, चिमणाजी अप्पा व अमृतराव या त्रिवर्गांना नानांनीं शिवनेरी येथें कैदेंत ठेवलें होतें हें सवाईमाधवरावसाहेबांना आवडत नव्हतें, व त्यांचा त्यांना कैदेंतून सोडविण्याविषयीं प्रयत्न चालला होता हें इतिहासप्रसिद्ध आहे. बाजीरावानें शास्त्राध्ययन चांगलें केलें होतें व न्यायशास्त्रांत तर तो वाखाणण्यासारखा पारंगत झालेला होता. लढाईचें नांव निघालें कीं, बाजीरावाच्या पोटांत धडकी भरून अंगावर कांटा उभा राही, इतका तो भित्रा होता असें ह्मणतात. पण त्यावेळीं थोरांच्या मुलांना घोड्यांवर बसून फेरफटका करणें, पट्टा खेळणें, तीर मारणें, निशाण मारणें, भाला खेळणें या ज्या विद्या शिकवीत त्या बाजीराव शिकलेला होता. इतकेंच

नाहीं, तो एकोणिस वर्षांच्या वयाचा झाला तेव्हां त्यास घोड्यावर सर्वोत्कृष्ट बसतां येत असे. तो दांडपट्टा चांगला खेळे. तीर अचूक मारी. भाला खेळण्यांत तर त्याचा लौकिक झाला होता. सारांश त्यावेळीं शूर पुरुषांना लहानपणीं जें शिपाईशिक्षण मिळत असे तें बाजीरावास त्याच्या लहानपणीं मिळालें होतें.

चोर, जार, वंचक, खल यांच्यावर कैदेनें कदाचित् उपकार होत असतील, पण राजकुलीनावर अपकार झालेले दृष्टीस पडतात. त्यांची कैद ह्मणजे कांहीं रोजची सहा पैशांची चंदी, अंगांत घोंगडीची बंडी, हातांपायांत बेडी व दिवसां एकसारखा मागें मातीच्या पाट्या व्हायचा लकडा अशांतली नव्हे. यथेच्छ मिष्टान्नें चापायचीं व लोळायचें ! ना काम ना धाम. उद्यांच्या ताटाची किंवा अंगावरचा दुशेला फाटला तो दुसरा कसा मिळेल याची काळजी नाहीं. कैदेंत राहिलें ह्मणून जवळ दांतावर मारायला देखील पैसा नाहीं, असेंही नाहीं. अशा प्रकारची स्थिति असल्यामुळें काय होतें कीं, त्या राजबिंड्या तरुणांचें मन विषयवासनेनें बद्ध होऊन त्यांत रंगून जातें. मग काय, खावें, प्यावें, रमावें व बसल्या बसल्या भयंकर कारस्थानें होतील तितकीं करावींत. कोणाला ह्मणावें मला गादीवर बसविल्यास अमुक प्रांत देईन, कोणाला ह्मणावें निम्में राज्य देईन, कोणाला ह्मणावें तुमच्या अमुक पलटणी चाकरीस ठेवीन , बिनतक्रार अमुक खंडणी देत जाईन. सारांश राजबिंड्या तरुणांना कैदेंत ठेवल्यापासून त्यांजवर किंवा देशावर उपकार न होतां उलट दोघांवर र-

गड अपकार मात्र होतात. बाजीराव मातेच्या उदरांतून बाहेर आला तेव्हांच विषांकुर होता किंवा तो अमृतवल्लीचा अंकुर होता हें ठरविणें कठिण आहे. तथापि पुढें जो त्याचा विस्तार झाला व जीं फळें दृष्टीस पडलीं त्यांवरून त्याला विषतरु ह्मणावें लागतें.

राजबिंड्यांना कैद अपकार करते, असें म्हटलें त्याचा याच वेळचा आणखी एक दाखला डोळ्यापुढें दिसत असल्यामुळें जरा तिकडे वळतों. सवाईमाधवरावसाहेबांच्या नांवानें राज्य चाललें होतें, पेशव्यांची कीर्ति यांच्या कारकीर्दींत सवाई झाली, या गोष्टी यद्यपि खऱ्या आहेत, तरी श्रीमंत नानांच्या कैदेंत होते, नानांच्या बाहेर त्यांना मुळीं जातां येत नसे, हें वाचकांस माहीत असेलच. श्रीमंतांना आपल्या धाकांत ठेवण्याचा नानांचा मनोगत हेतु कांहींही असो, त्यासंबंधानें उहापोह करण्याचें सध्यां कारण नाहीं. श्रीमंतांना नानांची जी कैद होती ती वाईट होती असेंच केवळ कोणाला ह्मणतां येणार नाहीं. इतकेंच नव्हे, सवाईमाधवराव जो नीतीचा जणो काय मूर्तिमंत पुतळा झाला होता, तो नानांच्या कैदेनें होय असें ह्मणण्यासही दिकत वाटत नाहीं. बाजीरावाच्या बुद्धिमत्तेची जेव्हां ख्याति ऐकली, तेव्हां दायादाच्या नात्यानें पहातां सवाईमाधवरावांच्या मनांत मत्सर उत्पन्न व्हायचा. परंतु असें न होतां मत्सराच्या अगदीं उलट माधवरावांची बाजीरावावर प्रीति बसली, हें माधवरावसाहेबांच्या नीतिमत्तेचें निष्कलंक फल होय. नानांच्या कैदेमुळें माधवरावसाहेबांना दुर्गुण जडले नाहींत ही

गोष्ट खरी आहे, तरी परिणाम चांगला झाला नाहीं हें निर्विवाद आहे. पाटिलबोवांच्या संगतीनें श्रीमंतांची बुद्धि पालटेल अशी नानांना भीति वाटत होती. पण ती भीति (एकट्या नानांच्या संबंधाची होती) तरी मराठ्यांना घातक झाली. आपल्या वजनांत कमीपणा होऊं नये म्हणून नाना शिंद्यांचा हेवा करीत. पण या हेव्यामुळें मराठ्यांच्या जुटीच्या जोरांत तूट आली. माधवराव साहेबांना होती तितकी नानांची कैद नसती, तर खचीत खचीत जुटींत तूट न पडतां मराठ्यांचें बल अधिक वाढलें असतें. कारण नाना केवढे मुत्सद्दी आहेत, हें माधवरावसाहेबांना चांगलें ठाऊक होतें. त्यांनीं नानांना कधींही जाऊं दिलें नसतें. व पाटीलबोवांच्या मनांत ब्राह्मणांविषयीं जो कांटा वाढत होता तोही त्यांनीं पाटीलबोवांच्या पोटांत शिरून काढून टाकिला असता. पण तो बिचारा करणार काय ! नानांच्या कैदेंत अडकून अगदीं लुळा झाला होता. पाटीलबोवाबरोबर कुठें शिकारीला गेलों तरी त्याबरोबर मी काय बोलतों आहे हें ऐकून घेण्याकरितां मागें नानांचे हेर उभे आहेत, हें त्याला पक्कें समजलेलें ! एकदां बाजीरावाकडून माधवरावसाहेबांस निरोप आला होता, कीं तुह्मी पुण्यास व मी शिवनेरीस मिळून दोघेही कैदेंत आहोंत. तुमच्याविषयी माझ्या मनांत किती प्रीति आहे, ती बोलून दाखवितां येत नाहीं. असो. हेही दिवस जातील आणि असा एक दिवस उजाडेल कीं, आपल्या पूर्वजांनीं जशी कीर्ति मिळविली तशी आपण मिळवूं. हा निरोप ऐकून माधवरावसाहेबांना फारच वाईट वा-

टलें. बाजीराव वगैरेंची सुटका करण्याचें त्यांच्या हातीं नव्हतेंच. या निरोपानंतर दोघांमध्यें पत्रव्यवहारही सुरू झाला. तो नानांना कळला व त्यांनीं श्रीमंतांची चांगलीच कानउघाडणी केली. तात्पर्य, माधवरावसाहेब कैदेंत होते यामुळें त्यांचें कांहींएक चालत नसे. त्यांनीं आपल्या कैदेला कंटाळून उडी घालून आत्महत्या करून घेतली हें प्रसिद्ध आहेच. माधवरावसाहेबांच्या अकालिक मृत्यूनें किती बखेडे माजले व शेवट जो काय झाला त्यावरून कैदेचा परिणाम राजबिंड्यावर चांगला होत नाहीं असें म्हणण्यास कांहीं एक हरकत दिसत नाहीं. असो.

बाजीराव हलक्या कानाचा, हलक्या मनुष्यांवर प्रीति करणारा, त्यांच्या तंत्रानें वागणारा, मोठा अविश्वासी व कपटी होता. हे आरोप कोणी खोडून काढण्याचा नसता प्रयत्न केला तर तो वायफळ झाल्यावांचून राहणार नाही. त्याचे जे दुर्गुण सर्वप्रसिद्ध आहेत, त्यामुळें पुष्कळ लोकांना पेशवाईचा अगदीं वीट आला आणि अशा प्रकारें सर्व मराठे विस्कलीत होऊन आलगत पेशवाई इंग्रजांच्या वशांत पडली. बाजीराव हा पेशवाईचीं सूत्रें हातीं घेण्यास नालायक होता ही गोष्ट जरी खरी असली, तरी त्या वेळची मराठ्यांच्या जुटीची स्थिति इतकी वाईट होती कीं, दुसऱ्या एकाद्यानें जरी पेशवाईचीं सूत्रें हातीं धरलीं असतीं तरी भरभराटीचे दिवस त्वरित क्वचितच दिसते. व आपलें घर संभाळतां संभाळतां नाकीं नव येते. अशी स्थिति असतांना बाजीरावासारख्या पुरुषाच्या हातीं सूत्रें आलीं असतां

झालें हें असें न होतां दुसरें काय होणार ? एकादा फांशीची शिक्षा झालेला कैदी, आतां आपण मरणार, मग चाहील तें कां न मागून घ्या, असें म्हणून काय पाहिजे असेल तें मागतों व त्याचें शांतपणें सेवन करितों, तद्वत् प्रकार बाजीरावांनीं केला, असें त्यांच्या दिनचर्येच्या गोष्टी ऐकून म्हणावें लागतें. आपल्या राज्याचें रक्षण करण्याकरितां काय काय केलें पाहिजे याचा विचार यथातथाच ! पूर्वीं कधीं जमला नव्हता इतका जमलेला खजिना रासरंग करून उडवायचा व भटांना यथेच्छ खायला घालून त्यांचे पोकळ आशीर्वाद घ्यायचे हा बाणा रावबाजीनीं पत्करला होता. अठरा कारखान्यांपैकीं जरूरीचे कारखाने तेवढे चालले होते. तोफखान्यांत बटक्यांची वस्ती झाली होती म्हणतात ! सगळा स्त्रियांच्या बरोबर खेळ, तेव्हां पुष्कळ बटक्या पाहिजेतच !

तोफखान्यांत ज्याप्रमाणें रांडवंशांतील बटक्यांनीं खोल्या भरल्या तसाच प्रकार इतर कारखान्यांत होण्याचा संभव नाहीं, तरी ते बहुतेक कसे तरी चालले होते. दिसेल त्या मार्गानें पैसा जुळवायचा. दप्तरामध्यें जुनीं माहितगार माणसें लागतात, याचा विचार नाहीं. कनक आणि ताजीतवानी कांता हाताला लागली कीं हा फुटक्या नशिबाचा पुतळा पाघळलाच ! दप्तरामध्यें लागलींच प्रवेश. आंतून हातळलेले यजमान, मग भीति कोणाची ? वाटेल त्याचीं इनामें जप्तींत टाकून नाकें दाबावींत ! हवा तसा हमामा घालावा. हीच अवस्था मामलयांच्या नेमणुकींची. जिकडून पैसा अधिक तिकडे

मनाचा ओढा. न्याय तिकडचा! मनुष्यावर प्रीति त्याच्या अनुरोधानें कलायची. पण वाचकांना या गोष्टींची कितपत खंति वाटेल हें संशयात्मकच आहे. कारण सगळ्या तऱ्हा अंगवळणीं पडल्यासारख्या दिसतात. रावबाजींच्या कारकिर्दीतला हतळाहतळीचा प्रकार, स्त्रियांचा प्यारा बाजार तर काय, सध्यांच्या राज्यांत आधिक्यानें आहे असें बोलतांना लोक दिसतात! स्त्रीपुरुषांचे नाच पाह्यला मिळतात आणखी यापेक्षां अधिक काय सांगावें? मिळवण्याची तऱ्हा निराळी, पण पैसा ओढण्यांत आमच्या सध्यांच्या दयाळू सरकारची सरशी, हें निर्भिडपणानें कबूल करावें लागतें. पैसा तेवढा गुळचट, हा कित्ता लग्नापर्यंत सुविद्य प्रजाजनांनीं गिरविला, कुबडी, फेंगडी, नकटी, चिपडी कशाहि कुलगोतोची असो, पाटीभर हुंडा ओतला कीं ती मुलगी उत्तम. प्रजेला वळण कोणाचें लागतें हें कांहीं सांगायला नको! रावबाजी हलक्या लोकांच्या संगतींत वाढले होते त्यामुळें त्यांच्या कृपेनें ज्यांनीं हुजऱ्यांचीं कामें करावींत ते खुषामतीनें राज्यकारस्थानांत शिरले. पेशवाईची अशा प्रकारची घटना झाल्यावर शेवटीं हातांत फुटकी करवंटी आली याचें आश्चर्य कसचें?!

---

## रावबाजींचे पेशवाईला पाय.

जो गति ग्राह गजेंद्र कीं, सो गतभई है आज.

'या अल्ला, या खुदा, कैसा बखत लाया!' केकवेळां असे दुःखोद्गार ज्या स्वराज्यानें शत्रूंकडून का-

ढायला लावले, त्या पेशवाईच्या मसनदीला रावबाजींचे पांढरे पाय लागण्याचा समय येतांच, सगळा रंग पालटला ! सचिवकुल–मुकुटमणि नाना फडणवीस, ज्याची अलौकिक हुषारी पाहून शहाणपणाची घमेंड मारणाऱ्या विजातियांनीं तोंडांत बोटें घालावीं, त्याच्या कारस्थानाचे पीळ चढतनासे झाले. बेबंद नगरी आणि झोटिंग बादषाही अशा प्रकारांना सुरवात झाली. सवाईमाधवरावसाहेबांच्या मृत्यूनें रिकाम्या झालेल्या पेशव्यांच्या गादीवर कोणाला बसवावें या संबंधांत मतभेद पडून कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहींसा झाला. राघोबादादांच्या वंशाला नमस्कार करायचा नाहीं असा नानांचा बेत असल्यामुळें त्यांनीं यशोदाबाईसाहेबांच्या मांडीवर दत्तक देण्याचा बेत चालविला. त्यांनीं आपला बेत सिद्धीस नेण्याकरितां बहुतेकांचें अनुमोदन घेतलें. परंतु रावबाजींनीं शिंद्यांचा दिवाण बाळोबातात्या याला पहिल्यापासूनच भारलें असल्यामुळें तो नानांच्या बेताला प्रतिकूल झाला. तथापि शिंद्यांचे सेनानायक जिवबादादा बक्षी यांचें मत नानांच्या बाजूचें असल्याकारणानें बाळोबाला चिवचिव करीत बसावें लागलें होतें. पण काळाची गति वक्र ! जिवबादादांचा मृत्युकाल जवळ आला व त्यांनीं मरतेसमयीं सांगितलें कीं, राघोबादादांची औरस संतति असतांना दत्तक घेणें नीट नाहीं. मग काय ? बाळोबातात्याचें पिकलें ! शिंदे दौलतराव शिंदेच ! वेसण घातलेल्या बैलांत व त्यांच्यांत विशेषसा फरक नव्हता. परदेशच्या लोकांची हिंदुस्थानांत टीचभर जागेवर मालकी राहूं द्यायची नाहीं

अशी ज्याची इच्छा व ती पूर्ण करून दाखविण्यास जो समर्थ होता त्या महादजीच्या मागें शिंद्यांची दौलत संभाळायला दौलतरावावांचून कोणी दुसरा कर्तबगार मनुष्य सांपडूं नये यांतहि विपरीत कालाचा दुर्विलास दिसून येतो ! दौलतरावावर बाळोबाची छाप होती. शिवाय रावबाजींनीं दौलतरावाला आपल्याला गादीवर बसविल्यास चार लक्षांचा मुलूख आणि पुण्यास मुक्काम होईल तेथपर्यंतचा लष्करचा खर्च देण्याची लालूच लाविली होती. दौलतरावाला वश करण्याचा रावबाजींचा एक प्रयत्न तर कादंबरीकाराला चांगलें खाद्य होण्यासारखा होता. पूर्वीं वाचकांस अभिवचन दिलें असल्यामुळें तें प्रकरण याच्याच पुढें स्वतंत्र रीतीनें लिहिलें आहे.

यावेळीं पेशव्यांच्या पदरच्या सरदारांत शिंदे फौजबंद असल्यामुळें त्यांचा सर्वांवर दरारा होता. आपला सचिवकुल–मुकुटमणी बडा खंबीर, स्वरचित काहुरांत गुंतवून कोणालाही चें चें करायला लावणारा, परंतु शिंद्यांच्या दराऱ्यानें चीत झाला. पुण्यांतल्या बाजारच्या कुटाळ–मंडळीस ही जुंपलेली कुस्ती कोण मारतो, हा शिळोप्याच्या गप्पांचा एक विषय होऊन बसला. शिंद्यांच्या पदरच्या परभू मंडळींना कुस्ती जिंकल्याबद्दलचा मंदील बांधावा लागेल असें कित्येक म्हणत. कित्येक, नाना त्यांना लोळविल्यावांचून राहणार नाहींत असें म्हणत. परंतु नानांचे जे पुरे अभिमानी असत ते, काय करावें हो, यावेळीं तात्या असते तर शिंद्यानें कशा रंगड्या केल्या असत्या त्या पाहिल्या असत्या

असें म्हणत. यावर मेल्या म्हशीला दहा शेर दूध असेंही नानांच्या अभिमान्यांना खिजविण्याकरितां कित्येक म्हणत. शिवनेरीहून बाजीरावाला नाना आणीत नाहींत असें पाहून बाळोबानें दौलतरावाकडून त्यांना तुह्मी बाजीरावाला आणतां कां आह्मी आणवूं, असें विचारिलें. हरिपंत तात्या फडके यांच्यामागें पेशव्यांचें सेनानायकत्व परशरामभाऊ पटवर्धन यांच्याकडे आलें होतें. निजामाबरोबर झालेली खड्र्याची लढाई या ब्राह्मणवीरानें जिंकली, हें प्रसिद्ध आहेच. तरी याचें युद्धकौशल्य हैदरखान व टिपूसुलतान यांच्या सैन्यांतील लोकांना चांगलें माहीत होतें. ते परशुरामभाऊच्या तलवारीचा लौकीक गात.* पेशव्यांच्या सैनि-

---

* परशुरामभाऊंना हैदरखान व टिपू यांच्या सैन्यांतील लोक किती मानित हें पुढील दंतकथेवरून वाचकांस कळून येईल, आणि पूर्वीच्या लोकांत गुण कसे असत हेंही समजेल. एकदां परशुरामभाऊंनीं टिपूला मारीत मारीत श्रीरंगपट्टणांत नेऊन कोंडलें व कोटाबाहेर आपलें सैन्य पसरून तळ दिला. तेथें तळ असतांना, एके दिवशीं प्रातःकाळीं परशुरामभाऊ शौचविधि करून येऊन पाय धुवीत असतांना, कोटावरून एक तोफेचा गोळा सों सों करीत येऊन त्यांच्यापासून दोन हातांवर पडला. थोड्यानें चुकलें, नाहींपेक्षां भाऊंसारखा मोहरा पडायची वेळ आली होती. यामुळें सर्वांना क्रोध आला. आज श्रीरंगपट्टण जाळून पोळून फस्त केल्यावांचून राह्यचें नाहीं, अशा प्रतिज्ञा सैन्यांतील सरदारमंडळी करूं लागून भाऊंपाशीं तयारीचीं शिंगें वाजविण्यास हुकूम मागूं लागली. इतक्यांत कोटांतून एक मनुष्य धांवत धांवत आला आणि भाऊंच्या दर्शनाची परवानगी विनयानें मागूं लागला. पेशव्यांच्या सैन्यांतील लोक कोटावरून

कांवर भाऊंचें वजन होतें. ते नानांच्या बेताच्या बाहेर यावेळीं नव्हते. त्यांनीं नानाना सांगितलें, शिंदे फौजबंद आहेत म्हणून त्यांना भिण्याचें कारण नाहीं. आपण आपल्या बेताप्रमाणें करूं व शिंदे उपाई आलेच तर त्यांचीही खोड मोडूं. पण परशुरामभाऊंना स्वतः-विषयीं जितकी खात्री वाटत होती तितकी नानांना वाटत नसल्यामुळें आपला बेत जुळवून आणण्यास त्यांचा धीर होईना. नानांनीं मनांत विचार केला कीं, शिंदे बाजीरावाला जबरदस्तीनें पुण्यास आणून गादीवर बसविणार, मग तें त्यांच्या अगोदर आपणच कां नाहीं करून टाकिलें? ही वेळ नानांच्या शहाणपणाच्या समाप्तीची ह्मणण्यास हरकत नाहीं. यापुढें त्यांनीं कारस्थानें केली नाहींत किंवा त्यांत त्यांस यश आलें

---

आलेल्या तोफेच्या गोळयानें खवळून गेले आहेत हें पाहून तो घाबरला. भाऊंच्या दर्शनाची परवानगी मिळतांच तो त्यांजपाशीं गेला. त्यानें भाऊंना लवून मुजरे केले व हात जोडून सांगितलें, आतां जो वरून गोळा आला, ती तोफ मीं डागली याबद्दल या सेवकाला क्षमा करावी. आपण त्यावरून आज श्रीरंगपट्टणावर निकर केलात, तर आमचे यजमान प्रथम माझें डोकें मारण्याविषयीं हुकूम सोडतील. साहेब, जो गोळा दोन हात मागें पडला तो काय पुढें गेला नसता? पण बंद्यानें तशा दुष्टबुद्धीनें गोळा टाकलाच नाहीं. आपण शस्त्रकुशल आहांत याकरितां आपल्याला गुण दाखवावा म्हणून मीं तो गोळा टाकला. हा त्या टिपूच्या सैन्यांतील गोलंदाजाच्या तोंडून मजकूर ऐकतांच भाऊंनीं त्याची पुष्कळ वाहवा केली व त्याला चांगलें बक्षिस दिलें. या दंतकथेवरून प्रथम सांगितलेल्या दोन्ही गोष्टींचा वाचकांस प्रत्यय आला असेल.

नाहीं असें नाहीं. परंतु याच्या अगोदर त्यांच्या कारस्थानाची जशी अढळ मांडणी असे, तशी यापुढें कोणत्याच कारस्थानांत साधली नाहीं. आणि जो नाना प्रत्यक्ष भावावर विश्वास ठेवायला मनांत शंकायचा, तो निराधार झालेल्या अबलाजनाप्रमाणें कोणावरही विश्वास ठेवूं लागला ! ज्या वंशाला नमस्कार करायचा नाहीं अशी नानांची शपथ, त्याला पेशवाईची गादी देण्याकरितां नानांनीं कारस्थानें केलीं. व पुण्यास कैदेंत ठेवलेला निजामाचा दिवाण मश्रुन्मुलूख याच्या साह्यानें बाजीरावाला गादीवर बसविलें ! याहीपेक्षां आश्चर्याच्या गोष्टी, घाटगे, कुंजर अशांना मसलतींत घेतलें, आपला वाडा सोडून सातारा, वांई, महाड असे पळत सुटले व मसलत सिद्ध झाल्यावर पुण्यास येऊन बाजीराव व शिंदे यांच्यावर विश्वास ठेवून नगरच्या किल्ल्यांत कैदेंत पडले ! यांहून नानांना कमीपणा आणणाऱ्या गोष्टी त्या दुसऱ्या कोणत्या झाल्या पाहिजे होत्या ? नानांच्या अलौकिक शहाणपणाची शेवटीं अशी माती झालेली पाहून, कालगति वक्र झाली ह्मणजे कशाही शहाण्याची अक्कल बोथी पडते असेंच ह्मणणें भाग येतें.

परशुरामभाऊ पटवर्धन व अप्पाबळवंत या दोघांना नानांनीं बाजीरावाला आणण्याकरितां शिवनेरीस पाठविलें. ते बाजीरावाला पुण्यास घेऊन आले. सर्वांच्या भेटी वगैरे झाल्या. पण एकमत असें मुळींच नव्हतें. बाजीरावाला नानांनीं शिवनेरीहून आणिलें व ते आतां त्याला गादीवर बसविणार ह्मणून शिंद्यांचा दिवाण बा-

ळोबातात्या याला वैषम्य वाटूं लागलें. बाजीरावाचें मन नानांविषयीं शुद्ध नव्हतेंच. कारभारांत नाना नसावेत अशीं तो शिंद्यांच्या दिवाणाबरोबर खलबतें करूं लागला. पण परशुरामभाऊंची दोघांनाहि भीति वाटत होती. बाळोबानें परशुरामभाऊंना वश करून घेण्याचे प्रयत्न चालविले. परशुरामभाऊ जसा युद्धकुशल तसा कारस्थानी नव्हता, तरी तो बाळोबातात्याला लवकर वश होईना आणि नानांनीं जर धीर टाकला नसता, तर परशुरामभाऊ पुढें बाळोबातात्यास मिळाला तसा मिळाला असता कीं नाहीं याचा संशयच होता. परशुरामभाऊ वळत नाहींत असें पाहून, बाळोबातात्यानें शिंद्यांची फौज पुण्यावर आणतों अशी धमकी देण्यास आरंभ केला. शिंदे पेशव्यांच्या पदरचेच नव्हेत, तर त्यांचे पहिले जोडे उचलणारे; पण तेच उलट्या गोष्टी सांगूं लागले ! ज्या पुण्यनगरीचें त्यांनीं वंदन करायचें तिच्यावर ते गुरकावूं लागले. सर्व हिंदुस्थानभर जिनें आपला दरारा ठेवला तिला कोणी धनी नाहीं, अशी स्थिति झाली इतकेंच नव्हे, दुष्ट कौरवांनीं द्रौपदीची विटंबना केली, तिचें वस्त्रहरण केलें तसाच प्रकार या नगरीचा झाला ! बाळोबातात्या परशुरामभाऊला वश करण्याच्या यत्नांत होता, तरी ते नानांना घाबरूं नका, बाळोबातात्याच्या धमक्या व्यर्थ आहेत, असें सांगत होते. शिंद्याला व बाळोबाला कैद तरी करावें, किंवा त्यांच्या सैन्याशीं लढाई देऊन त्यांची खोडकी जिरवावी असें परशुरामभाऊ म्हणत होते, पण नानांचा धीर होईना. त्यांना दुष्ट स्वप्नें पडूं लागलीं. पुण्यांत

रहाणें धोक्याचें झाल्यावांचून रहाणार नाहीं असेंही त्यांच्या भ्यायलेल्या मनानें घेतलें. त्यांनीं आपलें सर्व जडजवाहीर बरोबर घेऊन पुणें सोडण्याचा निश्चय केला, आणि विशेष वाच्यता न होऊं देता तो अमलांत आणला. नाना ह्मणजे पुण्यनगरीचें भूषण, पेशवाईचा जबरदस्त आधारस्तंभ, सर्व मुत्सद्यांना मसलत देणारा, सर्वांवर त्याचा दरारा, पण बिचाऱ्याला सुरू झालेल्या बेबंदशाईमुळें पुणें सोडावें लागलें! मिरीं नासलीं ह्मणून जोंधळ्याच्या भावानें विकत नाहींत. नानानीं पुणें सोडलें ह्मणून त्यांनीं आपलीं कारस्थानें सोडलीं नाहींत. साताऱ्यास जाऊन महाराजांना वश करून कांहीं निराळाच घाट घालावा, असें त्यांच्या मनानें घेतलें. हा त्यांचा बेत पुष्कळ शहाणपणाचा होता यांत कांहींएक शंका नाहीं. पण महाराजांच्या भोंवतीं जसें वातावरण असेल अशी नानांची कल्पना होती तसें ते साताऱ्यास गेल्यावर दिसलें नाहीं. गंजलेल्याच नव्हे, मोडून तुकडे पडलेल्या हत्यारांसारखी महाराजांच्या जवळच्या मंडळींची स्थिति होती. कारस्थानें कशीं करावींत, आपल्या अवसानाचा अकटोविकट भरदार देखावा कसा दाखवावा हें महाराजांच्या वातावरणाला मुळींच माहीत नव्हतें. खावें प्यावें लोळावें, नाचरंगांत दिवसरात्रीं घालवाव्यात आणि एके दिवशीं मरून जावें हा तेथील मंडळींचा आयुष्यक्रम ठरलेला होता. अशाही लोकांना हाताशीं धरून महाराजांच्या नांवावर कारस्थान रचण्याचा नानांनीं पुष्कळ प्रयत्न केला. पण शेवटीं तो व्यर्थ झाला. तेव्हां नाना साताऱ्याहून नि-

वून चार दिवस स्वस्थ बसण्याकरितां वांईस गेले.

इकडे पुण्यास परशुरामभाऊ व बाळोबातात्या यांच्या खलबतास सुरवात झाली. हे दोघेही खबरदार असल्यामुळें एकमेकांना वचकून होते. तरी आपल्या कसलेल्या ब्राह्मणसरदारानें कारस्थानांत तो विशेष कुशल नसतांही बाळोबातात्यावर आपली छाप बसविली. दोघांच्या मतानें बाजीरावास कैद करून चिमाजी अप्पास यशोदाबाईंच्या मांडीवर बसवावें आणि परशुरामभाऊंनीं कारभार पहावा असें ठरलें. नाना भिऊन जरी साताऱ्याकडे गेले होते तरी त्यांचा या कामीं विचार घ्यावा हें दोघांनाही बरें वाटलें. त्यांनीं नानांना हा विचार कळविला. नानांना हा विचार पसंत पडला, पण त्यांनीं परशुरामभाऊंस सांगून पाठविलें कीं, बाजीरावाला आपल्या हातांतून जाऊं देऊं नये. यासंबंधानें कित्येकांचें असेंही ह्मणणें आहे कीं, नाना जरी पुण्याहून गेले तरी हें खलबत त्यांनींच जुळवून आणिलें. आणि असें नसेल असेंही ह्मणतां येत नाहीं. कारण या खलबतांत गोविंदराव काळे, गोविंदराव पिंगळे, त्रिंबकराव परचुरे, बाबा फडके, अप्पाबळवंत मेहेंदळे, ही नानांच्या पक्षाची मंडळी होती. नानांच्या मनोगताप्रमाणें परशुरामभाऊंनीं मोठ्या छातीनें चिमाजीअप्पा यांचें दत्तविधान केलें, पण बाजीरावाला आपल्या हातांत ठेवायचें, ही मसलत साधली नाहीं. बाळोबातात्यानें बाजीरावाला आपल्या लष्करांत कैद करून ठेविलें. परशुरामभाऊ प्रमुखत्वानें कारभार पाहूं लागले. नानांच्या पक्षाची सर्व मंडळी आपापल्या कामांवर हो-

तीच. नानांनीं पुण्यास येऊन पूर्ववत् कारभार पाहूं लागावें असेंही सगळयांचें मत पडलें. परंतु स्वराज्याचा नाशकाल येऊन ठेपल्यामुळें, पूर्वीं पानपतच्या प्रकरणांत ज्याप्रमाणें एका मेंधळयांच्या कुळांतील पुरुषांत कलीनें प्रवेश केला, त्याप्रमाणें यावेळींही मेंधळयांच्याच कुळांतील एका पुरुषांत कलीनें प्रवेश केला! हा पुरुष बहिरोपंत मेहेंदळे हा होय. याला राघोपंत थत्ते या नांवाच्या मनुष्याची जोड मिळाली. या दोघांनीं परशुरामभाऊच्या मनाला विपर्यास पाडण्यास सुरवात केली. बहिरोपंत मेहेंदळयानें, नानांच्याजवळ कांहीं ईश्वरानें अकलेचा सर्व गड्डा दिला नाहीं. तुह्मी नानांच्यापेक्षां कमी नाहींत, त्यांच्यापेक्षां तुमचें वजन अधिक आहे, अशा प्रकारें परशुरामभाऊंचे कान भरण्यास आरंभ केला. नानांच्या संबंधाच्या नासक्या कुचक्या गोष्टीवांचून परशुरामभाऊंला दुसरें कांहीं ऐकूं जाईनासें झालें. परशुरामभाऊंची अमर्याद स्तुति होऊं लागली. अशा स्थितींत सगळा कारभार परशुरामभाऊंच्या हातीं असल्यामुळें त्यांचेही डोळे फाटले. नानांनीं पुण्यास येऊन कारभार करावा ही जी भाऊंची पहिली इच्छा ती बहुतेक मालवली. हा अशा प्रकारचा रंग फिरलेला पाहतांच नानांच्या पक्षाची मंडळी हळूहळूं कारभारांतून आपलें अंग काढूं लागली. बाळोबातात्याच्या पक्षाची शिंद्यांच्या पदरची शेणवी मंडळी भाऊंना बिलगून तिकडूनही नानांच्या संबंधानें विरुद्ध मजकूर भाऊंच्या कानावर येऊं लागला. आणि या सर्वांचा परिणाम असा झाला कीं, आपल्याला, भाऊ बा-

ळोबातात्या आदिकरून मंडळी कैद करणार, ही बातमी साताऱ्यास नानांच्यापर्यंत जाऊन पोंचली. तरी नानांचा या बातमीवर विश्वास बसेना. त्यांना भाऊ असा निमकहरामपणा करतील असें वाटावें तरी कसें? पण इकडे पुण्यास कारभार करीत असलेल्या मंडळींनीं नानांना कैद करायचें असें ठरवून बहिरोपंत मेहेंदळे आणि विसाजीपंत वाडदेकर यांस बरोबर सैन्य देऊन त्यांना साताऱ्यास नानांना कैद करून आणण्याकरितां पाठविलें! नानांच्या भाग्याचा समूळ ऱ्हास अद्याप झाला नव्हता, ह्मणून भाऊंना वाडदेकर यांस मेहेंदळ्याबरोबर पाठविण्याची बुद्धि झाली. हे दोघे साताऱ्यास जाऊन पोंचल्यावर नानांना जाऊन भेटले. इकडलीं तिकडलीं भाषणें झाल्यावर, आपण पुण्यास चलावें असें बोलणें मेहेंदळे यांनीं काढलें. नाना ह्मणाले, माझे ग्रह आतां फिरले आहेत. मी जें चांगलें ह्मणून करायला जातों तें विपरीत होतें. अशा कालगतींत मीं दूर रहावें हें बरें. मेहेंदळे नानांना कैद करून पुण्यास घेऊन चलणार हें वाडदेकर यांस पक्कें माहीत होतें. पण त्याला ही गोष्ट रुचलेली नव्हती. त्यानें मेहेंदळ्याला न कळत कानावर जानवें ठेवून नानांना या क्षणाला आपण येथून चालतें व्हावें अशा अर्थाची इशारत केली. नाना अति हुषार त्यांनीं इशारत मिळतांच, तुह्मी अंमळ बसा, मी आंतून जाऊन येतों असें त्या उभयतांना सांगून मागच्या वाटेनें पालखींत बसून महाडचा रस्ता धरिला. वाडदेकर याच्या मनाप्रमाणेंच झालें, परंतु त्या कलिरूप झालेल्या मेहेंदळ्याच्या अंगाचा संताप झाला.

नाना महाडास जाऊन पोंचल्यावर त्यांनीं चांगलेंच कारस्थान करण्याचा विचार केला. त्यांच्यापाशीं पैसा महामूर होता त्याचें व स्वतःचें रक्षण करण्याकरितां जवळ सैन्य असल्यावांचून गत्यंतर नाहीं असें त्यांच्या मनानें घेतलें. त्यांनीं प्रथम आपल्याजवळ पांच हजार आरब ठेवले. नंतर ते नव्या कारस्थानाच्या मागें लागले. त्यांनीं बाजीराव जो परशुरामभाऊ व बाळोबातात्या यांचा द्वेषी झाला होता त्याजकडे आणि पुण्यास कैदेंत असलेल्या मश्रुन्मुलुखाकडे संधान लावलें. त्यांच्या पक्षाची मंडळी एकामागूनएक येऊन महाडास जमा झाली. कारणापुरती मुद्दाम पुण्याकडे राहिली. रोजची डाक सुरू झाली. मश्रुन्मुलुखाचें पुण्याच्या दरबारांत बोलणें होऊन त्याला सोडावें असें ठरलें. यासंबंधांत पुण्याच्या दरबाराकडून नानांचें मत विचारण्यांत आलें होतें. हें सर्व नानांनींच जमवून आणिलें होतें, तेव्हां त्यांनीं सोडावें असें मत दिलें यांत नवल कसचें? मश्रुन्मुलुखाला सोडायचें असें ठरलें तेव्हां हैद्राबादेहून दहा हजार सैन्य पुण्यास येऊन गुलटेकडीवर राहिलें. पुण्यांतून सुटल्यावर तो आपल्या सैन्यांत जाऊन राहिला. यानंतर मश्रुन्मुलुखानें नानांच्या राजकारस्थानांत त्यांना पुष्कळ मदत केली. नानांनीं बाजीरावाकडे जें संधान लावलें होतें त्यांत शिंद्याला फोडायचा बेत होता व तो बाजीरावानें सर्जेराव घाडगे यांच्या मार्फतीनें जुळवून आणला. नानांनीं महाडास बसून नवें राजकारस्थान चालविलें आहे हें वर्तमान परशुरामभाऊ व बाळोबातात्या वगैरे मंडळींना समजलें. तेव्हां त्यांनीं पुण्यास नानांच्या पक्षाची

जी मंडळी होती तींतील एकेकास कैद करण्याचा विचार चालविला. नारोपंत चक्रदेव हे नानांच्या कारस्थानांतले अग्रगण्य होते त्यास कैद करायचें असा शेणवी मंडळींचा निश्चय ठरला. पण नारोपंत नानांच्या तालमींत वाढलेला, त्यानें आपल्याला कैद करणार ही बातमी काढली, व तो मश्रुन्मुलुखाच्या लष्करांत जाऊन राहिला. यानंतर बाबा फडके यांस कैद करावयाचा दरबारी मंडळींनीं विचार चालविला. यावेळीं पेशव्यांच्या दरबारचें काम अंदाधुंदीनें चाललें होतें. परशुरामभाऊ यांच्यावरची लोकप्रीति लय पावत होती. फार काय सांगावें, सरकारच्या हुजुरातीचें सैन्य परशुरामभाऊंच्याविरुद्ध झालें होतें. बाबा फडके यांना परशुरामभाऊ व शेणवी मंडळी कैद करणार असें हुजुरातीच्या सैन्याला कळतांच तें सारें जमा होऊन फडक्यांच्या वाड्यापुढें उभें राहिलें. बाबा फडके यांस तें ह्मणत होतें कीं तुह्मी आमच्यांत येऊन मिळा. मग परशुरामभाऊ व शिंद्यांची शेणवी मंडळी काय करते तें पाहूं. हुजुरातीचें सैन्य याप्रकारें दम देत होतें याला कारण होतें. तें हें कीं, मश्रुन्मुलुखाचें सैन्य हुजुरातीच्या सैन्याच्या मदतीला येण्यास तयार होतें. पण बाबा फडके यांस या सैन्याला मिळण्याचा धीर होईना. रात्र होईपर्यंत हें सैन्य फडक्यांच्या वाड्यापुढें उभें होतें. शेवटीं कंटाळून आपापल्या ठिकाणीं गेलें. दुसरे दिवशीं परशुरामभाऊंच्या लोकांनीं फडके यांस कैद करून चाकणच्या किल्यावर नेऊन पोंचविलें. याखेरीज नानांच्या पक्षाचे परचुरे, लेले, वैद्य वगैरे मंडळींना

परशुरामभाऊंनीं कैद केलें होतें, पण पैसे वगैरे भरून त्यांनीं आपापल्या सुटका करून घेतल्या.

आपला शेवटला कपाळकरंटा बाजी नुसता पेशव्यांच्या गादीवर बसायचा, तों किती उलाढाल्या आणि मोठमोठ्या लोकांत द्वेषभाव वाढले ते पहा! पण याहीपेक्षां खेद वाटण्याची गोष्ट ही कीं, अशाला गादीवर बसविण्याकरितां नानांनीं हें शेंवटचें बुद्धिसर्वस्व खर्च केलें! नाना महाडास होते, पण त्यांनीं पुण्यांत अशा प्रकारचा फितूर माजविला, कीं शर्थ त्यांच्या कारस्थानांची, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. पेशव्यांचा कारभार पहाणारे भाऊ व बाळोबातात्या वगैरे शेणवी मंडळी यांना नानांचीं कारस्थानें चाललीं आहेत हें समजलें असून सरकार हुजूरातीच्या सैन्याची व्यवस्था काय आहे, तिकडे त्यांचें लक्ष गेलें नाहीं. हुजुरातीच्या सैन्यापैकीं बहुतेक सैन्य मश्रुन्मुलूख याच्या सैन्यांत जाऊन चाकरीस राहिलें. या लोकांना महाडाहून नानांकडून पगार पोंचूं लागला! हुजुरातीचें सैन्य बहुतेक नाहींसें झाल्यावर बाळोबातात्या व परशुरामभाऊ यांचे लक्ष तिकडे गेलें आणि हें कसें झालें या चौकशीला ते लागले. त्यांच्या चौकशींत बावन पाग्यांत प्रसिद्ध असलेलें निळकंठराव पागे हे दोषी ठरले. हा परभू गृहस्थ तलवार बहादूर होता. परशरामभाऊंचें धरणें आलें असें समजेपर्यंत पुणें सोडण्याची गोष्ट मनांत त्यानें आणिली नाहीं व तो इतका सुद्धां डगमगला नाहीं! परशुरामभाऊंचे स्वार आपल्याला कैद करायला आले असें जेव्हां त्याला समजलें

तेव्हां तो आपले दहा पंधरा स्वार बरोबर घेऊन निघाला व परशुरामभाऊंच्या स्वारांच्या देखत देखत चालता झाला. पण त्याजवर तुटून पडण्याची एकाचीही छाती झाली नाहीं. तो विजेसारखा दृष्टीआड झाला. निळकंठराव तसाच तडक महाडास गेला. निळकंठरावांचा नानांनीं पुष्कळ आदरसत्कार केला, आणि त्यानें पुण्याच्या दरबारची भेंडाच्या खांबासारखी स्थिति झाली आहे, जरा वारा लागला कीं ते खालीं पडतील, असें जेव्हां सांगितलें तेव्हां तर नानांनीं त्याची पाठ थोपटली. या वेळचें परशुरामभाऊंचें गाफील वर्तन पाहून नवल वाटतें. हा गृहस्थ म्हणजे कित्येक लढाया मारलेला व बहुतेक सर्व पेशवे पाहिलेला. याचा प्रथमपासूनचा बाणा शिपाईगिरीचा. तो शिपायांवर प्यारा व त्यांचा पोशिंदा असायचा. पण गृहस्थ राजकारस्थानी बनतांच शिपायांना विसरले. मिळून आपलें गमावलें, दुसऱ्याचें घ्यायला गेले तें साधलें नाहींच, पण राजश्रीनीं ज्याला कैदेंत ठेवण्याचा घाट घातला होता त्याच्याच कारस्थानानें आपण स्वतः कैदी बनले.

दिवा जातांना मोठा होतो तशांतला प्रकार भाऊंच्या दरबारानें केला. मागें स्नेह नाहीं याचा भाऊंनीं मुळींच विचार केला नाहीं. आपल्या पथकांतले लोक जगज्जेते आहेत, अमर आहेत असें भाऊंना वाटलें कीं काय तें कळत नाहीं ! नानांच्या वजनाचा विचार न करितां भाऊंनीं त्यांच्या वाड्याची जप्ती केली. नवकोटीनारायण असा नानांचा लौकिक असल्यामुळें भा-

ऊंना रगड संपत्ति वाड्यांत मिळेल असें वाटत होतें. पण नानांनीं कापडावांचून दुसरी संपत्ति वाड्यांत ठेवली नव्हती. लहानमोठ्या मोलांचें कापड मात्र चाळीस एक लाखांचें निघालें असें दंतकथा सांगत आल्या आहेत. परशुरामभाऊंनीं वाड्याच्या जप्तींत मिळालेल्या कापडाची मोजदाद करून तें सरकारखजिन्यांत जमा केलें. पुढें दसरा जवळच आला होता, त्याच्या दरबाराला भाऊंनीं तें सर्व कापड मानकऱ्यांना वांटून टाकलें. याच कापडासंबंधाची या पुढें झालेली नानांच्या दराऱ्याची गोष्ट येथें सांगितली असतां ती अप्रासंगिक होणार नाहीं. नानांचें हें कारस्थान सिद्ध झाल्यावर ते पुण्यास येण्यास निघाले. तेव्हां दसऱ्याच्या दरबाराला ज्यांना ज्यांना वस्त्रें देण्यांत आलीं होतीं त्यांनीं त्यांनीं तीं बिनचूक सरकारच्या जामदारखान्यांत नेऊन जमा केलीं. नानांचें कापड असें कोणाच्याही घरांत राहिलें नाहीं ! असो.

आपल्या वाड्याची जप्ती केली असें जेव्हां नानांना कळलें तेव्हां त्यांच्या अंगाचा तिळपापड झाला. परशुरामभाऊ व शिंद्याच्या पदरची शेणवी मंडळी यांना कृतापराधाबद्दल प्रायश्चित्त केव्हां देईन असें नानांना होऊन गेलें. कारस्थानाची सर्व सिद्धता झालेली होतीच. दसऱ्याचा दरबार होऊन पंधरा दिवस झाले नाहींत तोंच शिंद्यांच्या पदरची शेणवी मंडळी पुण्यांत नानांच्या कारस्थानानें कैद झाली. राहत्यांपैकीं मोकळे भाऊ राहिले, त्यांना दुसऱ्या दिवशीं पेशव्यासह कैद करायचें होतें, परंतु हलकाऱ्यांच्या चुकीमुळें त्या दि-

वशीं रात्रीं भाऊंना सर्व मसलत समजली. तें असें झालें, पुण्यास सूचनेच्या चिठ्या घेऊन हालकारे आले. एक चिठ्ठी अप्पाबळवंत यांच्या नांवाची होती, ती देण्याकरितां हलकारे त्यांच्या वाड्यांत गेले. अप्पाबळवंतानीं आपली चिठ्ठी घेऊन दुसरी परशुरामभाऊंस नेऊन देण्यास सांगितलें. ही दुसरी चिठ्ठी हरिपंततात्या फडके यांचे भाचे परशुरामभाऊ वैद्य यांच्या नांवाची होती. हलकारे त्यांच्याकडे न जातां परशुरामभाऊ पटवर्धन यांचे वाड्यांत गेले. भाऊंनीं चिठ्ठी वांचून पाहतांच त्यांचे डोळे उघडले. आपल्या कारभाराचा शेवट होऊन उद्यां आपल्या कपाळीं कैद येणार हें त्यांस समजून चुकलें. बहिरोपंत मेंधळे, बाळोबातात्या वगैरे मंडळीच्या नादी लागून व्यर्थ मी नानांशीं वांकडा झालों, असें त्यांस वाटूं लागलें. पण मागून पश्चात्ताप करीत बसून काय उपयोग ? आपल्या खाजगी पथकांतील स्वार व गोटांतील लोक एवढ्यावर, गुलटेकडीवर जमलेल्या सैन्याशीं आपण तोंड देण्याचें धाडस केलें तर व्यर्थ आपल्या लोकांची खराबी होईल हें भाऊंच्या लक्षांत आलें. सारांश ती चिठ्ठी पाहून भाऊंची कंबरच खचली. शेवटीं श्रीमंत चिमाजी अप्पासाहेब पेशवे, व त्यांच्या जवळ असलेले आपले दोघे मुलगे यांना बरोबर घेऊन आपल्या लोकांसह पुणें सोडावें हें बरें असा त्यांनीं विचार केला. आणि ते त्या व्यवस्थेला लागले.

परशुरामभाऊंना पुण्यांतून बाहेर पडायला सकाळ झाली. त्यांनीं अप्पासाहेब यांस आपल्या घोड्यावर

पुढें घेऊन कंबरेस शेल्यानें बांधून दोन्ही हातांत पट्टे चढविले व आपल्या पथकासह बुधवारांतून निघाले. इतक्यांत नारोपंत चक्रदेव व मश्रुन्मुलुख पन्नास हजार सैन्यानिशीं पुण्यांत आले. भाऊ अप्पासाहेबास घेऊन चालले आहेत असें समजतांच या सैन्यापैकीं कांहीं भाऊंच्या पाठीस लागलें. भाऊंचा गोट पर्वतीखालीं होता त्यांत ते जाऊन मिळाले आणि त्या लोकांसह ते तडक पुढे निघाले. भाऊ पुढें पळताहेत व त्यांच्या मागें हें सैन्य लागलें आहे अशी एक दिवस सारखी पळापळ चालली होती. त्या दिवशीं कोणाला अन्नपाणी घेण्यास देखील सवड झाली नाहीं. रात्रीं भाऊंनीं अप्पासाहेबांना मात्र भात करून खायला घातला. असे पळत पळत भाऊ शिवनेरीच्या किल्याखालीं गेले. तेथील किल्लेदारानें अप्पासाहेबांस मात्र किल्यावर घेतलें. भाऊ किल्याखालीं तळ देऊन राहिले. इतक्यांत भाऊंचा पाठलाग करीत गेलेलें सैन्य तेथें जाऊन पोंचलें आणि त्यानें भाऊंभोंवतीं घेरा घालून त्यांस कैद केलें. यानंतर भाऊंना मांडवगण येथें नेऊन कैदेंत ठेविलें. याप्रमाणें नानांनीं माहाडास राहून जें पुण्यास कारस्थान रचिलें त्यांत त्यांस पूर्ण यश आलें.

रावबाजी पुढें मार्गशीर्षमासीं साताऱ्याहून वस्त्रें व शिक्केकट्यार येऊन पेशव्यांच्या गादीवर बसले, पण खरें पहातां त्यांच्या संबंधाच्या कारस्थानाला यश आलें त्याच दिवशीं ते पेशवे झाले. हे दिवस ह्मणजे दिवाळीचे, पण शहरांत धराधरी चालली असल्यामुळें, कित्येकांच्या किल्यावर रवानग्या होत असल्यामुळें

पुण्यांत सणाचा आनंद दिसत नव्हता. रावबाजी दिवाळीच्या मुहुर्तानेंच ह्मणावयाचे पेशवे बनले व त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या अकलेचे दिवे पाजळून स्वराज्याचें दिवाळें काढलें. आणि यांनीं जे दिवे पाजळले त्यांच्या ज्योतींनीं महाराष्ट्रांतील मुत्सद्दीगिरी, नानांसारख्या प्रख्यात राजकारस्थान्याचें चातुर्य, शिपायांतील शौर्य, धैर्य व लोकांचा आनंद हे भस्मीभूत झाले !

---

# सर्जेराव घाटगे.



रावबाजींना पेशवाईचीं वस्त्रें देण्याकरितां कारस्थानांना सुरवात होईपर्यंत, भलत्याच मनुष्याला चढवायचें असा प्रकार पेशवाईंत बहुतेक घडत नसे. या प्रकाराचें गणपतिपूजनच या शिंद्याच्या पदरच्या गृहस्थापासून झालें. हा एक शिंद्यांच्या पदरीं शिलेदार होता. याचें नांव सखाराम घाटगे. परशुरामभाऊंनीं चिमणाजी अप्पांस पेशवाईच्या गादीवर बसवून बाजीरावाला बाळोबातात्याच्या हातीं दिलें, तेव्हां बाजीराव शिंद्याच्या कैदेंत असतांना त्यानें सखाराम घाटग्यावर आपले मोहिनीमंत्र टाकण्यास प्रारंभ केला. बाजीराव महा कपटी व पातालयंत्री होता. सखारामघाटग्यांत दौलतराव शिंद्याला वश करून घेण्याइतकी अक्कल नाहीं हें बाजीराव ओळखून होता. पण बाजीरावाची थोड्याशा सहवासावरून ही खात्री झाली होती कीं, या शिलेदारांना बरेचसे चढवून कोणतेंहि काम सांगितलें तरी हे वेडे तें करण्यास तयार होतील. या शिलेदारांची एक खपसुरत उपवर झालेली मुलगी होती. त्या मुलीच्या बाजूनें आपलें मोठें काम होईल असें बाजीरावाला वाटलें.

सखाराम घाटग्याच्या मुलीला ती उपवर झाली असें वर ह्मटलें आहे, पण तेवढ्यावरून वाचकांना वस्तुस्थितीचा बोध होणार नाहीं. मराठ्यांत मुली लग्नाला फार मोठ्या करीत नाहींत हें खरें. पण कित्येक

ठिकाणीं त्या न्हात्याधुत्या झालेल्या असून त्यांचीं लग्नें झा-
लीं नाहींत असें दृष्टीस पडतें ! दंतकथा सांगतात कीं,
सखाराम घाटग्यानें नवरे पहातां पहातां मोठ्या जांव-
याच्या इच्छेनें, आपल्या मुलीच्या वयाकडे विशेष लक्ष
दिलें नाहीं. ती बिचारी मात्र बाप पैशाच्या लालचीनें
आपल्याला कोणाच्या गळ्यांत बांधतो या काळजींत
पडली असावी. बाजीरावानें सखाराम घाटग्यापाशीं दौ-
तरावाचें व त्याच्या मुलीचें लग्न जुळवून आणण्यावि-
षयीं गोष्ट काढली. मी गरीब, शिंदे माझी मुलगी क-
सली करितात असें सखाराम ह्मणूं लागला. पण बो-
लतां बोलतां मोह पाडणाऱ्या बाजीरावानें अनेक गोष्टी
सांगून सखारामाच्या मनांत ती गोष्ट भरवून दिली.
यांत त्याचेंहि कोटकल्याण असल्यामुळें बाजीराव ज्या
ज्या रस्त्यानें जायला सांगे त्या त्या रस्त्यानें तो जाऊं
लागला. बाजीरावाचेंहि यापासून मोठें काम व्हावयाचें
असल्यामुळें त्यानें हें लग्न जुळवून आणण्याकरितां पु-
ष्कळ खटपट केली. मुलगी खपसुरत व बायको झाले-
ली असल्यामुळें दौलतराव शिंद्याच्या ती दृष्टीस पड-
तांच ते पाघळले.

दौलतराव शिंद्यांनीं सखारामघाटग्यांच्या मुलीबरो-
बर हें जें लग्न लावलें तें मोठ्या समारंभानें केलें. या
लग्नांत शिंद्यांनीं पुष्कळ पैसे नासले. हें लग्न झाल्या-
वर सखाराम घाटग्याला 'सर्जेराव' हा किताब दे-
ण्यांत आला व सखाराम घाटगे मोठा मुत्सद्दी बनला !
नानांनीं बाजीरावाला पेशवाईचीं वस्त्रें देण्याकरितां, या-
ला आपल्या मसलतींत घेतलें. दौलतराव शिंद्यांचे हे

सासरे झाले, मग यांचा मोठेपणा काय विचारावा ? ! बाजीरावानें, बाळोबातात्याच्या संधानानें दौलतराव चालत असे, त्या कामीं त्या दोघांत द्वैत आणण्यांत सर्जेराव आणि त्याची मुलगी यांचा चांगला उपयोग करून घेतला. दौलतराव स्वतःच्या बुद्धीचा मनुष्य नसल्या कारणानें, नव्या बायकोच्या नादानें सर्जेराव हा किती किमतीचा मनुष्य आहे याचा कांहींएक विचार न करितां तो त्याच्या मुठींत गेला. सर्जेराव सांगेल ती पूर्वदिशा होऊं लागली. आणि यामुळेंच परशुरामभाऊंच्या बरोबरीनें अप्पासाहेब पेशव्यांचा कारभार करीत असलेलें शिंद्यांच्या पदरचें शेणवीमंडळ एकेदिवशीं जागच्या जागीं कैद झालें. असो.

बाजीरावसाहेबांना पेशवाई मिळविण्याला सरजेरावांचा फार उपयोग झालेला, त्यामुळें त्यांना पेशवाईचीं वस्त्रें मिळाल्यावर सर्जेरावांचें प्रस्थ फार माजलें. असला हलका मनुष्य योग्यतेला चढविल्यावर त्याच्या हातून अनन्वित कर्में व्हावींत हें स्वाभाविक आहे ! तुकोजीराव होळकर वारल्यावर त्याच्या मुलांत सरदारीच्या वस्त्रांबद्दल तंटा उत्पन्न झाला. अहिल्याबाईनें तुकोजीरावाचें दत्तविधान करण्याच्या अगोदर त्याला काशीराव मुलगा झालेला होता, त्यामुळें मल्हाररावाचें ह्मणणें काशीराव यांस वस्त्रें घेण्यास अधिकार नाहीं असें होतें. पण काशीरावानें सरजेरावांच्या मध्यस्तीनें दौलतरावाला आपल्या बाजूचा करून ठेवला होता. काशीरावापेक्षां मल्हारराव फारच शूर होता. त्याला स्वतःबद्दलची खात्री होती. मल्हारराव काशीरावास नीटपणें वस्त्रें घे-

ऊं देत नाहीं असें जेव्हां काशीरावाचा पक्ष घेतलेल्या सर्जेरावांनीं पाहिलें. तेव्हां त्यांनीं दौलतरावाच्या मनांत मल्हाररावाला कैद करावें असें भरवून दिलें. जांवई काय, सासरे सांगतील त्याला होय ह्मणणारे! त्यांनीं सर्जेरावास मल्हाररावाला धरण्याचा प्रयत्न करा असें सांगितलें. सर्जेरावानें एक पलटण व हजार दीड हजार पठाण भांबुर्ड्यावर मल्हारराव आपल्या लोकांसह राहिला होता त्याजवर पाठवून दिले. शिंद्यांचे लोक आपल्याला धरण्याकरितां येत आहेत असें समजतांच शूर मल्हारराव आपला गोट आंवळून लढाईकरितां उभा राहिला. शिंद्याकडून त्याला धरण्याकरितां आलेल्या लोकांना मल्हाररावांतलें पाणी माहीत असल्यामुळें, मल्हारराव लढाईला तयार होऊन उभा राहिला असें कळतांच त्यांच्यानें एक पाऊलही पुढें टाकवेना, मग अंगावर चालून जायची गोष्ट दूरच राहिली. मल्हाररावानें आपल्या लोकांना, प्रथम आपण लढायला सुरवात करायची नाहीं अशी ताकीद देऊन ठेवली होती, त्यामुळें ते जागच्या जागीं उभे होते. दिवसां तीन वाजण्याच्या सुमारापासून दोहींकडले लोक रात्रींचे दोन वाजेपर्यंत उभे होते. शिंद्याचे धरण्याकरितां आलेले लोक परतल्यावर मल्हारराव आपले गोटांत येऊन कंबर सोडून उतरले. पुढें अगदीं पहाट झाल्यावर मल्हारराव नित्यनेमाप्रमाणें स्नान करून शंकराच्या पूजेस बसले. शिंद्यांच्या सर्जेराव आदिकरून दुष्ट मंडळींनीं मल्हाररावाच्या गोटांतली बातमी ठेविली होती. त्यांना होळकरांचे लोक आतां अस्ताव्य-

स्त आहेत व मल्हारराव पूजेला बसले आहेत असें कळतांच, परत गेलेल्या लोकांना त्यांनीं फिरून मल्हाररावावर पाठविलें. त्या लोकांनीं होळकराचे लोक बेसावध आहेत असें पाहून गोटावर एकदम हल्ला केला. मल्हारराव खरा खरा शिपाई, मनांत लवभर न घाबरतां हातीं खांडा घेऊन उघडाबोडका घोड्यावर स्वार झाला आणि त्यानें आपला घोडा शत्रूच्या तोंडावर टाकला ! मल्हाररावाच्या विश्वासांतला लाख्याबारगीर ह्मणून एक त्याचा नौकर होता, तोही त्याच्या पाठोपाठ गेला. तो आपल्या यजमानाप्रमाणेंच खरा शूर होता. या दोघांनीं शिंद्यांकडले कमींत कमी पन्नास लोक लढतां लढतां यमसदनीं पाठविले. पण शिंद्याच्या सर्व लोकांचा मार दोघांवर पडल्यामुळें ते दोघेही अनेक वार होऊन मृत्युमुखीं पडले ! सर्जेरावासारख्या अधमाधमांच्या खलबतांनीं, मल्हाररावाचा जर अशा प्रकारें शेवट झाला नसता, तर होळकरांच्यामुळें पुढें जें बाजीरावाला पळून जावें लागून इंग्रजांना घरांत आणण्याचा प्रसंग आला तसें झालें नसतें, इतकेंच नव्हे, थोरल्या मल्हाररावांनीं ज्याप्रमाणें आपली तरवार गाजविली तशी या मल्हाररावानें तलवार गाजविली असती, आणि यशवंतरावानें तलवार गाजवूनही जें चीज झालें नाहीं तें झालें असतें असें पुष्कळांचें ह्मणणें आहे ! सारांश रावबाजींच्या वेळीं कर्तबगार मनुष्यें मुळींच नव्हतीं असें नाहीं. गाढवाला गुळाची चव काय, तशांतला प्रकार झाला ! म्हणून चांगलीं माणसें होतीं तीं अशीं दुष्टांच्या खलबतांनीं नाहींशीं झालीं किं-

वा अंधेरांत बसलीं ! मल्हाररावाचा सेवक लाख्याबा-रगीर याच्या शिपाईगिरीसंबंधानें फार लौकिक आहे. याला मल्हाररावानें दरमहा लाख रुपये देण्याचें ठरविलें होतें व यावरूनच त्याचें नांव लाख्याबारगीर असें पडलें होतें. त्याच्या या ठरलेल्या पगारावरून तो कशा प्रकारचा शिपाई असेल याची वाचकांना थोडी कल्पना करितां येईल. त्याची स्त्री कांहीं तत्कालिन पंडिता महिला नव्हती. पण त्या माउलीचें पतीवर जें अत्यंत प्रेम होतें तें सध्यांच्या सुधारणायुगांतल्या कितीक पंडिता महिलांना आश्चर्यचकित करून सोडील. तिच्या पतिप्रेमासंबंधानें फार ल्याह्यला नको, शेवटची गोष्ट सांगितली ह्मणजे पुरें होईल. तिच्या मृत्यूसंबंधानें असें सांगतात कीं, मल्हाररावाबरोबर लाख्या लढाईंत पडला असें ऐकून दुःखावेशानें तिनें आपलें मस्तक जें एकदां भुईवर ठेवलें, तें शेवटचेंच! वाचकहो किती काळाची वक्रगति कीं, असें स्त्रीरत्न मातीस मिळावें आणि सर्जेरावाची कन्या दौलतरावाची पट्टराणी होऊन तिनें पतीच्या हयातींत व त्याच्या मागेंही कितीकांच्या सुखांत माती कालविण्याकरितां इ. स. १८६२ पर्यंत जगावें ! असो !

रावबाजी गादीवर बसल्यावर, दौलतराव शिंद्यांच्या वतीनें सर्जेरावांनीं, रावबाजीपाशीं त्यांनीं अगोदर वचन दिल्याप्रमाणें दोन कोट रुपयांची मागणी चालविली. एवढी रक्कम सरकारखजिन्यांत असण्याचा संभव नव्हता हें एक, व दुसरें रावबाजीना गांठचे पैसे गळ्यावर येऊन बेतेपर्यंत कोणाला द्यायला नको होते. सर्जेरा-

वांनीं जेव्हां पैशाची निकड लावली तेव्हां रावबाजींना मोठा विचार पडला. घर बुडविण्याच्या युक्त्यांना रावबाजीपाशीं तोटा नव्हता. शिंद्यांचें प्राबल्यही त्यांना नसावेंसें वाटूं लागलें होतें. तेव्हां एका दगडांत दोन फळें पडतील अशी युक्ति रावबाजी शोधूं लागले. त्यांच्या तरतरीत डोक्यांतून एक युक्ति निघाली. त्यांनीं अशी युक्ति काढली कीं, सर्जेरावाला पुण्याचा कारभार सांगून पैसा गोळा करायला लावावें, ह्मणजे शिंद्याला कांहीं पैसे देतां येतील, आपल्यालाही कांहीं मिळतील व आपल्या मनांतून जी गोष्ट व्हायला पाहिजे ती सहज होऊन जाईल. ती गोष्ट शिंद्यांच्या विषयीं लोकांत अप्रीति उत्पन्न होणें ही होय. रावबाजीनीं दौलतरावांचें संमत घेऊन पुण्याचा कारभार सर्जेरावास सांगितला. बाजींची सर्जेरावाला आंतून फूस होतीच. मग काय माकडाच्या हातीं कोलीत दिल्याप्रमाणें झालें. सर्जेरावांच्या हातीं कारभार आल्यावर पुण्यांत पैसेवाले कोणकोण आहेत याची त्यांनीं चौकशी चालविली. ती सर्व माहिती मिळविल्यावर त्यांनीं आपल्या कारभाराला सुरवात केली. कांहीं गुन्हा असो अगर नसो, सर्जेरावांनीं पैशाचें ठिकाण हेरून एकदम त्या घरावर जप्ती सोडावी. घराच्या मालकानें अमलाला भिऊन गरीबीनें जप्ती करूं दिली तर ठीकच आहे, नाहींपेक्षां जप्तीला गेलेले लोक त्या घरांत रक्तपात करायलाही कमी करीत नसत! सर्जेरावानें अशाप्रकारें पुष्कळ पैसा जमविला.

रावबाजींची स्नानसंध्या व धर्म मोठा होता याची

जशी प्रसिद्धि आहे, तशीच त्यांच्या व्यभिचाराची व शौकाचीही पण प्रसिद्धि आहे. सर्जेराव हा मनुष्य पहिला अगदीं हलकट असल्यामुळें त्याच्या अंगीं व्यभिचारादि दुर्गुण ओतप्रोत भरलेले होते. त्याची रावबाजींना संगत बरेच दिवस होती. त्यामुळें रावबाजी असले पाजी व्यवहार सर्जेरावाबरोबर किंवा त्याच्या मदतीनें खुल्या दिलानें करीत. तमाशे, नाच, नायकिणी यांच्यावांचून दिवस सुना जात नसे. रावबाजींना सर्जेरावाच्या संगतीनें तमाशाचा शौक अतिरिक्त जडला. रावबाजीनीं एकादी चांगली स्त्री पाहिली व सर्जेरावाला सुचविलें, कीं या पाजी घाटग्यानें ती श्रीमंतांच्या चरणापाशीं हजर केलीच ! सर्जेरावाच्या कारभाराचा किंवा रावबाजींच्या राज्याचा लोकांना जो तिरस्कार उत्पन्न झाला तो त्यांनीं अशा प्रकारचीं अनन्वित कृत्यें केल्यामुळें झाला. राजानें प्रजेपासून पैसा लुटला तर तिला राजाचा इतका तिरस्कार येत नाहीं, पण तो जर स्त्रिया लुटूं लागला तर मात्र प्रजेला तें सहन होत नाहीं; आणि देवाच्याही वरचा न्याय असाच असेलसा दिसतो. पेशवाईचा क्षय होण्यास, रावबाजींनीं जीं पतिव्रता स्त्रियांचीं पातिव्रत्यें भ्रष्ट करण्याचीं कृत्यें केलीं, तीं अधिक कारणीभूत झालीं. देशानें नीतिमत्ता ढळूं न देणें ह्मणजेच आपली उन्नति करणें होय. यावरून आपण आपली नीतिमत्ता कितपत राखतों आहोंत याचा विचार करायला नको काय ? भोंवतालीं चाललेले प्रकार पाहून जो विचार करील त्याला आपल्या सध्यांच्या स्थितीबद्दल खेद उत्पन्न झाल्यावांचून कधींही र-

हाणार नाहीं ! स्त्रीविषयक नीतिमत्ता बिघडली असतां कशा प्रकारची स्थिति येते हें आपल्याला चांगलें कळलें असून, रावबाजींनीं स्त्रियांना हिऱ्यामोत्यांनीं नटविलें, तर आह्मी खोट्या दागिग्यांनीं नटवूं पाहतों, त्यांनीं तंग जाकिटें घालावींत आणि रस्त्यांतून मुरकत हिंडावें असें इच्छितों, या आमच्या गधडेपणाचें फळ काय येणार तें कांहीं समजत नाहीं ! पूर्वजांची अवास्तव स्तुति किंवा अवास्तव निंदा करणारी ही लेखणी नाहीं. ही सत्यस्फोटन करायला कधींही कचरणार नाहीं. श्रीशिवछत्रपतींनीं परस्त्री ह्मणजे माता ही सुनंगल नीति जशा दक्षतेनें पाळिली, तशा दक्षतेनें तिला पाळणारे धन्यात्मे जर आपल्या स्वराज्यांत एका मागूनएक चमकत रहाते तर खचित खचित अशा दुर्वह स्थितींत आपण पडलों नसतों असें मनोदेवता सांगते. अठराशें सत्तावन् सालच्या बंडाचा शेवट बंडखोरांच्या फट्फजीतीनें झाला, तो रावसाहेब जर तंबूंत शौर्यगुणाची वाखाणणी करितां करितां रतिरंगांत निमग्न न होते तर झाला नसता, असें ह्मणतांना बंडांतून परत आलेल्या एकदोघांच्या तोंडचें ऐकलें आहे ! असा प्रकार झाला नसेल ह्मणून कशावरून ह्मणावें ? इतिहासकारांनीं असले प्रकार दडविण्याविषयीं होतील तितके प्रयत्न करावेत हें सत्यनिरीक्षणाचा विचार करितां गर्ह्य आहे. ज्या गुणांची वाखाणणी करणें जरूर त्यांची बेलाशक करावी, पण कथानायकाच्या अंगचा दुर्गुण दडवावा हें पाप होय. असो.

रावबाजीनीं एका दगडानें दोन फळें पाडण्याची जी

युक्ति योजिली ती चांगली लागूं पडली ! शिंद्याचा दोन कोट रुपये देण्याबद्दल जो नेट लागला होता तो नाहींसा झाला व उलट बरेच पैसे खजिन्यांत जमा झाले. आणि दुसरें मोठें काम, शिंद्याच्याबद्दल लोकांची अप्रीति, ती सहज घडून आली. शिंद्यांना व सर्जेरावाला आतां नानांप्रमाणें कैदेंत टाकण्यास कांहीं हरकत नाहीं असें बाजीरावानें मनांत आणून तो त्या खटपटीस लागला. अमृतरावसाहेबांनीं दौलतरावाला कैद करण्याचा चांगला घाट घातला होता, पण रावबाजी ऐत्यावेळीं कचरले. आणि पुढें त्यांनीं या संबंधांत इतका पाजीपणा केला कीं, त्यांनीं दौलतरावाला आमक्या आमक्या दिवशीं तुह्मांला कैद करण्याचा अमृतरावांनीं बेत केला होता असें स्वतः सांगितलें ! सर्जेरावानें पुण्यास जीं अनन्वित कृत्यें केलीं त्यांबद्दल पुढें थोड्याच दिवसांनीं त्याला कांहीं दिवस कैद भोगावी लागली. रावबाजीनीं त्याला दौलतरावाचा सासराच करून सोडला होता, त्यामुळें पुढें तो सुटला हा भाग निराळा. केवळ पोरीच्या वशिल्यावरून सर्जेराव राजकारस्थानांत शिरले आणि यथामानसें वागले, त्याचे परिणाम किती वाईट झाले त्यांची गणतीच करूं लागल्यास पुष्कळ पानें भरतील, परंतु या खेदजनक भागांतून संचार करितांना लेखणी विटली असल्यामुळें सर्जेरावांना रजा देणें तिला बरें वाटतें.



# रावसाहेबांची कर्नाटकावर स्वारी.



प्रथमगुच्छांत थोरल्या माधवरावसाहेबांनीं राक्षसभुवनाच्या लढाईत आपलें प्रखर शौर्यतेज प्रकट करून निजामाचा पराभव केला, तें प्रकरण वाचकांनीं वाचिलें आहे. माधवरावसाहेबांच्या मनांत पानपत येथचा पराभव सलत होता. उत्तर हिंदुस्थानांतल्या मुसलमानांना चरणशरण करीन त्या दिवशीं मला सुखनिद्रा लागेल असें ते ह्मणत होते, पण ईश्वरी सूत्रें कांहीं निराळ्याच रीतीनें फिरत असल्यामुळें त्यांना आपले मनोगत हेतु बाजूस ठेवून कर्नाटकांत स्वारी करण्याची तयारी करावी लागली.

कर्नाटकांत ह्मैसूरच्या हिंदुराजाला बुचाडून हैदरखान आपली सत्ता वाढवूं लागला. इ. स. १७६२ त त्यानें छोटाबाळापूर, रायदुर्ग, हार्पुनेली आणि चित्रदुर्ग येथील पाळेगारांवर हल्ले करून त्यांना जेरीस आणिलें, व त्याजपासून तो खंडण्या घेऊं लागला. त्याच्या पुढच्या वर्षी बेदनूर, सुंदा, सावनूर यांजवर हल्ले करून तेथील मालकांना त्यानें दांतीं तृण धरायला लावलें, त्याचा एक मुसलमान सरदार फजल उल्लाखान यानें तर धारवाड हस्तगत करून कृष्णेच्या उत्तरतटाकापर्यंत ठाणीं वसविलीं. सारांश हैदरखानाच्या या झपाट्याच्या स्वाऱ्यांवरून, माधवरावसाहेबांना असें वाटूं

लागलें कीं, निजामानें ज्याप्रमाणें पुण्यापर्यंत आपले घोडेस्वार आणून कांहीं पुणें लुटलें व जाळलें तसा प्रकार आपण स्वस्थ बसलों तर हैदर केल्यवांचून रहाणार नाहीं. हैदराचा बंदोबस्त करण्याकरितां माधवरावसाहेबांचे विचार चालले, परंतु माधव जी गोष्ट करायची ह्मणेल ती न करूं देण्याबद्दल आनंदीबाईनीं राघोबादादांना गळ घालायची, अशी तऱ्हा माधवरावसाहेबांना पेशवाईचीं वस्त्रें मिळाल्यापासून पुण्यास चालली होती. जवळच्या निजामाचें नुक्तेंच पारिपत्य केलें होतें व त्याच्या बरोबरच जानोजी भोसल्याचेहि हात बांधले गेले होते. तेव्हां कर्नाटकावर स्वारी न करितां दुसऱ्या कोणावर स्वारी करावी, अशा प्रकारचा माधवरावसाहेबांच्या विचारास अडथळा आणायला राघोबादादांना जागा नव्हती. राघोबादादांच्या अर्धांगीला माधवरावसाहेबांच्या विचारांत मोडता घालायला कोठेंच कांहीं जागा दिसेना, तेव्हां तिनें पावसाळा जवळ आला हें कारण शोधून काढलें. व ती आपल्या प्रियकराला ह्मणायला लागली, माधव कालचें पोर, त्यानें कधीं कोठें स्वाऱ्या केल्या आहेत? पण तुह्मी पुष्कळ स्वाऱ्या केलेले असतांना पाऊस डोकीवर आला हें तुमच्या कसें लक्षांत येत नाहीं ? घर सोडून आपल्या लोकांना, जनावरांना कोठें मरायला न्यायचें ? ! राघोबादादा बिचारा भोळसर त्याला आनंदीबाईचें ह्मणणें रास्त वाटूं लागलें !

माधवराव साहेबांचें बारीक लक्ष, काकू काकांना काय काय पढवितात इकडे असेंच. आपण करीत असलेल्या स्वारीच्या बेतांत मोडता घालायला पावसाळा

जवळ आला हें कारण काकूनीं शोधून काढलें, हें रावसाहेबांना दुसरेच दिवशीं कळलें. काका काकूंच्या सांगीप्रमाणें चालणार हें रावसाहेबांना अनुभवांनीं पक्कें समजून आलेलें, तेव्हां त्यांनीं ही स्वावी आपण आपल्या शिरावर घ्यायची, दादांचें या संबंधांत मुळीं मत विचारायचें नाहीं असा निश्चय केला. सखारामबापू बरेचसे दादांच्या तंत्रानें अथवा अनुसंधानानें वागणारे, पण रावसाहेबांनीं आपल्या रसाळवाणीनें त्यांना या स्वारीपुरतें अगदीं आपलेंसें करून घेतलें, आणि स्वारीवर स्वतः जायचें असें ठरवून सर्व तयारी केली. सखारामबापू व रावसाहेब यांनीं दादांना आपण पुण्यास राहून सर्व कारभार पहा असें सांगितलें. सखारामबापूनीं तर दादांची मर्जी न जावी ह्मणून अनेक प्रकारांनीं समजावून सांगितलें. पण कुत्र्याचें शेपूट नळींत घालून ठेविलें तरी तें तींतून काढल्यावर पूर्ववत् वांकडें व्हायचें, तसेंच रावसाहेबांच्या या प्रयत्नाचें झालें. सखारामबापूनीं आपली कमाल करून सांगितलें तरी राघोबादादा रागावायचे ते रागावलेच. रावसाहेब व सखारामबापू बरोबर तीस हजार स्वार व तीस हजार पायदळ घेऊन कर्नाटकांतल्या स्वारीवर गेले आणि इकडे दादा पुण्यांतील कारभाराचा काडीइतका विचार न करितां आपल्या खाष्ट अर्धांगीस घेऊन नाशकाजवळ आनंदवल्लीस जाऊन राहिले !

माधवरावसाहेबासारखें अमोल रत्न आपल्या स्वराज्याला सुदैवानें लाधलें, पण त्याच्या राशीला हे दोन घरांतले जिवंत ग्रह लागल्यामुळें, त्याच्या अस्ति-

त्वांत आपला जो फायदा व्हायचा, त्यांत किती कमतरता पडली असेल याचा अंदाज करितां येत नाहीं. हे घरांतले दोन ग्रह त्याच्या राशीला लागल्यामुळें त्याच्या मनांतून करायचीं असलेलीं पुष्कळ कामें, तशींच राहिलीं यांत कांहीं एक शंका नाहीं. असो. तिकडे कर्नाटकांत गोपाळराव पटवर्धन यानें हैदरला स्वेच्छ बोकाळूं दिलें नव्हतें. तो त्याजकडून करवेल तितका हैदराच्या पुढें पुढें येण्याला हरकत करीत होता. पण हैदराची फौज फार असल्यामुळें त्याचा कांहीं इलाज चालेना. तरी त्यानें श्रीमंत माधवराव साहेब स्वतः येत आहेत असें ऐकलें तेव्हां फजल उल्लाखानावर जोराचा हल्ला केला. दोघांनींही कसोशीनें लढाई केली, पण तींत गोपाळरावाचे लोक अगदीं दमून गेल्यामुळें माघार घ्यावी लागली. गोपाळराव हैदराच्या लोकांबरोबर लढतो आहे ही बातमी रावसाहेबांना होतीच, त्यामुळें कर्नाटक देश, उन्हाळा ह्मणजे मी ह्मणत होता तरी तिकडे लक्ष न देतां त्यांनीं तेव्हांच मार्ग संपविला. माधवराव साहेबांची कीर्ति म्हैसूरपावेतों गेलेली होती. यामुळें ते स्वतः स्वारीवर आले आहेत असें कळतांच हैदराकडील योद्धे मनांतल्या मनांत चपापून गेले. फजलउल्लाखान धारवाडचा नीट बंदोबस्त करून पेशवे स्वतः आल्याचें वर्तमान हैदराला सांगायला गेला. माधवरावसाहेबांनीं कर्नाटकांत गेल्याबरोबर हैदरानें उठविलेली ठाणीं फिरून बसविण्यास सुरुवात केली आणि हैदराला कोठें गांठावें, लढाई कोठें द्यावी, या विचाराला ते लागले.

हैदराला स्वतःच्या शक्तीविषयीं फार अभिमान होता. आपले लोक गांगरले आहेत असें पाहून त्यानें त्यांना पुष्कळ दमाच्या गोष्टी सांगितल्या आणि तो पेशव्यांच्या सैन्याइतकें सैन्य जमवून निकराची लढाई करण्याकरितां अन्नावति येथून निघाला. हैदराचा असा समज होता, कीं पेशवे आपण त्यांना जाऊन गांठण्याच्या अगोदर आपल्यावर चालून येतील. कारण असें होणें त्याला इष्ट होतें. तो ज्या भागांतून येत होता तो भाग किर्र झाडीचा होता. माहितगारावांचून त्या भागांत इतराला मार्गही काढता येण्यासारखा नव्हता. यामुळें हैदराची फार इच्छा होती कीं, पेशव्यांच्या सैन्यानें घुसून पुढें यावें आणि आपण त्यास झाडींत गांठून जेर करावें. पण पेशवे आपण बसविलेलीं ठाणीं उठविण्याच्या नादांत गुंतले आहेत व त्यांनीं बहुतेक ठाणीं उठविलीं असें जेव्हां त्याला समजलें, तेव्हां तो लवकर लवकर पुढें येऊं लागला.

माधवरावसाहेब व सखारामबापू यांनीं विचार केला कीं, हैदराची लढाईची उमेद मोठी आहे, त्याला एकामागून एक जय येत गेले असल्यामुळें त्याच्या लोकांची त्याजवर एक प्रकारची भक्ति बसली आहे आणि त्यामुळें ते चांगल्या अवसानानें लढतात, याकरितां त्याच्याशीं सरळ लढाई द्यायची नाहीं. मराठ्यांच्या सैन्याला फुटून टोळ्या टोळ्यांनीं शत्रूंवर छापे घालून, त्याला सळो कां पळो करून सोडण्याचा ओनामा विजयध्वज छत्रपतींनीं जो एकदां घालून दिला तो, तें शेवटपर्यंत विसरलें नाहीं. कोणी कांहीं ह्मणोत, अशा प्रका-

रचे छापे घालणें ह्मणजे ती कांहीं लढाई नव्हे, चोरांचें, दरोडेखोरांचें हें कसब, असें जरी कोणीं ह्मटलें तरी हरकत नाहीं. पण अशा प्रकारचे छापे घालायला छाती व बुद्धि या दोहींचाही मिलाफ हावा लागतो हें निःसंशय आहे. घोडा, तलवार, बंदूक पाळणाऱ्या हजार पांचशें लोकांच्या टोळीवर पांच पन्नास लोकांनीं तुटून पडायचें आणि त्या टोळींतील शें दोनशें शिपाई कापून, पहातां पहातां अदृश्य व्हायचें, याला छाती व बुद्धि या दोनच नव्हेत, तिसरी विलक्षण चपलता नको काय? अशा प्रकारें छातीचें, बुद्धीचें व चपलतेचें काम करणाऱ्यांना लुटारू, बंडखोर, चोर ह्मणायचें आणि पन्नास हातावरून गोळी मारणारांना शूर ह्मणायचें! ही शूरपणाची व्याख्या कोणाला बिनचूक वाटत असेल ती वाटो. पण खरें पाहिलें तर जे हातांत तलवार घेऊन छातीला छाती भिडवून रण माजवतील तेच खरे शूर होत. मराठे शिपाई असे होते, त्यांना त्यांच्या तलवारीची व स्वतःच्या हाताची खात्री होती ह्मणूनच ते हजारों लोकांवर तुटून पडायला कचरत नसत. राज्यकर्त्यांनीं व त्यांच्या जातीच्या इतिहासकारांनीं मराठे शिपायांना शूर म्हटलें नाहीं, व त्यांच्या लांबून गोळ्या मारणाऱ्या शिपायांना शूर ह्मटलें, ह्मणजे तें सत्य झालें अशांतला भाग नाहीं. काल निरवधि आहे, त्यांत जें सत्य आहे तेंच सत्य ठरल्यावांचून रहाणार नाहीं. असो. हैदराच्या सैन्यावर पेशव्यांच्या सैन्याच्या लहान लहान टोळ्यांचे घाले पडूं लागले, त्यानें त्याच्या सैन्याचें फार नुकसान झालें. आणि अशा घाल्यामुळें तो फार संताप-

ला. त्यानें माधवरावसाहेबांवर तुटून पडण्याचा निश्चय केला, तेव्हां त्यांनींही आपल्या सैन्याला लढाईचें तोंड देण्याविषयीं आज्ञा केली. मृग लागण्याच्या सुरवातीला हैदराची व माधवरावसाहेबांचीही लढाई झाली. माधवरावसाहेबांनीं प्रथम लढाईला आपलें अगदीं थोडें सैन्य उभें केलें होतें. त्यामुळें हैदरचे लोक फार चढून गेले. घुंगुरट्यासारखें या लोकांना आपण मारूं असें ते आपापसांत बोलूं लागले. पण लढाईला सुरवात झाल्यावर समुद्राला भरती यावी त्याप्रमाणें पेशव्यांचें सैन्य वाढत चाललेलें पाहून, हैदराच्या सैन्याचा दम तुटत चालला. आणि माधवरावसाहेबांच्या आज्ञेवरून पेशव्यांच्या सैन्यानें जेव्हां अतिजोराचा मारा चालविला तेव्हां हैदराच्या सैन्याचा धर सुटून तें रानोमाळ पळूं लागले. पेशव्यांच्या सैन्यानें त्यांचे मागें लागून त्यांस पळता भुई थोडी केली आणि अशा रीतीनें विजयशाली ह्मणून चढून गेलेल्या हैदराला माधवरावसाहेबांनीं लाज उत्पन्न केली. पुढें थोड्या दिवसांतच पाऊस पडण्यास सुरवात झाल्यामुळें लढाई बंद ठेवून एक जागा धरून रहावें लागलें. हैदर आपल्या पूर्वीच्या ठिकाणीं जाऊन राहिला आणि माधवरावसाहेबांनीं नरींद्र येथें ठाणें दिलें. पण त्यानीं आपले घोडेस्वार आसपासच्या वीस कोसांतील खेडेगांवांतून रहाण्याकरितां पाठवून दिले.

माधवरावसाहेबांनीं हैदराबरोबर ही जी पहिली लढाई दिली, तिजवरून त्यांची हुषारी विशेष आहे आणि पदरच्या लोकांवर हुकुमत चांगली आहे अशी हैदरा-

ची खात्री झाली. माधवरावसाहेबांचें वय लहान असून कर्तबगारी मोठी हें पाहून त्याला फारच नवल वाटलें. त्यांनीं आपले घोडेस्वार, पावसाळ्यांत राहण्याकरितां भोंवतालच्या खेडेगांवांत पाठवून दिले यावरूनही त्यांचें शहाणपण दिसून येतें. चांगल्या मनुष्यांच्या अंगीं आकर्षणशक्ति असतें असें विद्वानांचें म्हणणें आहे त्याचीही सत्यता माधवरावसाहेबांच्या या स्वारींत दिसून आली. नरींद्र येथें माधवरावसाहेबांचा मुक्काम असतांना अबदुल मजीदखान आणि मुरारराव घोरपडे हे दोघे आपण होऊन त्यांना येऊन मिळाले. मुरारराव हा संताजी घोरपड्याचा वंशज असल्यामुळें माधवरावसाहेबांनीं त्याला पुष्कळच मान दिला. आणि अबदुल मजीद याचाही योग्य मान केला. हे पावसाळ्याचे दिवस होते आणि हैदर राहिला होता, त्या भागांत झाडी किर्र व पाऊस पुष्कळ होता, तरी माधवरावसाहेब गुप्त हेर पाठवून हैदरचे काय काय बेत चालले आहेत, तो आपलें सैन्य वाढवितो आहे कीं काय, ही बातमी आणवीत असत. त्यांना पुण्याहून रोजची डाक येऊन मिळत असे. आणि त्यांच्याकडून पुण्यांतील कारभारी मंडळींना कांहीं हुकूम सुटत असत व जरूरीची माहिती विचारिली जात असे. राघोबादादा आनंदवल्लीस जाऊन राहिल्यामुळें माधवरावांना अशा प्रकारची व्यवस्था ठेवावी लागली होती.

पावसाळा संपतांच माधवरावसाहेबांनीं धारवाडला वेढा दिला व तें हस्तगत करून घेतलें. मागच्या लढाईवरून हैदर यावेळीं शहाणा झाला होता. तो होऊन

लढाईचें तोंड देईनासा झाला इतकेंच नाहीं, तर त्यानें यावेळीं कांहींसा, मराठे शिपायांच्या लढाईच्या तऱ्हेचा कित्ता उचलला. लहान लहान झटापटी नेहमीं होत. त्यांत माधवरावसाहेबांच्या लोकांनाच जय येत असे. पण चाललेल्या प्रकारावरून लढाई लवकर संपेल असें माधवरावसाहेबांना वाटेना. राघोबादादा आनंदवल्लीस रागावून जाऊन बसले याचें त्यांना वाईट वाटत असे. राघोबादादांच्या वांचून त्यांचें कांहीं आडलें नव्हतें, तरी ते वडलांच्या ठिकाणीं असतांना त्यांनीं रागावलेलें असावें हें माधवरावसाहेबांना आवडत नसे. लढाई लांबली याचा उपयोग करून घेण्याचें त्यांनीं मनांत आणलें. हैदरला आपण शरण आणूं ही त्यांना पक्की खात्री होती, तरी त्यांनीं आपल्याकडे कमीपणा घेऊन राघोबादादा यांना हैदराचा समाचार घेण्याकरितां एक नम्रतापूर्वक पत्र लिहून बोलाविलें. अशा प्रकारचें पत्र लिहिल्यानें दादांचा राग जाईल अशी माधवरावसाहेबांची कल्पना होती व ती खरी ठरली. माधवरावसाहेबांचें पत्र पाहतांच राघोबादादांनीं कर्नाटकांत येण्याची तयारी केली व ते स्वारींत येऊन दाखल झाले. राघोबादादा आल्यावर माधवरावसाहेबांनीं त्यांच्या तंत्रानें चालण्याचें धोरण ठेवलें.

जसा आजच्या कथेचा नायक माधव सर्वांगसुंदर तशीच त्याची जाया रमा सती होती. आणि ह्मणूनच ती सती गेली. ही शिवाजी बल्लाळ जोशी सोलापूरकर पागे यांची कन्या. धन्य ते सोलापूरकर जोशांचें घराणें. शिवाजीराव जोशी यांची पुण्याई अति थोर. त्याखेरीज

असें खरेंखुरें कन्यारत्न कोठून लाधणार? अजूनही बाळंतिणी संबंधाचें मराठींत पत्र लिहिण्याचा प्रसंग आला ह्मणजे कन्यारत्न झालें ह्मणून लिहितात. पण त्या रत्नांच्या वेधना बापांना विचाराव्यात कशा असतात त्या. अलीकडे एक पोटबाबू वेदांत्यांचा वर्ग निघाला आहे, त्याला मुलीबहिणी कशा निपजतील याची काळजी नाहीं असें तो बोलून दाखवो, पण त्रिव्याचें तेल हें उतायचेंच. साल निघाल्यावांचून तें बरें व्हायचें नाहीं. अंधेरांत झालें तरी उजेडांत यायचें. पण याची शरम वाटून सती माते रमेसारख्या स्त्रीरत्नांचीं मंगलचरितें भगिनींस व कन्यांस वाचायला देण्याची अथवा सांगण्याची बुद्धि होत नाहीं! पेशव्यांच्या चित्पावन कुलांत अधिक मोलाचीं रत्नें अशीं हींच दोन. पुरुष मंडळींत माधवरावसाहेब आणि स्त्रीजनांत माता रमा. खरें लिहितांना बाजीरावसाहेबांच्या वरती रावसाहेबांना जागा दिली, तर बाजीरावसाहेबांच्या आत्म्याला वैषम्य नाहीं वाटणार. सत्पुत्राबद्दलचा आनंद कांहीं अपूर्व आहे. त्याच्या भरांत तो आपल्या हातानेंच पुत्राला डोकीवर घेईल. आणि या जोडींत देखील माता रमेला, दंतकथा अधिक मानीत आल्या आहेत. थोडक्यांत सांगायचें ह्मणजे इतकेंच कीं, रावसाहेबांच्या समागमांत अंतर येण्याचा प्रसंग आला ह्मणजे रमाबाईसाहेबांना कसें होईल याचें भय वाटे! रावसाहेबांना त्या एकटे स्वारीवर जाऊं देत नसत. स्वारीवर बायकांचें काय काम आहे! आह्मीं लढाईवर जावें कीं तुमचें रक्षण करीत, तुह्माला धीर देत बसावें? असल्या ऐटी-

च्या गोष्टी ऐकून रमा गोरेंमोरें तोंड करून बसणारी नव्हती. आपल्याबरोबर मीही लढाईवर येईन असें ती रावसाहेबांना झटकन् म्हणण्यासारखी होती. आणि हें रावसाहेबांना माहीतही पण होतें. तथापि रावसाहेबांची रमाबाईंना स्वारीवर आणण्याबद्दल नकाराची झोड असे. पण परस्परांचें अत्यंत प्रेम असल्यामुळें रमाबाईंची गोष्ट त्यांच्यानें मोडवत नसे. व अशा फार दिवस लागणाऱ्या स्वारीवर, रमाबाईसाहेब गेल्यावांचून रहात नसत. रमाबाईसाहेबांना तीर, बंदूक मारतां येत असे. त्या हातांत पट्टे चढवीत आणि घोड्यावर चांगल्या बसत. ह्या गोष्टी त्यांना कराव्या लागत नसत; परंतु त्यांच्या दूरदर्शी शहाणपणाचें असें होत नव्हतें; त्याचा उपयोग होत होता. रावसाहेब त्यांचा सल्ला नेहमीं घेत. रमाबाईसाहेबांच्या अंगीं ही जी योग्यता आली ती त्यावेळीं कन्याशाळा नसतांना आली होती. आणखी कन्यांना शाळांतील शिक्षणापेक्षां गृहशिक्षणच मिळावें हें बरें. शाळांतील बाजारी शिक्षणानें स्त्रीजातीला भूषणभूत होणाऱ्याच नव्हे, अधिक योग्यता आणणाऱ्या विनयादि गुणांचा संभव क्वचितच झालेला अनुभवास येतो! असो. हें जें मध्यंतरींच रमाबाईसाहेबांचें मंगलस्मरण झालें, तें सकारण झालें. रावसाहेबांनीं हैदराचें पाणी एकदां तोललें गेलें असतां, राघोबादादांना स्वारीवर बोलाविलें तें रमाबाईसाहेबांच्या सल्ल्यावांचून झालें नाहीं. माधवरावसाहेब आवेशांत दहांना भारी होत, पण ते प्रकृतीनें अशक्त होते. रमाबाईसाहेब नेहमीं रावसाहेबांच्या बरोबर असण्याचा प्रयत्न

करीत, त्याचें हेंही एक दुसरें कारण होतें. कर्नाटक ची हवा, त्यांत पावसाळा गेलेला आणि श्रम स्वारीवरचे, हें सारें अनुभवून रमाबाईसाहेबांनीं राघोबादादांच्या गळ्यांत पुढली हैदराबरोबरची लढाई घातली व त्यांचा रागही घालविला.

राघोबादादा—ताज्या दमाचे आलेले, त्यांनीं हैदराच्या सैन्याच्या तळावर जाण्याची त्वरा चालविली. हैदराच्या सैन्याचा तळ अन्नावती येथेंच होता. राघोबादादा व माधवरावसाहेब आपल्यावर चालून येत आहेत हें समजलें असल्यामुळें तोही तयारींत होता. तथापि त्याच्या तळाभोंवतीं गगनचुंबित वृक्षराजींचा दाट कोट असल्या कारणानें त्याला शत्रूंच्या येण्याची इतकीशी भीति वाटत नव्हती. पेशव्यांचें सैन्य तेथपर्यंत जाऊन पोहोंचल्यावर पुढें जाण्याचा त्याचा मार्ग खुंटला. अन्नावती येथील हैदराच्या सैन्याच्या तळावर जाऊन हल्ला करायला तें मार्ग शोधूं लागलें. परंतु पेशव्यांचे सैन्याला जाण्यासारखा मार्ग सापडेना. तेव्हां रावसाहेबांनीं झाडें तोडून पुढें मार्ग काढण्याविषयीं आज्ञा केली. मोठमोठे स्वेच्छ वाढलेले वृक्ष धडाधड खालीं पडूं लागले. रावसाहेबांनीं आपल्या सैन्याकडून झाडी तोडविण्याचा सपाटा लाविल्यावर हैदराचें धाबें दणाणून गेलें. त्यानें झपाट्यानें अन्नावती येथील आपल्या सैन्याचा तळ हालविला. या भागांत इतकी गर्द झाडी होती कीं पेशव्यांचें सैन्य दोन दिवस झाडी तोडीत होतें व पुढें सरकत होतें. तिसऱ्या दिवशीं मात्र पुष्कळ कमी झाडीचा भूभाग लागला. हैदर आपला

तळ उठवून बेदनूरकडे गेला हें रावसाहेबांना समजलें होतें. तेव्हां त्यांनीं आपल्या सैन्यापैकीं कांहीं पुढें पाठवून त्यांस हैदराला आडविण्याची कामगिरी सांगितली. आणि बाकीच्या सैन्याला त्याचा पाठपुरावा करण्याची आज्ञा दिली. पुढच्या सैन्यानें त्वरा करून तें हैदराचें सैन्य व बेदनूर यांच्यामध्यें जाऊन उभें राहिलें. याप्रमाणें पेशव्यांनीं आपल्याला दोहींकडून आडवलेलें पाहून हैदराला लढाई देण्याकरितां उभें रहावें लागलें. पेशव्यांच्या सैन्याचा पुढून व मागून असा दोहींकडून हल्ला होऊं लागला तो हैदराच्या सैन्याला सहन होईनासा झाला. तें कांहीं वेळ पेशव्यांच्या सैन्याबरोबर लढलें परंतु पेशव्यांचे जसें जोराजोराचे हल्ले होऊं लागले तसें हैदराच्या सैन्यांतील लोक आपल्या जीवाचें रक्षण करण्याकरितां लढाईची जागा सोडून झाडींत पळून जाऊं लागले. याप्रमाणें हैदराच्या सैन्यानें कच खाल्लेली दृष्टीस पडतांच, पेशव्यांच्या सैन्यांत विलक्षण वीरश्री संचरून त्यानें केवळ लांडगेतोड चालविली. मग हैदराच्या सैन्याची दशा काय पुसावी ? हैदराबरोबरही साठ हजार सैन्य होतें. पण तो जेव्हां जीव घेऊन बेदनुरांत पळाला तेव्हां त्याजबरोबर सुमारें अडीच हजार स्वार आणि दहाएक हजार पायदळ होतें. बाकीच्या लोकांपैकीं कित्येक दडायला जागा सांपडली तिकडे जाऊन दडाले व कित्येक हजार लढाईंत मृत्यु पावले. याप्रमाणें हैदराचा मोड झाल्यावर पेशव्यांच्या सैन्यानें भोंवतालचीं बहुतेक सर्व ठिकाणें हस्तगत करून घेतलीं. हैदर बेदनूर येथें

जाऊन राहिल्यावर त्यानें फिरून जमाजम करून पाहण्याचा प्रयत्न केला. परंतु पेशव्यांच्याबरोबर लढाई देण्यासारखी जमाजम होण्याची त्याला आशा दिसेना. अनंतपूर व बेदनूर हीं कायतीं दोन ठिकाणें आपल्याकडे राहिलीं आहेत, पण हींही पेशवे आतां आपल्याकडे फार दिवस राहूं देणार नाहींत, हें हैदराला पक्कें समजून आल्यामुळें त्यानें राघोबादादांशीं तहाचें बोलणें लाविलें.

राघोबादादा लढाईच्या कामाला चांगला होता. लढाईला सुरुवात झाली ह्मणजे त्याच्या अंगांत आवेश चढे. इतकेंच नाहीं, तर तो आपल्या लोकांतही आवेश उत्पन्न करी. शत्रु कितीही दूर असला तरी त्याला गांठून गांगरून सोडण्याचें कसब राघोबादादांत विलक्षण होतें. एकदां शत्रूवर तुटून पडल्यावर त्याला गोगलगाय बनविल्यावांचून तलवार म्यानांत अशी घालायची नाहीं, हा तर राघोबांचा बाणा होता. याच प्रमाणें त्यांच्या अंगांत विलक्षण ताकद होती. दमणें त्यांना माहीत नव्हतें. घोड्यावर बसण्याच्या संबंधांत रोज चाळीस कोस याप्रमाणें आठ दिवस मजल मारली, तरी गृहस्थ माझ्या मांड्या दुखूं लागल्या असें ह्मणायचा नाहीं! पण तो लढाईच्या कामीं जसा चांगला तसा इतर कामांत नव्हता. भोळा बिचारा. सावज हातीं आल्यावर त्याला घेरून आपला फायदा कसा करून घ्यावा, त्याच्यावर आपली कायमची छाप कशी राखावी हीं राज्यप्रकरणीं धोरणें त्याला मुळीं माहीत नव्हतीं. चढून गेले-

ल्या हैदराची रावसाहेबांनीं या स्वारींत बिल्ली बनविली, तसाच तहांत त्याला लंगडा करण्याचा रावसाहेबांचा विचार होता. पण त्यांनीं राघोबा दादांना सर्व अधिकार दिल्यामुळें तहाच्या संबंधांत त्यांना बोलतां येईना. सारांश रावसाहेबांना राघोबादादांनीं केलेल्या तहापासून स्वारीखर्च बत्तीस लाख रुपये मिळण्यापलीकडे ह्मणण्यासारखा फायदा झाला नाहीं. वास्तविक ह्मणण्यासारखें कारण उत्पन्न झालें नसतांना, केवळ राघोबादादांचा राग घालविण्याकरितां रावसाहेबांनीं नम्रतापूर्वक पत्र लिहून त्यांना स्वारीवर बोलाविलें, सेनापतित्व त्यांना दिलें आणि शेवटीं आपल्या मनासारखा ते तह करीत नाहींत असें कळूनही त्यांना दुखवायचें नाहीं ह्मणून त्यांच्या मनासारखा तह करूं दिला; यावरून माधवरावसाहेबांचा थोरपणा व्यक्त होत नाहीं काय? राघोबादादांच्या संबंधांत रावसाहेब नेहमीं इतके सरळ वागत होते, पण त्याचा आनंदीबाईनें कांहींएक उपयोग होऊं दिला नाहीं. रावसाहेब या स्वारीवरून परत पुण्यास गेल्यावर या घरांतल्या भाऊबंदकीच्या संबंधांत त्यांना कांहीं दिवस विचारांत घालवावे लागले. येथें हेंही सांगितलें पाहिजे कीं, भाऊबंदकीचे तंटे बायका माजवितात असें लोक नेहमीं बोलतात, तें कांहीं खोटें नव्हे. रावसाहेबांच्या मातोश्री गोपिकाबाईसाहेब यांचें मन आनंदीबाईनें अगदीं विटविलें असल्यामुळें त्याही रावसाहेबांचें लक्ष या भाऊबंदकीच्या संबंधांत लावण्याचा प्रयत्न करीत. त्यामुळें त्यांच्या हातून होण्यासारखीं कित्येक कामें मागें पडलीं!

# तुळाजी अंग्रे.

आपल्या स्वराज्यांतील पूर्वजांचा इतीहास हें स्पष्ट करून दाखवितो, कीं महाराष्ट्रांतील लोकांत अथवा हिंदूंत त्यांनीं परकीयांच्या राज्यसत्तेखालीं सदैव रहावें अशा प्रकारचें मिळमिळीत रक्त विधात्यानें घातलें नाहीं. उच्चनीच अवस्था पृथ्वीच्या पाठीवरील प्रत्येक देशाच्या मागें लागली आहे. त्याप्रमाणें कालचक्राच्या फेऱ्यांत, हिंदूंना कांहीं शतकें मुसलमानांच्या जुलमी अमलांत काढावीं लागलीं. हिंदु लोक हिंमतबहाद्दर नव्हेत असें कधींच कोणाला ह्मणतां येणार नाहीं. जगांत शूर राष्ट्रें ह्मणून जीं कांहीं आहेत किंवा होऊन गेलीं त्यांच्या वर्गांत महाराष्ट्रदेशाची स्थापना जो कोणी जगाचा इतिहास प्रांजलपणें लिहील त्याला करावी लागेल. जगांत परकीयांचें दास्यत्व करण्याकरितां हिंदु लोकांना परमेश्वरानें उत्पन्न केलें आहे असले उद्गार सध्यां ऐकूं येतात; पण वाघाला पिंजऱ्यांत कोंडल्यावर मुलें देखील खडे मारतात, हें लक्षांत आणून स्वस्थ बसण्यावांचून याला दुसरा उपाय नाहीं. आणि आजच्या स्थितीकडे पाहतां, परकीयांचें दास्यत्व करण्याकरितां हिंदु लोक जन्मास आले आहेत हें खरेंच आहे; ह्मणून हिंदु लोक असेच राहतील असें मात्र कोणीं ह्मणूं नये. कारण त्यांच्या थोड्या दिवसांच्या स्वराज्याचा इतिहास अगदीं निराळी साक्ष देतो. राज्य क-

मवायला व तें राखायला अंगांत जें गरम पाणी लागतें तें असावें तसें मराठे वीरांच्या अंगांत होतें. आणि तें कधींही निर्मूल व्हायचें नाहीं. राखेखालीं अग्नि रहातो हा अनुभव सर्वत्र आहेच.

आपण कोण व परके कोण, कोणाला जवळ घ्यावें व कोणाला दूर लोटावें, कोणाच्या अपराधांची क्षमा करावी व कोणाला शासन करावें, या स्वराज्याला चिरस्थाई करणाऱ्या तत्त्वांचें नीट रीतीनें परिशीलन न झाल्यामुळेंच, प्रत्यक्ष यमाशीं झगडण्यासारखे स्वराज्यांत वीरपुरुष असताना तें लयास गेलें यांत कांहींएक संशय नाहीं! मराठे सरदारांनीं जाऊन निजामाला मिळावें, सेनापती, गायकवाड,पवार यांनीं थोरल्या बाजीरावसाहेबांबरोबर लढाई करावी, खटावच्या राजांनीं बंड करावें, पेशव्यांच्या चुलत्यानें इंग्लिशास घरांत आणावें, भोसल्यांनीं पेशव्यांशीं लढावें, असले जे स्वराज्यांत प्रकार झाले, त्यामुळें परकीयांना वाढलेल्या पानावर बसून सुग्रास पक्वान्नावर यथेच्छ ताव मारतां आला! जें होऊन गेलें त्याबद्दल शोक करणें व्यर्थ आहे. पूर्वेतिहासापासून आतां तरी आपण, आपण कोण व परके कोण हें शिकलें पाहिजे. ज्यांना आपण आपलें ह्मटलें पाहिजे असे लोक पुष्कळ आहेत, हें आपल्या दयाळू राज्यकर्त्यांनीं आपणांस दिलेल्या उदार शिक्षणामुळें आपल्याला कळूं लागलें, याबद्दल आपण त्यांचे मानावेत तितके उपकार थोडे आहेत. असो.

अंग्र्यांचें घराणें हें कांहीं हिंदूतरांचें नव्हे. आंग्रे हे हिंदूच होते. या घराण्याचा आजच्या मित्तीला जो

इतिहास उपलब्ध आहे व या घराण्याच्या संबंधाच्या ज्या दंतकथा ऐकायला मिळाल्या आहेत त्यांवरून या घराण्यांतील पुरुष फार शूर, मोठे मानी आणि निधड्या छातीचे होते. परंतु लिहिण्याला खेद वाटतो कीं, स्वराज्याला या घराण्यांतील पुरुषांचा व्हावा तसा उपयोग झाला नाहीं; अथवा गोंजारून जवळ कोणाला घ्यायचें आणि शस्त्र कोणावर उचलायचें याचा पोक्तपणें विचार करितां न आल्यामुळें, स्वराज्याला या घराण्यांतील कित्येक शूर पुरुषांचा उपयोग करून घेतां आला नाहीं. आंग्रे यांचें घराणें पहिल्यापासून समुद्राच्या बाजूचें रक्षण करणारें होतें. आणि या घराण्याला नीट वागवून घेतां आलें असतें, त्याला उत्तेजन दिलें गेलें असतें, तर समुद्रावरच्या लढाईंत स्वराज्याकडे शेवटपर्यंत जो कमीपणा आला तो आला नसता. अंग्रे यांनीं ठेंचा खातां खातां आपल्या धंद्यांत पूर्ण सुधारणा केली असती. आणि समुद्राच्या बाजूनें हिंदुस्थानावर जी वारंवार टोळधाड येत असे, तिचें उत्तम रीतीनें निवारण केलें असतें. पण स्वकीय कोण व परकीय कोण याचा दुर्दिनांतल्या वावटळीप्रमाणें वारंवार उठणाऱ्या रणधुमाळ्यांच्या गर्दींत शांतपणें विचार न झाल्यामुळें नानासाहेब पेशव्यांच्या कारकिर्दींत इंग्रजांचें साह्य घेऊन तुळाजीराव अंग्रे याला धुळीस मिळविण्याची तयारी पेशव्यांनीं केली. आंग्रे आपल्याला पेशव्यांच्या आश्रयाखालचे समजत. तुळाजीराव मस्त झाला होता हें जरी खरें असलें, तरी त्याचीं नखें उपटून काढण्याकरितां पेशव्यांनीं इंग्रजांची मदत घेणें ह्मणजे दुसऱ्या-

कडून आपलें दांत पाडून घेण्याप्रमाणें होतें. माधवराव-साहेबांच्या कारकिर्दीत असा प्रकार झाला असता, तर त्यांनीं अंग्र्याला मारण्याकरितां इंग्रजांची मदत कधीं घेतली नसती.

व्यापाराकरितां पांच हजार कोसांवरून आलेली मंडळी दोघांच्या भांडणांतला खवा खातां खातां, जबरदस्त होऊन आपलें तिसरें राज्य स्थापून बसली; हें पहात असतांना आपल्या पूर्वजांनीं त्यांच्यावर विश्वास ठेवून आपले हात तोडून घेतले, हा त्यांच्या बुद्धींतला कमीपणा आपण कबूल न करणें ह्मणजेच आपण खळग्यांत जाऊं पहाणें ! पण असाही प्रश्न उद्भवतो कीं, त्या वेळच्या इंग्रजांनीं आपल्या पूर्वजांच्या चांगुलपणाचा फायदा कशावरून घेतला नसेल ? व्यापाराकरितां ह्मणजे पोट भरण्याकरितां आलेले हे लोक, तेव्हां आपल्या पूर्वजांनीं सात्विकस्वभावानुसार त्यांची कींव केली असेल. तथापि मनुष्यस्वभावाची परीक्षा कमी हा त्यांच्याकडे दोष जातोच. कारण त्या वेळच्या इंग्रजांचें वर्तन कांहीं अगदींच साधें नव्हतें. आपण गरीब आहोंत, न्यायानें वागणारे आहोंत, असें ते त्यांच्या कामाच्या वेळीं एकाद्या साधूचें सोंग घेऊन दाखवीत. परंतु जरासें दुसऱ्याचें नाक हातीं यायची वेळ आली, कीं ते कांहीं निराळेंच स्वरूप दाखवीत. मि. रिचर्ड बोरचीर इ. स. १७५० च्या नोव्हेंबरांत बॉंबे गव्हरमेंटचा मुख्याधिकारी होऊन आल्यापासून, पेशव्यांच्या बरोबर त्यानें लीनतापूर्वक पत्रव्यवहार चालविला होता. हा पत्रव्यवहार चालविण्यांतला त्याचा हेतु,

पेशव्यांनीं सुरतेच्या संबंधांत, व तुळाजी अंग्रे याचा इंग्रजांना जो त्रास सोसावा लागत होता, त्याकरितां त्याचा नाश करण्यांत साह्य करण्यास तयार व्हावें हा होता. ही गोष्ट येथें ध्यानांत ठेवली पाहिजे कीं, सुरतेच्या संबंधांत पेशव्यांपाशीं इंग्रज जें साह्य मागत होतें, त्यांत पर्यायानें पेशव्यांचेंच नुकसान होतें. आणि अंग्र्यापासून इंग्रजांना जो त्रास पोंचत होता त्यापेक्षां पेशव्यांना पुष्कळच कमी पोंचत होता. आणखी एक गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. जंजिऱ्याच्या सिद्धीकडून हिंदुप्रजेवर कसकसे भयंकर जुलूम होत असत हें त्यावेळीं सर्वप्रसिद्ध होतें. खुद्द नानासाहेब पेशव्यांच्या अजोबांनाही सिद्धीचा जुलूम सोसावा लागला होता. त्या सिद्धीचे इंग्रज दोस्त. आणि ते कशाकरितां, तर त्याच्या राज्यांतून इंग्रजांना हव्या तितक्या गाई खाण्याकरितां मिळत ! या बाजूंनीं विचार केला व शिवरायांनीं कोणत्या हेतूनें स्वराज्याची स्थापना केली हें लक्षांत आणलें, ह्मणजे पेशव्यांनीं तुळाजी अंग्र्यांचा बंदोबस्त करण्याकरितां इंग्रजांचें साह्य घेतलें किंवा त्यांना साह्य केलें, हें पाप केलें असें होत नाहीं काय ? !

इंग्रज लोक इ. स. १७५० पासून, बाणकोट आणि सांवतवाडी यांमधील मुलूख बळकावून आपल्या हद्दींत व बाहेरच्याही हद्दींत येणारीं जहाजें लुटण्याचा सपाटा लावलेल्या तुळाजी अंग्रे यांची खोड मोडण्याकरितां पेशव्यांच्यापाशीं साह्य मागत होते. परंतु गुजराथची व्यवस्था लावण्यांत, अहमदाबाद घेण्यांत, कर्नाटकांतली स्वारी करण्यांत पेशवे गुंतले असल्यामुळें १७५५

पर्यंत इंग्रजांना त्यांना साह्य करितां आलें नाहीं. ते जेव्हां या कामांतून मोकळे झाले, तेव्हां त्यांनीं इंग्रजापाशीं हा विषय काढला. यांतला वास्तविक प्रकार, इंग्रजांना पेशव्यांचें साह्य पाहिजे होतें असा होता. पण पेशव्यांनीं, इंग्रज चार वर्षें आपल्यापाशीं साह्य मागत असतां तें आपणास देतां आलें नाहीं अशा बुद्धीनें, आपण होऊन या संबंधाची गोष्ट मुंबईच्या अधिकाऱ्यापाशीं काढतांच, इंग्रज इतिहासकार, अंग्रे याला मोडण्याकरितां पेशव्यांनीं साह्य मागितलें असें ह्मणूं लागले! का; कसे आहेत इंग्रज इतिहासकार नीतीचे कट्टे भक्त ? ! आणि त्या वेळच्या इंग्रज अधिकाऱ्यांनींही आपली नीति दाखविण्यास कमी केलें नाहीं. पेशव्यांनीं आपण होऊन गोष्ट काढतांच ते फुगले! मार्चचा महिना होता. तरी त्यांनीं समुद्रांतल्या लढाईला हे दिवस चांगले नाहींत अशा प्रकारें ओढून चंद्रबळ आणलें. खरें पाहिलें असतां अंग्रे याला मोडण्याविषयीं त्यांनाच अधिक उत्सुकता होती, कारण अंग्रचामुळें त्यांचें फार नुकसान होत होतें. त्या वेळच्या मुंबईच्या मुख्याधिकाऱ्याला अशा प्रकारची लढाई वगैरे करण्याचा अधिकार नव्हता. परंतु त्यानें आपल्या हिताकडे लक्ष देऊन पेशव्यांशीं अटी ठरवून तयारी केली. मि. कमोडर जेम्स यांस आपल्या आरमारावर अधिकारी नेमिलें. या संबंधांत ज्या अटी ठरविल्या गेल्या त्यांत पेशव्यांचा ह्मणण्यासारखा फायदा नसतांना त्या त्यांनीं कशा कबूल केल्या याचें नवल वाटतें! रामाजी महादेव हे जरी त्या अटी ठर-

विण्यांत होते, तरी पण शंका येते. त्यावेळीं ज्या अटी ठरल्या त्यांत अंग्रे याचीं जीं जहाजें हातीं लागतील तीं दोघांनीं वांटून घ्यावीं, पण तोफा व इतर सामान पेशव्यांनीं घ्यावें, समुद्राचा अधिकार इंग्रजांना द्यावा, बाणकोट, हिंमतगड त्या खालची नदी व जवळचीं पांच खेडीं इंग्रजांस द्यावी असा सढळ प्रकार होता, तरी त्यांची कुरकूर होतीच. तरी अंग्र्याला नाहींसें करणें हें इंग्रजांना इष्ट असल्यामुळें पेशव्यांचें साह्य येऊन पोंचलें कीं नाहीं, याची चांगली चौकशी न करितां मि. कमोडर जेम्स यांनीं मुंबई येथील अधिकाऱ्याच्या हुकुमानें मार्चच्या बावीस तारखेला आपलीं लढाऊ गलबतें मुंबईच्या बंदरांतून हाकारलीं.

तुळाजी अंग्रे हा समुद्रावरची लढाई करण्यांत सुगर होता. सुवर्णदुर्ग आणि विजयगड हे त्याच्या किल्ल्यांपैकीं दोन किल्ले चांगले मजबूत आणि लांबवर मारा करणारे होते. मि. कमोडर पेशव्यांच्या जहाजांची वाट न पाहतां मोठ्या वीरश्रीनें चालून आले, पण तुळाजी अंग्र्यानें एखाद्या पोराला खेळवावें त्याप्रमाणें त्यांना खेळविलें इतकेंच नाहीं, तर इंग्रजांना पेशव्यांचीं लढाऊ जहाजें येईपर्यंत माघार घ्यावी लागली. परंतु तीं आल्यावर समुद्रांतून दोघांचा मारा होऊं लागला आणि जमिनीवर रामाजी महादेव आणि समशेरबहाद्दर यांनीं अंग्र्याच्या मुलखांत आपले पराक्रम गाजविण्यास आरंभ केला. तेव्हां अंग्र्याचा सुवर्णदुर्ग किल्ला इंग्रजांच्या हातीं आला. या झटापटींत इंग्रजांच्या आरमारावरचें एकही मनुष्य जाया

झालें नाहीं, असें इंग्रज इतिहासकारांचें ह्मणणें आहे. आणि ते असेंही ह्मणतात कीं, हा जो किल्ला हस्तगत झाला तो केवळ मि. कमोडर जेम्स याच्या शौर्या-मुळें होय. पेशव्यांच्या जहाजांवरच्या मुख्यास समुद्रावरची लढाई कशी करावी हें मुळीच माहीत नव्हतें. तो अंग्र्याला अगदीं भ्यायला होता व त्यानें आपलीं जहाजें माऱ्याच्या बाहेर ठेवलीं होतीं. घटकाभर आपण अशी कल्पना करूं कीं, हें इंग्रज इतिहासकारांचें ह्मणणें खरें आहे. पण वस्तुस्थिति जर अशी होती, तर पेशव्यांचें साह्य मिळविण्याकरितां मुंबईचा मुख्याधिकारी मि. रिचर्ड बोरचीर हा चार वर्षें कां गोंडा घोळीत होता? आणि मि. कमोडर हा जर शूर होता, समुद्रांतल्या लढाईंत पटाईत होता, तर पेशव्यांचीं लढाऊ जहाजें येण्या अगोदरच त्यानें आपल्या शौर्यबलानें किल्ला हस्तगत करून कां घेतला नाहीं? इंग्रजांच्या आरमारावरचें एकही मनुष्य जाया झालें नाहीं आणि पेशव्यांचीं जहाजें अंग्रे याच्या माऱ्याच्या बाहेर उभीं होतीं, या इंग्रज इतिहासकारांच्या लिहिण्यावरूनही सत्याची अटकळ बांधतां येण्यासारखी आहे. इंग्रजांचीं अरमारें जर माऱ्याच्या टापूंत गेलीं होतीं आणि तुळाजीराव अंग्रे निकरानें मारा करीत होता, तर इंग्रजांच्या आरमारावरचीं कांहीं मनुष्यें जाया होणें स्वाभाविक नव्हतें काय? प्रभु येशूनें, इंग्रजांनीं मुंबईबंदर सोडण्याच्या अगोदर आरमारावरच्या लोकांच्या अंगावरून हात फिरवून आपल्या दिव्यतेजानें तीं लोखंडाचीं बनविलीं असलीं तर

मात्र इंग्रज इतिहासकारांच्या लिहिण्यावर विश्वास ठेवावा लागेल. पण प्रभू येशूनें येऊन असा कांहीं प्रकार केल्याचें त्यांनीं कोठें लिहिलें नाहीं. यावरून पेशव्यांच्या लढाऊ जहाजांनीं पराक्रम करून किल्ला हस्तगत केला असेल, कीं इंग्रजांच्या आरमारांनीं केला असेल, याची कल्पना वाचकांनींच करावी.

पुण्यांहून रामाजी महादेवांच्या साह्याला नानासाहेबांनीं पाठविलेल्या समशेरबहादरांना व रामाजी महादेवांना तुळाजीराव अंग्र्याच्या मुलखांत जे जय प्राप्त झाले आणि त्यांनीं एकामागून एक झराझर किल्ले हस्तगत केले हेंही मि. कमोडर जेम्स यांच्या शौर्यामुळें झालें, असें इंग्रज इतिहासकारांनीं लिहिलें असतें, तरी त्यालाही आमचे पूर्वज मेषपात्र होते असें ह्मणणाऱ्या आमच्या मंडळींनीं माना तुकावल्या असत्या. परंतु खरा प्रकार यांत असा झाला आहे कीं, सुवर्णदुर्ग किल्ला रामाजी महादेव व समशेरबहादर यांच्या पराक्रमांनीं हस्तगत झाला. समुद्राच्या बाजूनें इंग्रजांचीं आरमारें व पेशव्यांचीं जहाजें लढत होतीं या पलीकडे त्यांनीं महत्त्व देण्यासारखें कांहींएक केलें नाहीं. अंग्रे याशीं तुलना करितां पेशव्यांचीं लढाऊ जहाजें त्याजबरोबर टिकणारीं नव्हतीं आणि इंग्रज इतिहासकारांनीं ज्या मि. कमोडर जेम्सला विजयध्वज केला आहे त्याचींही आरमारें तुळाजीरावाच्या लढाऊ जहाजांबरोबर लढण्याच्या योग्यतेचीं नव्हतीं. अशी खरी स्थिति होती, हें पुढील गोष्टीवरून सिद्ध होत आहे. सुवर्णदुर्ग किल्ला व त्याच्या असपासचे दुसरे

लहान लहान किल्ले हस्तगत केल्यावर रामाजी महादेव व समशेरबहाद्दर यांचें विजयी सैन्य रत्नागिरीवर गेलें. परंतु इकडे इंग्रजांचा शूर सरदार कमोडर जेम्स पंधरा मेपर्यंत, इंग्रज इतिहासकारांच्या म्हणण्याप्रमाणें पेशव्यांच्या सांगण्यावरून समुद्रांत राहून, त्याच्या हातून कांहींएक झालें नाहीं. तो माशा मारीत बसला होता व अगदीं वादळाचे दिवस आले तेव्हां मुंबईकडे निघून गेला.

पर्जन्यकालाला प्रारंभ झाल्यामुळें यापुढें आंग्रे यांजबरोबरची लढाई बंद ठेवावी लागली. पण अंग्रे यांचा नाश करण्याकरितां पेशव्यांनीं इंग्रजांना बोलाविलें कीं, इंग्रजांनीं पेशव्यांना बोलाविलें याचा उलगडा झाला. लढाई बंद झाल्याबरोबर मुंबईचा मुख्याधिकारी मि. रिचर्ड बोरचीर यानें पावसाळा संपतांक्षणींच पेशव्यांनीं ही लढाई पुढें चालविण्याकरितां आपल्या साह्याला यावें अशी विनंति केली. पेशव्यांना जर इंग्रजांचें साह्य पाहिजे असतें तर अशा प्रकारची विनंति इंग्रजांनीं करण्याचें काय कारण होतें? तुळाजीराव अंग्रे किती बलिष्ट झाला होता, त्याला इंग्रज किती वचकले होते, त्याच्या शौर्यानें ते किती चेपून गेले होते हेंही यावेळीं स्पष्ट झालें. पावसाळा संपण्याच्या सुमाराला इंग्लंडाहून अडमिरल वाटसन आणि लेफ्टनंट कर्नल क्लाईव्ह हे प्रसिद्ध इंग्रज योद्धे बरोबर चांगलें युरोपियन सैन्य घेऊन यायचें ठरलें होतें. असें असून इंग्रजांनीं पेशव्यांचें साह्य मागितलें, यावरून ते तुळाजीराव अंग्रे यांच्या बलाला अगदीं भिऊन गेले होते असें का न

ह्मणावें? जगज्जेते ह्मणविणाऱ्या इंग्रजांची बोबडी वळविणारा तुळाजीराव अंग्रे यांचेसारखा शूर पुरुष आमच्या स्वराज्यांत निर्माण होऊन त्याचा स्वराज्याला उपयोग करून घेतां येऊं नये, उलट त्यानें त्याच्या सर्व शक्ति हरण करून त्याला तो मरेपर्यंत किल्यावर कैदेंत ठेवावें ही केवढ्या दुःखाची गोष्ट! असो!

लढाई कशी करायची, अंग्रे याला कसा गांठायचा, याचा विचार करून इंग्रजांनीं आपलीं आरमारें फेब्रुवारी महिन्यांत मुंबई बंदरांतून हाकारलीं. यावेळीं इंग्रजांनीं फारच मोठी तयारी केली होती. त्यांच्या आरमारांवर लहान मोठ्या जवळ जवळ दोनशें तोफा होत्या. त्याखेरीज आठशें युरोपियन सोल्जर व एक हजार नेटिव इन्फंट्री आरमारावर होती. तिकडे अंग्रे याच्या मुलखांत खंडूजी मानकराच्या सेनापतित्वाखालीं पेशव्यांचें सैन्य नोवेंबर महिन्यापासून तुळाजी अंग्रे याजबरोबर लढत होतें. पेशव्यांच्या सैन्यानें विजयदुर्गचा किल्ला शिवाय करून तुळाजीरावाचे बहुतेक किल्ले हस्तगत केले. तेव्हां तो बिचारा लाचार होऊन रामाजी महादेव व खंडूजी मानकर यांच्या हस्तगत होऊन क्षमा मागूं लागला. जो शरण आला तो शत्रु असो, त्यानें पहिले कितीही अपराध केलेले असोत, अथवा तो परदेशचा, परधर्माचा अगदीं अनोळखी असा असो, त्याचें रक्षण करायचें हा हिंदु लोकांचा पहिल्यापासूनचा स्वभाव. या स्वभावाला अनुसरून रामाजी महादेव व खंडूजी मानकर त्याला आश्रय देऊन क्षमा करण्याचा विचार करूं लागले. येथें हें सांगितल्यावां-

चून राहवत नाहीं कीं, आपल्या स्वराज्यानें इतर राज्यें नामशेष करायचीं असें जर पहिल्यापासून व्रत धरलें असतें, तर आज तें नामशेष झालेलें पाहण्याचा आपल्याला प्रसंग आला नसता. शत्रूचीं पाळेंमुळें खणून काढायचीं हें पातक आहे असा स्वराज्यांतील वीरांचा, कर्त्या पुरुषांचा व मुत्सद्यांचा समज होता. त्यांना राज्याचा अनावर लोभ नव्हता. पण इंग्रजांचें व्रत याहून अगदीं उलट. बाकीच्यांनीं सगळ्यांनीं धुळीस मिळावें, त्यांचा नायनाट व्हावा आणि सगळें आपल्या घशाखालीं उतरावें अशी त्यांची इच्छा. असें करण्यांत कांहींएक पातक नाहीं असा इंग्रजांचा समज! असा इंग्रजांचा समज नसता, तर आजच्या मित्तीला हिंदुस्थानांत कित्येक लहान लहान राज्यें असलेलीं आपल्या दृष्टीस पडतीं. आडमिरल वाटसन व कर्नल क्लाईव्ह फेब्रुवारीच्या १२ तारखेस विजयदुर्गापाशीं आले. आणि तुह्मीं करतांहा हें आपल्या पहिल्या करारांसा अनुचित आहे असें सांगून वाटसननें अंग्रच्याच्या हताश स्थितीला जाऊन पोंचलेल्या जहाजावर मारा सुरू केला. कर्नल क्लाईव्ह रात्रीचा आपले लोक घेऊन किनाऱ्यावर गेला. यानंतरचा इंग्रज इतिहासकारांनीं जो इतिहास लिहिला आहे त्यांत रामाजी महादेवानें मि. हौजला लांच देण्याचा प्रयत्न केला, व तो अशाकरितां कीं त्यानें अडमिरल वाटसनकडून हल्ला करण्याचें बंद करावें! याचप्रमाणें कापटन् अंड्रयू बुचानन यांस ऐशी हजार रुपये देण्याचा प्रयत्न केला. पण तो रामाजी महादेवाला वश न झाल्याबद्दल त्याला त्याच्या सरकारकडून एक सो-

न्याचें पदक देण्यांत आलें. ज्या रामाजी महादेवानें इंग्रजांची विशेष मदत झाली नसतांना पुण्याहून आलेल्या सैन्याच्या मदतीनें तुळाजीरावाला दे माय धरणी ठाव करून सोडलें तो विजयदुर्ग किल्ला व त्यांतील संपत्ति हातीं यावी ह्मणून, तुळाजीरावानें तहाचें बोलणें लाविलें असतांही लांच देण्याचा प्रयत्न करील हें म्हणेंच शोभण्यासारखें नाहीं. ज्यानें तुळाजीरावाचे इतर सर्व किल्ले घेतले त्याला विजयदुर्ग हस्तगत करायला पुण्याहून आणखी मदत मागावी लागली असती असें नाहीं. लांचालांचीचा प्रकार झालाच असला तर तो इंग्रजांच्या बाजूनेंच झाला असावा. कारण तीन महिने पेशव्यांचें सैन्य झगडत असतां जो विजयदुर्ग त्यांना हस्तगत करून घेतां आला नाहीं, तो अडमिरल वाटसननें एका दिवसांत हस्तगत केला ! तुळाजीरावाला पेशव्यांनीं अगदीं हतवीर्य केलें होतें, तेव्हां कावळा बसायला व डहाळी मोडायला एक गांठ पडावी, त्याप्रमाणें विजयदुर्गच्या हल्ल्याची गोष्ट होण्याचा संभव आहे खरा. परंतु लांचाची गोष्ट एवढ्यावरून मनांत येते कीं, याच संबंधांत मुंबईचा मुख्याधिकारी मि. रिचर्ड बोरचीर यानें रामाजी महादेवाचें मन वळविण्याकरितां त्याच्या एका कारकुनाला पांच हजार रुपयांचा लांच देण्याचें कबूल केलें, या गोष्टीचा इंग्रज इतिहासकारांनींही उल्लेख केला आहे. यावरून अडचणीच्या वेळीं लांच देण्याची संवय इंग्रजांना होती हें स्पष्ट होतें. आणि ह्मणून पेशव्यांच्या पदरच्या लोकांना आपल्या वर्गांत ओढण्याकरितां इंग्रज इतिहास-

कारांनीं रामाजी महादेवावर वरचे आरोप वृथा कशावरून केले नसतील? असो. विजयदुर्गचा किल्ला इंग्रजांनीं आपल्याकडे ठेविला होता व त्यासंबंधानें पेशव्यांचा व त्यांचा पुष्कळ दिवस लेखी वाद चालला होता. तुळाजीरावाला प्रथम साताऱ्याजवळील वंदन किल्ल्यांत पेशव्यांनीं ठेवलें होतें. पुढें त्याला तेथून काढून सोलापूरच्या किल्यांत नेऊन ठेवलें व तेथेंच त्याचा अंत झाला.



# मोरोबादादा फडणीस.

थोरल्या माधवरावसाहेबांच्या कारकीर्दींत मोरोबादादा कारभारामध्यें बऱ्याच पुढाकारानें वागत असत. त्या वेळीं नानाही कारभारामध्यें होते. परंतु माधवरावसाहेब आपल्या हुकुमतीनें पदरच्या माणसांना वागवीत असल्याकारणानें फडणीसांच्या घराण्यांतील भाऊबंदकी पेशव्यांच्या कारभाराला पीडा करणारी झाली नाहीं. पण महाराष्ट्राच्या दुर्दैवानें थेऊर मुक्कामीं माधवरावसाहेबांचा अंतकाळ जवळ आला, त्या वेळीं श्रीमंतांनीं कर्जासंबंधानें काळजी करूं नये, आह्मी कर्ज फेडूं, असें सांगण्याची नानांनीं विलक्षण छाती केली आणि तेव्हांपासून नाना पुढें आले. तेंच फडणिसांची घरांतली भाऊबंदकी पेशव्यांच्या कारभाराला पीडाकारक होण्यास कारण झालें. जसजसें नाना कारभारांत पुढें पुढें येऊं लागले तसतसें मोरोबादादाला वैषम्य वाटूं लागलें. मोरोबासारख्याला नानांनीं तेव्हांच गप्प बसायला लावलें असतें, पण खुद्द पेशव्यांच्या घरांतही भाऊबंदकी असल्यामुळें मोरोबादादाला फावलें. नानांनीं नारायणरावसाहेब पेशवे व त्यांच्या हृदयद्रावक मृत्यूनंतर त्यांचा मुलगा सवाईमाधवरावसाहेब यांचा पक्ष एकनिष्ठपणें धरला होता. तेव्हां मोरोबादादा दुसऱ्या पक्षाला ह्मणजे राघोबादादांना जाऊन मिळाले.

राघोबा दादांच्या पक्षाला जाऊन मिळालेली बजाबा पुरंदरे, सखाराम हरी, चिंतो विठल, विष्णू हरी व-

गैरे मंडळी पुण्यास होतीच. त्यांनीं मोरोबा दादाला चांगला टेका दिला. आणि पुण्यांत याप्रमाणें कारभारी मंडळींत दोन पक्ष झाले. कोणत्याही सरकारच्या मंत्रीमंडळांत अशा प्रकारचे तट पडले कीं त्या सरकारच्या शत्रूंना आणि दूरच्या अधिकाऱ्यांना स्वतःचे मतलब साधून घ्यायला, आपल्या कोणा मित्राचें घर भरायला, कोणाचें घर लुटायला, अथवा प्रत्यक्ष राजद्रोह करायला चांगली फुरसत सांपडते. नाना व मोरोबादादा यांच्या भाऊबंदकीनें तुकोजीराव होळकराला श्रीमंतांची आज्ञा नाकारायला सांपडलें. श्रीमंतांची त्याला हरिपंत तात्या फडके कर्नाटकांतल्या स्वारीवर गेले होते त्यांस साह्याला जाण्याविषयीं आज्ञा झाली होती, पण त्याला मोरोबादादा प्रभृति मंडळींनीं आपल्या पक्षांत ओढून घेतल्यामुळें तो कर्नाटकांत तात्यांच्या साह्याला गेला नाहीं. नाना फ्रेंच लोकांच्या नादीं लागले आहेत, फ्रान्सांतून मदत आणण्याची त्यांनीं खटपट चालविली आहे, सेंट लुबिन याला आपल्या जवळ ठेवून घेतला आहे, वगैरे गोष्टी पुण्यांतल्या इंग्रजांच्या वकिलानें इंग्रजांना कळविल्या. सखारामबापू हा शपथ घेऊन नानांच्या पक्षांत आला होता, परंतु तो प्रथमपासूनचा राघोबादादांचा पक्षपाती असल्यामुळें वर सांगितलेल्या मंडळीप्रमाणें जरी उघडपणें नानांच्या विरुद्ध झाला नाहीं तरी आंतून त्याचें मोरोबादादांच्या पक्षाला साह्य होतें. कर्वे हे पेशव्यांचें गुरुघराणें. त्यांतील बाळदीक्षित कर्वे हा मोरोबादादांला मिळाला होता. या सर्व मंडळींचे राघोबाला पुण्यांत आणण्याचे बेत चालले.

राघोबादादानें इंग्रजांचा आश्रय स्वीकारला होता व तो त्यांच्या साह्यानें मिळाल्यास पुण्याचें सर्व राज्य, निदानपक्षीं अर्धें तरी मिळविण्याचा प्रयत्न करीत होता. एखाद्या एतद्देशीय राज्यांत गादीला दोघे वारसा सांगूं लागले, कीं त्यांपैकीं एकाला हाताशीं धरून त्या राज्यांत आपला प्रवेश करावयाचा व सांपडेल तितकें गट्ट करण्याकडे लक्ष ठेवायचें या धोरणानें इंग्रज हिंदुस्थानांत राजे होत होते. कोणत्या तरी राज्यांत दोघांत कलह उत्पन्न व्हावा आणि आपली डाळ शिजावी ही त्यांची नेहमीं इच्छा असावी आणि अशा प्रकारची संधि सांपडतांच ती त्यांनीं वायां जाऊं देऊं नये हें स्वाभाविक. त्याप्रमाणें राघोबादादाला त्यांनीं आश्रय देऊन, त्याला पेशवाई मिळवून देण्याचे प्रयत्न चालविले होते. परंतु पेशवाईचीं सूत्रें, इंग्रजांचे कावे व त्यांची शक्ति चांगल्याप्रकारें ओळखणाऱ्या नानांच्या हातीं असल्यामुळें त्यानें इंग्रजांची लटपट चालूं न देतां वेळोवेळीं त्यांना चांगलेंच चमकाविलें. यामुळें इंग्रजांनीं जरी राघोबादादाचा पक्ष धरलेला होता तरी त्यांच्यानें पेशव्याच्या विरुद्ध मोठी वंडाळी करववत नव्हती. पण पुण्यास नाना व मोरोबादादा यांच्यांत दुफळी होऊन, मोरोबादादा तिळांजली घेऊन उभा आहे असें इंग्रजांना कळलें, तेव्हां त्यांच्या तोंडाला अधिक पाणी सुटलें. कलकत्तेकर सरकार दक्षिणेंत आपलीं पलटणें पाठविण्याची ही वेळ आहे असें ह्मणूं लागलें. त्यांच्या पुण्यांतल्या वकिलानें मोरोबादादा आपल्यापाशीं साह्य मागणार आहे असें कळविलें व हेंच त्यांना पा-

हिजे होतें. इतक्यांत मोरोबादादा प्रभृति मंडळींचें मुंबईसरकाराला राघोबादादाला पुण्यांत घेऊन येण्याविषयींचें पत्र गेलें. त्यानें कलकत्याच्या सरकाराची परवानगी मागितली. दोघांच्याही मनांतून जी गोष्ट कर्तव्य तिला मोडता कोण घालील ? वा! चांगली वेळ आली असें म्हणून कलकत्तेकर सरकार आनंदाच्या भरांत नाचूं लागलें. कर्नल लेस्ली यांच्या सेनापतित्वाखालीं मुंबईसरकाराच्या मदतीला सैन्य पाठवून द्यायचें असा त्यानें विचार ठरविला. काल्पीजवळ यमुनेच्या काठीं दक्षिणेंत पाठवायचें तितकें सैन्य जुळविण्याबद्दल हुकूम सुटले. सारांश मुंबईकर व कलकत्तेकर इंग्रजसरकारांनीं दूध देखलें पण बडगा देखला नाहीं !

राघोबादादाला पुण्यास नेऊन अधिकार द्यायचा व आपला पुष्कळ फायदा करून घ्यायचा हा विचार गोड असल्याकारणानें मुंबईकर व कलकत्तेकर इंग्रजांना तेव्हांच मानवला, पण मागून पेशव्याबरोबर झालेल्या पुरंदरच्या तहाची आठवण झाली. केलेला विचार लंगडा पडतो कीं काय असें वाटूं लागलें. पण इंग्रज ह्मणजे पहिल्या नंबरचे कल्पक. पुरंदरच्या तहावर प्रमुखत्वाची सही सखारामबापू यांची होती. तेव्हां इंग्रजांनीं कल्पना काढली कीं, हा हुषार मुत्सद्दी गृहस्थ राघोबाच्याच पक्षाचा आहे. आपण जर राघोबाचा फायदा करतों आहोंत तर तो ह्मणजे त्यांत आडवा येईल असें होणार नाहीं. ही इंग्रजांची कल्पना अगदीं खरी होती. सखारामबापू राघोबाचा जरी हितकर्ता होता व त्याच्याकरितां त्यानें आजपर्यंत अनेक कार-

स्थानें केलीं होतीं, तरी तो वारा येईल तशी पाठ देणारा, लोकाच्या बुद्धीनें न चालणारा व कोणत्याही कामाची घाई न करणारा मनुष्य होता. वेळ प्रसंग पाहिल्यावांचून तो कोणतीहि गोष्ट करण्यास तयार होत नसे. सर्व महाराष्ट्रीयांच्या दुर्दैवानें तो राघोबाच्या पक्षाला मिळाला होता यामुळें त्याच्या शहाणपणाचा स्वराज्याला व्हावा तसा उपयोग झाला नाहीं, तर उलट पुष्कळ अपाय झाला. असो. मुंबईकर इंग्रजांनीं मोरोबादादास लिहून कळविलें कीं, तुम्हाला मदत करण्यास आमच्याकडून हरकत नाहीं, परंतु आमची अट इतकीच आहे, कीं सखारामबापूंच्या सहीचें पत्र आम्हाला यावें. ही गोष्ट सखारामबापूंनीं त्या वेळीं नाकारली. तेव्हां अर्थातच इंग्रजांना जी घाई भरली होती ती थंडावली.

नानाफडणवीस यांनीं आपले गुप्त हेर मोरोबादादा प्रभृतिमंडळी काय काय बेत करिते ते समजून घेण्याकरितां ठेविले होते. गुप्त बातमी काढण्यांत नानांचा हातखंडा होता. या संबंधाच्या कित्येक दंतकथा अशा ऐकण्यांत येतात कीं, त्यांवर कितपत विश्वास ठेवावा अशी शंका येते. नानांचे गुप्त हेर स्वराज्यांत तर होतेच, पण आणखी परराज्यांतही असत व त्यांच्याकडून नानांना शत्रु कोणत्या मसलतींत आहे हें समजत असे, अशा अर्थाच्या पुष्कळ दंतकथा आहेत. यावरून आपल्याला इतकें गृहीत धरायला हरकत नाहीं कीं पुण्यांत कोठें काय चाललें आहे, कोठें काय चाललें आहे, यांवर नानांचें बारीक लक्ष असें. आपल्या विरुद्ध

सध्यां जीं कारस्थानें चाललीं आहेत त्यांतील मुख्य खेळ्या मोरोबा आहे, तर त्याला एकादा हवाशीर किल्ला दाखविला ह्मणजे चाललेल्या कारस्थानांत खळ पडेल असा विचार नानांनीं मनांत आणिला व ते त्या उद्योगाला लागले. मोरोबादादा तरी नानांना पूर्ण ओळखून होता. आपण जे धंदे चालविले आहेत हे नानांना समजल्यावांचून राहणार नाहींत व ते त्यांच्या प्रतीकाराची कांहीं तरी व्यवस्था करूं लागतील असें मनांत आणून त्यानेंहि नानांकडील गुप्त बेत फोडण्याची व्यवस्था करून ठेवली होती. त्या व्यवस्थेनें मोरोबादादाला, नाना आपल्याला कैद करून कोणत्या तरी एका दूरच्या किल्यावर नेऊन टाकणार हें समजलें. नानांचा अशा प्रकारचा बेत झाला असतां आपलें पुण्यांत रहाणें सुरक्षित नाहीं असें पाहून मोरोबादादा पुण्यांतून निघून गेला. मोरोबादादा आपल्या बेताप्रमाणें हातीं न सांपडतां पुण्यांतून निघून गेला या गोष्टीचें नानांना फार भय वाटलें. कारण ज्यानें पुण्यास बसून इंग्रजांशीं खलबतें सुरू केलीं होतीं, तो पुण्यांतून स्वतःच गेल्यावर काय विघ्न घेऊन येईल याचा काय नेम ? ! तेव्हां नानांनीं पुढच्या विघ्नाकडे लक्ष देऊन सखारामबापूंकडून मोरोबादादाचें मन वळविण्याचा प्रयत्न करून त्याला परत पुण्यास आणलें. त्यांत असें ठरलें कीं, मोरोबादादा, बजाबा पुरंदरे वगैरे राघोबादादांच्या पक्षाच्या मंडळींना फिरून कारभारांत घ्यायचें. सखारामबापूंना बजाबा पुरंदरे यांची समजूत घालायला पुष्कळ प्रयत्न करावा लागला. पण सखाराम

हरी हा राघोबादादांचा एकनिष्ठ भक्त होता. तो राघोबादादांच्या हाताखालीं वाढला होता व त्याच्यावर राघोबादादांचेंहि तसेंच प्रेम होतें. तो शिपाई असल्यामुळें, इतराप्रमाणें नानांना इतकासा भीत नसे. नानांच्या तोंडावर तो त्यांची अप्रतिष्ठा होण्यासारखें भाषण करी. सखारामबापूंनीं त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न चालविला, तेव्हां त्यानें साफ उत्तर केलें कीं, मी राघोबादादांच्या अन्नानें वाढलों आहे, त्यांनीं वणवण फिरत असावें, आणि मीं त्यांची अशी स्थिति केलेल्या मुत्सद्दी ह्मणविणाऱ्या मंडळींना मिळून पेशव्यांच्या कारभारांत वावरावें, हें माझें शील नव्हे. माझा धनी जसा शूर तसाच निर्मळ अंतःकरणाचा आहे आणि नाना भित्रे, कुढ्या मनाचे, बेविश्वासी असे आहेत. त्यांच्याशीं स्नेह करून राहण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. असो. मोरोबादादा वगैरे मंडळींनीं तुकोजीराव होळकराला आपल्या पक्षाकडे घेतला होता हें वर सांगितलें आहे. पुण्यास यावेळीं फौजबंद असा तो एकटाच होता. नानांचा केवळ उजवा हात हरिपंततात्या पुण्यास नसल्यामुळें त्यांच्या पक्षाचा जोर अगदीं कमी झाला होता. सखारामबापूंचें लक्ष नानांकडे यथातथाच असायचें हें वाचकांना सांगायला नको. सांगायचें कारण, मोरोबादादा वगैरे मंडळींनीं होळकराच्या साह्यानें नानांना एका बाजूला सारून पेशव्यांचा सर्व कारभार आपल्याकडे घेतला आणि मोरोबादादा कारभारांत प्रमुख झाले. नानांनीं सध्यां पुण्यास आपला साह्यकर्ता कोणी नाहीं असें पाहून कांहींसें विरक्ततेचें

सोंग घेतलें आणि ते पुरंदर येथें जाऊन राहिले. तेथून नाना असेंहि ह्मणूं लागले कीं, तुह्मी राघोबादादांना आणा, मात्र त्यांनीं माझा सूड घेऊं नये एवढें मला वचन द्या. अथवा मला सुरक्षितपणें काशीस नेऊन पोंचवा ह्मणजे झालें. नाना इतके मऊ आलेले पाहून मोरोबादादाला प्रथम आनंद झाला असेल यांत शंका नाहीं. मोरोबादादा कारभार पाहूं लागला याबद्दल नाना बाहेरून समाधान दाखवीत, पण अंतर्यामीं त्यांचे निराळेच विचार चालले होते.

मोरोबादादांनीं इंग्रजांच्या बरोबर राघोबादादासंबंधानें जें बोलणें चालविलें होतें, तें तात्पुरतेंच होतें. मोरोबादादा हा पहिल्यापासून राघोबादादाच्या पक्षाला नव्हता. नानांनीं त्याची पुष्कळ अप्रतिष्ठा केली, त्याला कारभारांतून हुसकून लावलें, तेव्हां नानांचा वरचष्मा नाहींसा करणाकरितां त्यानें राघोबादादांच्या पक्षांतल्या मंडळींचा पुढाकार घेतला होता इतकेंच. मोरोबादादा पेशव्यांच्या कारभारांत प्रमुख झाले, हें ऐकून मुंबईकर इंग्रजांच्या आशा दुणावल्या. त्यांच्या मनांतूनही नाना कारभारांतून निघावेत असें होतें. कारण नाना आपली डाळ शिजूं देत नाहींत इतकेंच नाहीं, तर ते आपला द्वेष करितात हें इंग्रजांना समजलेलें होतें. पण त्यांच्या ज्या आशा दुणावल्या त्या व्यर्थ झाल्या. जो मोरोबादादा राघोबादादांच्या संबंधानें त्यांच्या अगदीं पाठीस लागला होता, त्यानें ती आठवण टाकल्यासारखी केली. उलट इंग्रज त्याला तुह्मी स्वस्थ कां बसलात म्हणून विचारूं लागले. मोरोबादादाला राघोबादादांचा

स्वभाव माहीत होता. तेव्हां त्यानें मनांत विचार केला कीं, मला जें साधायचें होतें तें साधलें. आतां राघोबादादांना आणून त्यांची मनधरणी करीत बसा एवढ्यावांचून आपलें काय आडलें आहे? तरी तो बाहेरून राघोबादादांना आणायचे, असेंच ह्मणत असे. इंग्रज वाट पहातां पहातां कंटाळले तरी तो ती गोष्ट लांबणीवरच टाकूं लागला. शेवटीं इंग्रजांची खात्री झाली कीं, मोरोबादादाला राघोबादादांसंबंधाची मुळींच काळजी नाहीं. तो पेंचांत सांपडला होता ह्मणून राघोबादादांचा पक्ष धरून खटपट करीत होता. मोरोबादादाची व इंग्रजांची बरीच ओळख झाली होती, तेव्हां मुंबईकर इंग्रजांनीं मनांत आणलें कीं, याच्या हातून हें होत नाहीं, तर आपलें दुसरें काम करून घेऊं. नानांनीं सेंटलुबीन याला पुण्यास ठेवला होता हें इंग्रजांच्या डोळ्यांत सलत होतें. तेव्हां त्यांनीं मोरोबादादापाशीं त्याला पुण्यांतून काढून लावण्याविषयींचें बोलणें लाविलें. मोरोबादादा हें आपलें काम करील अशी इंग्रजांना मोठी आशा होती. परंतु ही गोष्टही होय करतों, होय करतों अशाखालीं मोरोबादादा पुढें पुढें ढकलूं लागला, तों तिकडे नानांच्या बकध्यानाच्या फलाच्या प्राप्तीची वेळ येऊन ठेपली, आणि त्यांनीं मोरोबादादारूप मत्स्याला व त्याच्या साथीदारांना उचलले.

तुकोजीराव होळकराच्या साह्यानें मोरोबादादानें जी तलवार मारली, तिनें त्याचे हात गगनाला पोंचविले असें त्याला वाटलें! आपण कालसर्पाच्या शेपटीवर नुसता पायच दिला नाहीं, त्याला पायानें तुडवून पद-

भ्रष्ट करून टाकून दिला; ही गोष्ट मोरोबादादानें विसरावी आणि अधिकारमदानें धुंद होऊन खुषींत रहावें, यावरून त्याचा मैंदपणा दिसून येतो. येथें भोळसरपणा ह्मणून भागत नाहीं. अशा संबंधांत भोळसर माणसें शहाण्या माणसापेक्षां अधिक दक्षतेनें रहातात. त्यांना संशय लवकर येतो व तीं संशयाची निवृत्ति केल्यावांचून कधीं स्वस्थ बसत नाहींत. नानांची जागा आपण पटकावली, यानें नानांना विशेषसा राग आला नसेल असें मानणाऱ्या मोरोबादादाला जर कोणीं तिऱ्हाइतानें होता हा एक मूर्ख असें ह्मटलें, तर त्याला आपल्याला खोडून काढतां येईल असें वाटत नाहीं. आपली कर्तबगारी न ओळखतां मनुष्यानें भलत्याच जागीं जाऊन बसूं नये, याचें हें लक्षांत ठेवण्यासारखें उदाहरण आहे. हरिपंततात्या व महादजी शिंदे हे दोघे रणधीर नानांच्या मुठींत आहेत, हें मोरोबादादाला दिसूं नये हा केवढा अंधळेपणा ? शहाणा असता तर बरी वाईट कशी तरी व्यवस्था लावून ठेवल्यावांचून राहिला नसता. वर सांगितलेले दोघे रणधीर पुरंदरास येऊन दाखल झाल्याचें मोरोबादादाला कळलें असेल कीं नाहीं याचा संशयच आहे ! एके दिवशीं पेशव्यांच्या राजधानींत भुमका उठली कीं, तात्या व शिंदे येऊन त्यांनीं मोरोबादादा, बजाबा पुरंदरे, चिंतो विठ्ठल, सखाराम हरि, बाळदीक्षित कर्वे वगैरे मंडळींना कैद केलें, एक सखारामबापू कायते कैद करण्यावांचून राहिले. त्यांनाहि कैद करणार आहेत असें लोक बोलत होते. परंतु त्यांना कैद करण्याची वेळ पुढें येणार

आहे हें नानांना माहीत असल्यामुळें त्यांनीं बापूस तसें राहूं दिलें. या कैद केलेल्या मंडळींना नानांनीं किल्लोकिल्लीं रवाना केलें. मोरोबादादाला अहमदनगरच्या किल्ल्यावर नेऊन ठेवलें. या कैद केलेल्या मंडळींत नानांनीं सखाराम हरि याचे फार हाल केले. तो पुरुष चांगलाच सशक्त होता, पण त्याच्या पायांत इतक्या मोठ्या बेड्या घातल्या होत्या कीं त्या त्याला उचलूं नयेत! त्याचें पोट भरेल इतकें त्याला अन्न दिलें जात नसे एवढेंच काय, त्याची तहान भागण्याइतकें त्याला पाणी देखील दिलें जात नसे. अशा प्रकारचे त्याचे हाल चालविल्यामुळें तो अशक्त होऊन चौदा महिन्यांत मृत्यु पावला. त्याची राघोबादादावर अत्यंत भक्ति असे. त्याला आतां या हालांतून मी जगत नाहीं असें वाटलें, तेंव्हां तो दांत ओंठ खाऊन ह्मणे, माझ्या शक्ति नष्ट झाल्या, मी आतां मरणार, परंतु माझीं हाडें राघोबादादा, राघोबादादा असा जप करतील!

# इंग्रजांबरोबर पेशव्यांच्या लढाया.



या लढायांना कारण राघोबादादा. श्री. नारायणराव साहेबांच्या मृत्यूनंतर दादासाहेबांनीं आपल्या नांवानें पेशवाईचीं वस्त्रें आणून चिंतो विठ्ठल यास आपला दिवाण नेमिला. तेव्हां सखारामबापूंनीं निजामाकडून त्याच्या बाजूचीं पेशव्यांचीं ठाणीं उठविलीं आणि राघोबादादांना स्वारीवर जाण्यास भाग पडलें. स्वारीवर तर गेलेंच पाहिजे, पण मागें पुण्यास बापू, नाना, तात्या वगैरे मंडळी फितूर करतील अशा बुद्धीनें राघोबादादांनीं त्यांस आपल्या बरोबर घेतलें. तरी पुढें बापूंनीं चिंतो विठ्ठल याची, तुह्मीं आपल्या खिशांत आग बाळगिली आहे, या तुमच्या शहाणपणास काय ह्मणावें ? अशी निर्भर्त्सना करून सर्वांची सुटका करून घेतली, आणि सर्व मंडळी पुण्यास आली. पुण्यास आल्यावर कारस्थान करून सवाई माधवरावसाहेब जन्मास येऊन चाळीस दिवस झाले नाहींत तोंच साताऱ्याहून त्यांच्या नांवानें पेशवाईचीं वस्त्रें आणिवलीं, आणि चोहींकडे त्यांच्या नांवाची द्वाही फिरवून राघोबादादाला बंडखोर ठरविलें. राघोबादादाच्या बरोबर जें पेशव्यांचें सैन्य होतें, त्याच्या मुख्यांना धमकीचीं पत्रें पाठवून पुरंदरास बोलाविलें. त्या लोकांनीं इकडून गेलेलीं पत्रें राघोबादादाला

दाखविलीं आणि सांगितलें कीं, आह्मी परत गेलों नाहीं तर तिकडे आमच्या बायकामुलांची धडगत होणार नाहीं. तेव्हां दादानें सर्वांस सांगितलें कीं, ज्यांना आमचें अगत्य असेल त्यांनीं रहावें, नसेल त्यांनीं तिकडे जावें. त्यावरून पुष्कळ सैन्य परतलें. तरी राघोबादादाच्या बरोबर बरेंच सैन्य होतें. तेव्हां कारभारी मंडळींनीं विचार केला कीं, राघोबादादाला असा फौजबंद राहूं दिला तर, तो कोणे वेळीं आपल्यावर चालून येईल आणि काय प्रकार करील याचा नेम लागूं देणार नाहीं. यावरून त्याचा मोड करण्याकरितां सैन्य रवाना करण्यांत आलें. याचें सेनाधिपतित्व हरिपंत फडके यांस दिलें व यापुढें तेच पेशव्यांचे सेनाधिपति झाले. या सैन्याच्या व राघोबादादाच्या लढाया होऊं लागल्या. *या लढायांतून राघोबादादा नि-

---

* राघोबाची स्त्री आनंदीबाई किती दुष्ट स्त्री होती, हें पुढील गोष्टीवरून कळेल. राघोबानें एके दिवशीं, त्रिंबकरावमामा पंढरपूर आणि कासेगांव याच्या दरम्यान असतांना त्याजवर अकस्मित घाला घातला व त्याच्या बरोबरच्या थोड्याशा सैन्याची दाणादाण केली. त्रिंबकराव जखमी होऊन दादाच्या हातीं लागला. तो त्याच्या कैदेंत असतांना दुष्ट आनंदीबाई त्याला निर्दयपणें फटके मारवी आणि त्याला ह्मणे, मसलती करून राज्यांत घोटाळे घालायला पाहिजेत नाहीं ? मेल्या भोग त्याचें आतां हें सुख. यावर त्रिंबकराव तिला साफ सांगे, दुष्टे या तुझ्या राक्षसी वर्तनानें मी मरेन ह्मणून काय झालें. तिकडे तुझे दुसरे बसले आहेत ते तुझ्या व तुझ्या नंदीबैलाच्या हातीं राज्य लागूं देतील अशी गोष्ट स्वप्नांत देखील मनांत आणूं नकोस. तुझ्या व तुझ्या पोरांच्या हातीं करटीच येईल !

करानें लढत असल्यामुळें कांहीं दिवस त्यानें दम धरला. परंतु पुढें सैन्याला पगार द्यायला जवळ पैसे नाहींत अशी स्थिति होऊन त्याचें सैन्य कमी कमी होऊं लागलें. हरिपंततात्यांनीं निजाम राघोबाला साह्य करण्याच्या विचारांत आहे असें पाहून, त्याला आपल्या साह्याला घेतला होता. राघोबादादा, शिंदे व होळकर यांचें साह्य मिळविण्याच्या इच्छेनें तिकडे वळले. त्यांच्या मागें तात्या लागलेच होते. पण राघोबादादाला शिंदे व होळकर यांचें साह्य न मिळतां, ते तात्यांच्याच साह्याला आले. याप्रमाणें दादा पळतां पळतां आश्रा शोधीत होते. पण त्यांना कोठेंच जेव्हां आश्रा मिळेना तेव्हां ते इंग्रजांचें साह्य घेण्याकरितां सुरतेकडे वळले. इंग्रज आपल्याला साह्य करतील असें दादाला खात्रीनें वाटलेलें होतें. कारण या पूर्वींच त्यांनीं पुण्याच्या इंग्रजांच्या वकिलाच्या मार्फतीनें यासंबंधाचें बोलणें कांहीं दिवस चालविलें होतें !

राघोबादादालाच काय, कोणीहि कांहीं पैसे व मुलूख देतों असें सांगितलें ह्मणजे सूक्तासूक्त, न्यायान्याय न पाहतां त्याला साह्य द्यायचें व आपलें पोट वाढवायचें, हें त्या वेळच्या इंग्रजांचें धोरण होतें. मि. रॉबर्ट गांबीर सुरतेचा सिव्हिल गव्हरनर यांजबरोबर दादानें बोलणें सुरू केलें. दादाला कशी तरी पेशवाई हाताखालीं घालावयाची होती. इंग्रजांची कामगिरी किती होईल व आपण त्यांना काय काय देण्याला कबूल होत आहोंत हें त्याच्या लक्षांत कशाला येतें ? तो मला तुह्मी पेशवा कराल तर, साष्टी व मुंबई-

जवळचीं दुसरीं बेटें, वसई आणि गुजराथेंतील कांहीं प्रांत मिळून एकोणीस लक्षांचा मुलूख आणि प्रथम खर्चाकरितां पंधरापासून वीस लाख रुपये देईन असें बोलूं लागला. या तहावर मुंबईकर इंग्रजांनीं, कलकत्तेकरांच्या परवानगीशिवाय आपल्याला सह्या कशा करितां येतील याचा विचार केला नाहीं. हा तह करण्यास इंग्रज उतावळे झाले होते तरी मध्यंतरी बरेच दिवस गेले. कारण हीं सर्व कलमें रावोबा पुढें कबूल करीना. साष्टी व वसई देण्यास तो कुरकुरत होता आणि तहांतली खर्चाची रक्कम देण्यासारखे त्याजपाशीं पैसे नव्हते. शेवटीं इंग्रजांनीं सात आठ लक्षांचें जवाहीर सर्व रक्कम दिल्यावर परत करूं अशा बोलीनें घेतलें आणि खर्चाचे पैसे हप्त्यानें घेण्याचें कबूल केलें. लेफ्टनेंट कर्नल कीटिंग याच्या हाताखालीं सैन्य देऊन, मुंबईकर इंग्रजांनीं त्याला मुंबईहून राघोबादादाला साह्य करण्याकरितां गुजराथेंत पाठविलें. परंतु हें सैन्य जाऊन पोंचण्याच्या अगोदरच हरिपंत फडके, शिंदे व होळकर यांचें सैन्य घेऊन राघोबादादावर चालून गेले होते. राघोबादादाला गोविंदराव गायकवाड आणि खंडेराव गायकवाड मिळाले होते. तरी हरिपंत फडके यांनीं वासद येथें त्याला आपल्या सैन्याच्या तीन टोळ्या करून एकट्याला गांठलें आणि मोठ्या जोरानें लढाईला सुरवात केली. लढाईच्या प्रारंभालाच राघोबादादाच्या सैन्यांतील मानाजी फाकडे आणि सखाराम हरी हे दोघे प्रख्यात योद्धे जखमी झाले. ही लढाई हरिपंत तात्यांनीं इतक्या वीरश्रीनें केली कीं, राघोबादादाचें सैन्य रानोमाळ

पळूं लागलें व त्यालाही हजार स्वारांसह समरभूमीवरून काळें करावें लागलें ! क्यांबेच्या नबाबाचें साह्य मिळविण्याकरितां राघोबानें पूर्वी प्रयत्न केला होता, म्हणून तो तिकडे धावला. परंतु हरिपंततात्यासारखा शूर पुरुष त्याच्या मागें लागला आहे हें पाहून, नबाबाचा राघोबाला पाठीशीं घालण्याचा धीर होईना. परंतु मि. चार्लस मालेट याला राघोबानें तह केल्याचें माहीत असल्यामुळें त्यानें त्याला आश्रय देऊन सुरक्षितपणें सुरतेस नेऊन पोंचविलें. राघोबा सुरतेस जाऊन दोन तीन दिवस झाल्यावर लेफ्टेनंट कर्नल कीटिंग हे बरोबरच्या सैन्यासह सुरतेस येऊन उतरले.

हरीपंततात्यांनीं राघोबा व त्याचे साथीदार दोघे गायकवाड यांचा धुव्वा उडविल्यावर, इंग्रजांनीं राघोबाला साह्य देण्याचें कबूल केलें म्हणून, आपल्या सैन्याच्या टोळ्या पाठवून त्यांच्या मुलखाची नासधूस चालविली. ज्यांनीं आह्मी इंग्रजांची प्रजा नाहीं असें सांगितलें, त्यांना तात्यांनीं मुळीं त्रास दिला नाहीं. इंग्रजांनीं तात्यांच्या लहान लहान टोळ्यांवर हल्ले केले, पण त्या टोळ्यांनींही इंग्रजांना चांगलाच हात दाखविला. तो इतका कीं, अशा फाटक्या तुटक्या मारामाऱ्यांनींच कर्नल कीटिंग याची वीरश्री वितळून तो तात्यांच्या सैन्यांत फितुरी करण्याच्या विचाराला लागला. त्याला वाटलें कीं, दोघे गायकवाड राघोबांच्याकडे आहेत तसा तिसराही येईल. पण या कारस्थानांत त्याची लवकरच निराशा झाली. कर्नल कीटिंग हरिपंताचें सैन्य फोडावयास पहात होता तें त्याला साधलें

नाहींच, पण हरिपंतांनीं मात्र खंडेराव गायकवाडाला राघोबाच्या सैन्यांतून काढला. परंतु याच सुमारास तात्यांच्या बरोबर असलेलीं शिंदे व होळकर यांचीं सैन्यें गेलीं, यामुळें इंग्रजांना व राघोबाच्या सैन्याला पुष्कळ आनंद झाला व त्यांनीं या संबंधानें नानाप्रकारचे तर्क चालविले. कोणी ह्मणत शिंदे व होळकर यांच्या मनांतून आपल्याला येऊन मिळावयाचें आहे ह्मणून ते तात्यांना सोडून गेले. कोणी सखाराम बापूचें हें कृत्य, असें ह्मणत. शिंदे व होळकर यांचीं सैन्यें जरी गेलीं तरी तात्यांना त्याचें कांहीं वाटलें नाहीं. इंग्रजांच्या सैन्याला आपण चांगलाच हात दाखवूं अशी त्यांची खात्री होती. ते राघोबाकडे जें बाजारबुणगें जमत होतें त्यास खुशाल जमूं देत होते. तात्यांना पक्कें माहीत होतें कीं, असे लोक शत्रूकडे कितीही जमले व त्यांची संख्या केवढीही झाली तरी लढाईंत त्यांचा कांहींएक उपयोग होणार नाहीं, उलट त्यांच्यांत गोंधळ माजून आपल्याला हवी तशी तलवार चालवायला सांपडेल. आतां इंग्रजांच्या सैन्याचा मुख्य कर्नल कीटिंग याच्या संबंधानें विचार करितां, लढाई कशी चालवावी हें ज्ञान त्याच्यांत बेताबाताचेंच होतें. इतकेंच नाहीं त्याला आपल्या सैन्याची नीटशी व्यवस्थाही करितां येत नव्हती. मराठ्यांचें सैन्य एका दिवसांत दहा कोस गेलें तर याला आपलें सैन्य पांच कोस नेतां नेतां मारामार पडे. राघोबा तर काय ते दादाच ! त्यांना वाटे एकदां तात्याबरोबर मोठी लढाई करावी. फिरून त्यांच्या मनांत येई कीं, जरी शिंदेहोळकरांचीं सैन्यें

सध्यां तात्यांपाशीं नाहींत, तरी त्यांच्या जवळ आहे तें सैन्य कांहीं थोडें नाहीं. शिवाय तें चांगलें कसलेलें आहे. आपल्याला साह्य करायला म्हणून जो इंग्रज आला आहे, त्याच्यांतही असावा तसा लढण्याचा दम नाहीं. आणि तात्या तर आपली तलवार अगदीं पाजळून बसले आहेत. अशा प्रकारचे राघोबाच्या मनांत तरंगांवर तरंग उठत होते. पूर्वीं त्याच्यांत स्वपरबलाबल न पाहतां जी लढाईची उसळी येत असे, ती तर समूळ नाहींशी झाली होती. एवढा पावसाळा जाऊं द्यावा आणि मग तात्यांच्याबरोबर टोलेजंग लढाई करावी हें त्याला शेवटीं आवडलें. तिकडे मुंबईकर इंग्रजांचे गुजराथेंतील हालहवालीकडे अगदीं डोळे लागून राहिले होते. त्यांनीं प्रथम कर्नल कीटिंग यास जेव्हां पाठविला, तेव्हां ते मनांत मांडे खाऊं लागले होते कीं, कीटिंग हं हं ह्मणतां हरिपंत फडक्याचा पराभव करून राघोबादादाला विजयघोष करीत मुंबईस घेऊन येईल. पण तसा कांहींएक प्रकार न होतां एक देखील चांगलीशी लढाई झाली नाहीं. तेव्हां ते खट्टू झाले. ते कीटिंग यास लिहूं लागले, कीं कसेंही करून राघोबाला इकडे घेऊन या. पण त्यानें जेव्हां कळविलें कीं, राघोबा पावसाळ्यांत अमदाबादेस जाऊन राहण्याचा विचार करीत आहे, तेव्हां तर ते फार संतापले. परंतु पुढें त्यांना राघोबाचें ह्मणणेंच शहाणपणाचें वाटलें व त्यांनीं आपलें सैन्य गुजराथेंत ठेवलें. असो.

मुंबईकर इंग्रजांची इच्छा राघोबानें लवकर पुण्याकडे यावें अशी आहे, आणि आपण जर लढाई लांबणी-

वर टाकीत गेलों, तर ते आपल्याला परत बोलावून आपल्या जागीं दुसरा मनुष्य नेमतील, असें कर्नल कीटिंगला पूर्ण कळून आल्यावर, त्याला आपली छाती दगडाची करून हरिपंततात्याबरोबर लढाई आरंभावी लागली. इ. स. १७७५ च्या एप्रिलच्या २८ तारखेस असाम्ली नांवाच्या खेडेगांवाजवळ हरीपंततात्या व कर्नल कीटिंग यांजमध्यें लढाई झाली. राघोबांचें सैन्य इंग्रजांच्या सैन्याच्या मदतीला होतेंच. ही लढाई दोही पक्षांकडून व्हाव्या तशा इरीरीनें न झाल्यामुळें दोघांचेंही विशेष नुकसान झालें नाहीं. ही लढाई झाल्यावर चार दिवसांनीं दुसरी एक लढाई झाली. ती बरीच त्वेषानें झाली. राघोबाच्यापाशीं जमलेल्या बाजारबुणग्यांची या लढाईत अगदीं तारांबळ उडाली. त्यांपैकीं पुष्कळ लोक लढाईत मेले व कांहीं पळाले. इंग्रज इतिहासकारांचें ह्मणणें राघोबाकडचे सुमारें पन्नास साठ लोक मेले असें आहे, परंतु त्यावर विश्वास ठेवावा असें मनोदेवता सांगत नाहीं. एक प्रहरभर नुसत्या सोट्यांनीं आपण विकारवश होऊन भांडलों, तर काय प्रकार होतो हें आपल्याला माहीत असतांना, दोन सैन्यांची शस्त्रांची मारामारी बराच वेळ टिकून राघोबाचे सारे पन्नास साठ लोक प्राणास मुकले, असें कोणीं सांगितलें तर त्यावर कसा विश्वास बसेल ? किल्ल्यांतून जर करितां ही लढाई असती, तर इंग्रज इतिहासकारांच्या ह्मणण्यावर विश्वास ठेवण्यास हरकत नव्हती. तात्यांच्या सैन्यानें या लढाईत एकदां इंग्रजांच्या पलटणीवर जोराचा हल्ला केला, त्यांत तात्यांच्या सैन्याचा पुष्कळ नाश झाल

असें इंग्रज इतिहासकार ह्मणतात. ही गोष्ट खरी आहे कीं, गोळीबारामध्यें मराठ्यांच्यापेक्षां इंग्रजांची सरशी होती, त्यामुळें उभयतांच्या लढाईला सुरवात होते वेळीं, इंग्रजांचें सैन्य मराठे शिपायांना काळासारखें वाटे. पण मराठे शिपायांच्या नायकांनीं शत्रूवर लगट केली, ह्मणजे मराठे शिपाई असें कांहीं उग्रकर्म करीत कीं, इंग्रजांच्या गोऱ्या पलटणांना तर कांपरें भरे. वाघापुढें शेळ्या, तशी त्यांची अवस्था होई. हें सध्यांच्या आपल्या राज्यकर्त्यांनीं कबूल करूं नये, हें स्वाभाविक आहे. असो. यानंतर कर्नल कीटिंग यास, मुंबईकर इंग्रजांनीं राघोबास पुण्याकडे घेऊन येण्याबद्दल विशेष जरूरीनें लिहिल्यावरून त्यानें राघोबाचा रस्ता बदलविला. ते नडिआदकडे येत असतां मराठ्यांनीं त्यांच्यावर दोनदां हल्ले केले. त्यांतून बचावून राघोबा नडीआदमध्यें शिरला व त्यानें तेथें आठ दिवस राहून खंडेरावापासून चाळीस हजार रुपये काढले.

इंग्रज इतिहासकार आपल्या पलटणांना कितीही शूर ह्मणोत, परंतु कर्नल कीटिंग यांच्या कारस्थानांवरून त्यांच्यांत खरा जोर किती असेल याची कल्पना करितां आल्यावांचून राहणार नाहीं.त्यानें आपली अशक्तता मनांत आणून, प्रथम एकदां परीक्षा झाली असतां, मध्यंतरीं फिरून फत्तेसिंग गायकवाडाला हरिपंत तात्यांच्या सैन्यांतून फोडण्याचा प्रयत्न चालविला होता. हरिपंत तात्या जसा शत्रूच्या अंगाला दरदरून घाम फोडणारा फाकडा शिपाई, तसाच तो राजकारस्थानी व

मोठा प्रसंगावधानी होता. *सेनापतीचें काम तो फारच

---

* याच राघोबादादांच्या प्रकरणांत हरिपंततात्यांनीं निजामाला आपल्या साह्याला घेतलें होतें. हरिपंततात्यांनीं दादांचा पाठपुरावा चालविला, तेव्हां नवाबसाहेब त्रासून गेले. भरारी हें दादांना टोपण नांव मिळालेलें; ते जसे जेरीस आले, तसें आपल्या नांवाला साजेशा भराऱ्या मारूं लागले. तात्यांनीं दादांच्या बरोबरीनें कंबर कसली, पण नवाबांच्या तुमानींना, विजारींना, “ या अल्ला, या खुदा ” करण्याची वेळ आली, तरी ते बरेच टिकले ह्मणायचे. इंग्रजांच्या कर्नल कीटिंग सारख्या पाटलोणी असत्या तर दादांच्या एक दोन भराऱ्यांत त्यांचीं बटणें तुटून काय गोंधळ उडाला असता त्याची कल्पना करवत नाहीं. चार मुक्कामांतच लेधा उडून गेली असती. नर्मदा नदीच्या पलीकडल्या कांठाला दादांचा पळता तळ, व अलीकडल्या कांठाला तात्यांचे सैन्याचा तळ इतका दादांचा पाठलाग झाला असता, नवाबसाहेबांनीं बोलणें काढिलें कीं, आतां आह्मी पुढें येत नाहीं. दादासाहेब जर लढवय्या असता तर अशा प्रकारें पळत सुटताना. आह्मी आपलीं कामें टाकून तुमच्या बरोबर याच्या मागें किती दिवस पळत सुटावें ? आतां आह्मी याच्या मागें येत नाहीं. अर्ध्या विहिरींत घागर आली असतां दोर तोडण्याप्रमाणेंच हा नवाबांचा प्रकार ! हा गेला कीं दादा आपल्याला आवरणार नाहींत, हें तात्यांना पक्कें ठाऊक असल्यामुळें त्यांना हें मोठेंच संकट उद्भवलें ब्राह्मण ह्मणजे तेव्हांच घाबरावयाचा, असा अलीकडे समज झालेला दिसतो. पण हा ब्राह्मण योद्धा भ्यायला नाहीं. त्यानें आपलें ब्राह्मणी डोकें असें कांहीं चालविलें, कीं नबाबसाहेबांचा पुढें ब्र नाहीं. निमूटपणें पुढें यायला कबूल. तात्यांनीं नबाबाला सांगितलें, आपल्या शब्दाला मान नसेल तर आपण खुशाल चालते व्हा. पण हें लक्षांत ठेवा, दादासाहेबांचा व आमचा घरांतला भाऊ-

चांगलें करी. सरकारच्या खाजगी पथकांतले लोक असोत कीं शिंदे, होळकर, गायकवाड वगैरे दुसऱ्या कोणाचे लोक असोत, त्या सर्वांवर तात्यांची कदर असे. कोण काय करीत आहे इकडे त्यांचें बारीक लक्ष असे. कर्नल कीटिंग याचा फत्तेसिंग गायकवाडाबरोबर पत्रव्यवहार चालला होता हें त्यांना प्रथमपासून समजलेलें होतें. परंतु तात्यांनीं मुद्दाम त्यांत हरकत आणिली नाहीं. यथासुखें त्याला खेळूं दिलें. कर्नलसाहेबांनीं फत्तेसिंग वळला असें पाहून त्याजबरोबर घाईघाईनें तह करण्याचा घाट घातला. आपल्याकडून त्यानें गुप्त रीतीनें म्हणून फत्तेसिंगाबरोबर एप्रीलच्या २२ तारखेस तह ठरविला. तो तह अमलांत आणण्याकरतां त्यानें आपला लेफ्टनंट जार्ज लॉव्हिबाँड या नांवाचा एक वकील ह्मणून फत्तेसिंगाच्या तळांत पाठवून दिला. वकीलसाहेब येणार आहेत हें तात्यांना समजलें होतें. शहाणे ह्मणविणाऱ्यांना एकदांच पण चांगलेच, ज्याला शालजोडींतले ह्मणतात ते द्यावेत, ह्मणजे असल्या फितुऱ्या करण्याची बुद्धि त्यांना होणार नाहीं, असें तात्यांनीं मनांत आणून, फत्तेसिंगाकडून त्याला आपल्या तळांत सामोरे जाऊन आणण्यापासूनची व्यवस्था कांहीं निराळ्याच रीतीनें केली. मानापमान पा-

---

मागील पानावरून

वंदकीचा तंटा आहे. तुमच्याशीं जें आमचे तंटे आहेत ते आमच्या दोघांच्या हिताचे आहेत. त्याकरितां दादासाहेब व आह्मी वेळ बरी आहेसें पाहून एक होऊं व इच्छित कार्यभाग तेव्हांच उरकून घेऊं. याला ह्मणावें प्रसंगावधान.

ह्यचा नाहीं, लोचटपणा यथास्थित करायचा हें त्या वेळच्या इंग्रजांना व्रत स्वीकारावें लागलें असल्यामुळें, वकीलसाहेबांनीं आपल्याला सामोरे कोण आले आहेत तिकडे पाहिलेंच नाहीं. अशिक्षित लोकांच्या मुलांनीं अंगावर धूळ उडविली तरी तिकडे लक्ष न देतां येशूचे गुणानुवाद गाऊन शेण मारणाऱ्या पोरांना शांतपणें उपदेश करायचा हा मिशनरींचा प्रकार बऱ्याच वाचकांनीं पाहिलेला असेल, याच्या शतपट कर्नल कीटिंगच्या वकिलाला निर्लज्ज व्हावें लागलें असेल, अथवा शांतवृत्ति स्वीकारावी लागली असेल असें आपण पाहिजे असेल तर ह्मणूं, पण तात्यांनीं एकवार शासन करण्याच्या बुद्धीनें अशा प्रकारें त्याचें स्वागत करविलें. वकीलसाहेबांना प्रथम त्यांनीं आपल्या पुढें आणविलें. तात्या त्याच्याशीं अगदीं सरळ रीतीनें पण त्याला मेल्यापेक्षां मेलें व्हावें अशा भाषेनें बोलले. पुढें वकीलसाहेबांना भेटायला म्हणून जे लोक पाठविले ते तात्या व फत्तेसिंग यांच्या तळांतील हलक्या दर्जाचे तितके होते. हा पुढचा भेटीचा प्रकार पाहून वकीलसाहेबांना काय वाटलें असेल तें त्यांचें त्यांना माहीत! दुसरे दिवशीं सकाळीं एक तंबू मुद्दाम उभारला होता त्यांत फत्तेसिंग, त्याचा दिवाण व इंग्रजाकडून आलेले वकीलसाहेब यांची भेट होईल असें ठरविलें होतें. तेव्हां त्याप्रमाणें सकाळींच इंग्रजांचे वकील त्या तंबूंत फत्तेसिंगाची वाट पहात जाऊन बसले. बिचाऱ्यानें एकसारखे फत्तेसिंगाच्या येण्याकडे डोळे लाविले असतील. पण संध्याकाळचे पांच वाजे-

पर्यंत त्या तंबूंत चिटपांखरूं सुद्धां गेलें नाहीं. पांच वाजल्यावर एक घोडेस्वार तंबूंत गेला व त्यानें आपल्याबरोबर येण्यास त्यास सांगितलें. त्याच्या करितां बाहेर एक पालखी आणिली होती, तींत वकील साहेबांना बसविलें आणि तात्यांच्या घोडेस्वारांनीं त्याला वेढलें व त्यास सर्व लष्करभर कैद्यासारखा मिरविला. त्यानें गरीबीनें फत्तेसिंगांनीं तह केल्यावरून मी त्यांच्याकडे वकील म्हणून आलों आहें, असें पुष्कळ सांगितलें; परंतु त्याच्याकडे तात्यांची आज्ञा मोडून कोण लक्ष देणार ? याप्रमाणें सर्व लष्करभर वकीलसाहेबांची वरात काढल्यावर त्यांस फत्तेसिंगाच्या लष्कराच्या बाजारामध्यें नेऊन सोडलें. तेथून त्यांना फत्तेसिंगाच्या दिवाणाच्या तंबूंत नेलें, व तेथें एक तासानंतर फत्तेसिंग स्वतः येऊन भेटला. फत्तेसिंगानें तात्यांच्या पुढें आमचें कांहीं चालत नसल्यामुळें आपला हा असा फार अपमान झाला वगैरे सांगून ती बैठक कांहीं तरी गोष्टी सांगण्यांत आटपली. मुंबईकर इंग्रजांना हें ऐकून फारच वाईट वाटलें. त्यांनीं कर्नल कीटिंग याला राजकारस्थानाचें कांहीं ज्ञान नाहीं असें ठरवून त्याचा राजकारस्थानांतला मंत्री ह्मणून मि. मॉइस्टन या नांवाच्या इंग्रजाला त्याच्याकडे पाठवून दिलें. त्याजकडे राजकारस्थानासंबंधीं सर्व अधिकार सोंपाविले होते.

राघोबादादाचें सैन्य व इंग्रजांचें सैन्य आपला मार्ग चालत असतां, तात्यांच्या सैन्यांतील घोडेस्वारांच्या टोळ्या त्यांच्यावर मधून मधून घाले घालीत असत.

त्या घाल्यांना भिऊन राघोबादादाच्या सैन्यांतील लोक इंग्रजांच्या सैन्याचा आश्रय धरण्याकरितां त्यांत जाऊन मिसळत असे इतिहासकार म्हणतात. आणि याकरितां पुढें व मागें इंग्रजांच्या पलटणी चालविण्याची व्यवस्था करण्यांत आली होती. याप्रमाणें राघोबादादा व इंग्रज यांचें सैन्य चाललें असतां, ता. १८ मे रोजीं नायर नांवाच्या गांवापासून मैलादीडमैलावर हें सैन्य असतांना त्याच्या पिछाडीवर तोफांचा मारा सुरू झाला. तात्यांनीं दोघांच्या सैन्यांना असें अगदीं गांठलें, तेव्हां त्याचा नाइलाज झाला, व कर्नल कीटिंग यास मागें परतून लढाई देण्याकरितां उभें रहावें लागलें. ही लढाई मोठी निकराची झाली. या लढाईत तात्यांच्या सैन्यानें दोनतीन हल्ले इतक्या जोरानें केले कीं, कर्नल कीटिंग यानें तोफखान्यावरच्या कपतानाचें काम चांगलें केलें, असें जरी तज्जातीय इतिहासकारांनीं लिहिलें आहे तरी त्याला कमांडरचें काम करितां आलें नाहीं, हें त्यांना कबूल करावें लागलें आहे. कीटिंगनें तोफखान्याचें काम जरी चांगलें केलें असलें, तरी तात्यांच्या सैन्यानें तोफांच्या माऱ्याची क्षिति न करितां तें त्यांच्यांत घुसलें व कापायला सुरवात केली. इंग्रजांच्या पलटणांनीं मराठ्यांच्या सैन्याचा पराक्रम पाहून पळ काढला. परंतु याला असें कारण सांगण्यांत येतें कीं, ऑफिसराच्या हुकुमाचा भलताच अर्थ समजून पलटणी लढाईची जागा सोडून जाऊं लागल्या. पण त्यांचा अशा करण्यानें सगळाच गोंधळ झाला व तात्यांच्या सैनिकांनीं ११ ऑफिसर व २२० शिपाई

मारले. त्यांत यूरोपियन ८६ होते. कसेंहि असो. यालढाईंत तात्यांनीं इंग्रजांची आपल्या पराक्रमाविषयीं खात्री केली हें खास आहे. तथापि या लढाईत शेवटीं जय इंग्रजांना मिळाला असेंच इतिहासकारांचें म्हणणें आहे. पण तात्यांच्या सैन्यांत इंग्रजांच्या सैन्याप्रमाणें हाहाःकार झाला नाहीं व नामांकित सरदार वगैरे मारले गेले नाहींत. यावरून वाचकांनीं काय कल्पना करायची असेल ती करावी. ही 'अरासची लढाई', या नांवानें प्रसिद्ध आहे. या लढाईचें स्मरण इंग्रजांना फार दिवस राहिलें असेल यांतही पण शंका नाहीं.

वरच्या अरासच्या लढाईंत राघोबादादाच्या सैन्यांतील लोकांची फारच दुर्दशा झाली. कैक लोक लढाईंत मेले, आणि जखमी पुष्कळच झाले. याचप्रमाणें इंग्रजांच्या पलटणांतीलही पण पुष्कळ लोक जखमी झाले होते. जखमी झालेल्या लोकांत तीन आफिसर होते. इंग्रजांच्या सैन्याची दुर्दशा होण्यास हुकुमाचा गैरसमज झाला असें ह्मणतात. पण राघोबादादांच्या सैन्याची दुर्दशा होण्यास त्याच्या सैन्यांतील एका कारकुनाची फितुरी कारण झाली असें ह्मटलेलें आहे. त्या फितुरी कारकुनाच्या फितुरीमुळें आपला फार नाश झाला, अशी आरबस्वारांची समजूत होऊन ते त्याजवर उठले. त्यांनीं त्याला धरिलें व राघोबादादा त्याला मारूं नका असा हुकूम फर्मावीत असतां, तिकडे लक्ष न देतां सर्वांनीं त्याजवर एकदम आपल्या तलवारी टाकून त्याचे तुकडे तुकडे केले ! या गोष्टींत राघोबांचा त्यांच्या स्वारांनीं हुकूम न मानणें, ही गोष्ट विलक्षण

आहे. शिपायांचे राग, माथेफिरूपणा व डोक्यांत जें एकदां वेड भरलें असेल तेंच खरें धरून चालणें हे गुण प्रसिद्ध आहेत; यावरून आणि त्याला मारू नका. या राघोबादादाच्या हुकुमावरून त्या कारकुनानें खास फितुरी केली असेल, असें ह्मणतां येत नाहीं.

वर सांगितलेल्या प्रकारची अरासची लढाई दिल्यावर कर्नल कीटिंग भडोच येथें धांवपळ करीत गेले. तेथें ते अकराव्या दिवशीं जाऊन पोंचले. तेथें गेल्यावर त्यांनीं आपल्या जखमी लोकांची व्यवस्था केली. त्यांचा लवकर नर्मदा उतरून जाण्याचा विचार होता. पण त्यांस बातमी लागली कीं, आपल्या मागें लागलेला ससेमिरा हरिपंततात्या आपल्यापासून दहाबारा मैलांवर आहेच. यावेळीं कर्नल कीटिंग यांनीं विचार केला कीं, जेव्हां तेव्हां मराठे लोक अगोदर हल्ले करितात आणि त्यामुळें आपलें फार नुकसान होतें. याकरितां आतां आपणच प्रथम हल्ला करावा ह्मणजे हरिपंततात्याचा पुरा मोड होईल. कर्नल कीटिंग यांनीं याप्रमाणें व्यवस्था करून बाऊपीर येथें लहानशी लढाई दिली, परंतु तींत ह्मणण्यासारखें कांहीं झालें नाहीं. यानंतर हरिपंततात्या यांना बरींच राज्यकारस्थानें उत्पन्न झाल्यामुळें पुण्यास जावें लागलें. तात्यांच्या पुण्याकडे येण्यानें मात्र पेशव्यांचें गुजराथेंत बरेंच नुकसान झालें. पेशव्यांचीं कांहीं लढाऊ जहाजें होतीं, त्यांचा इंग्रजांच्या लढाऊ आरमारांनीं गुजराथेंत पराभव केला. पेशव्यांच्यापेक्षां इंग्रजांची समुद्रावरील लढाईंत पुष्कळच चांगली तयारी होती, ही गोष्ट खरी आहे.

आणि त्यामुळें इंग्रजांनीं पेशव्यांच्या लढाऊ जहाजांचा पराभव केल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं. राघोबादादांच्या संबंधानें गुजराथेंत हरिपंततात्यांना इंग्रजांबरोबर प्रथमच ज्या या लढाया कराव्या लागल्या त्यावरून पाहतां, इंग्रजलोक आतां आपल्या शौर्याचे पोवाडे गावोत, परंतु त्यांना त्यावेळीं आपल्या शौर्याचे पोवाडे गायला येत नव्हते. उलट ते हरिपंततात्या यांना पुष्कळ भीत असत. हरिपंततात्या थोड्या लोकांनिशीं पुण्याकडे जात असतां, त्यांच्यावर इंग्रज व राघोबादादा यांच्या लोकांनीं तुटून जाऊन जय मिळविला. परंतु अशा प्रसंगावरून त्यांना शूर म्हणतां येणार नाहीं हें कोणालाहि कबूल करावें लागेल. तसेंच गणेशपंत बेहेरे हजारबाराशें लोकांनिशीं अमदाबादेचें रक्षण करीत असतां त्याच्यावर हल्ला करून त्याचा पराभव केला यांतही पण शौर्याचा भाग नाहीं. कलकत्तेकर इंग्रजांनीं, राघोबाला मुंबईकरांनीं साह्य केलें याबद्दल दोष दिला. त्यांचें म्हणणें असें पडलें कीं, पेशवे आपले मित्र आहेत. राघोबादादा पेशव्यांपैकींच खरा, पण ज्या अर्थीं त्यानें आपला गादीवर असलेला पुतण्या मारविला, त्या अर्थीं अशा मनुष्याला साह्य देणें कांहीं वाजवी नव्हतें. इंग्रजांची ही एक लोकप्रीति संपादन करण्याची मोठी खुबी, कीं खालच्या अधिकाऱ्यानें अन्यायानें कांहीं फायद्याचें कलम हातीं घेतलें असलें तर त्याला शाब्दिक दोष द्यायचा. पण तें फायद्याचें कलम मात्र ढुंगणाखालीं घातलेलें जाऊं द्यायचें नाहीं! कलकत्तेकर इंग्रजांना जर मुंबईकरांचें कृत्य अ-

वडलें नव्हतें, तर त्यांनीं मुंबईकर इंग्रजांकडून राघो-बाचा पक्ष कधींही घेवविणें रास्त नव्हतें; पण तसें झालें नाहीं. राघोबाला इंग्रजांनीं शेवटपर्यंत आपल्या पाठीशीं घेतलें होतें असेंही ह्मणण्यास हरकत नाहीं. यावेळीं जें हिंदुस्थानांत इंग्लंडांतून इंग्रज येत, ते चांगले नसत. पैशाकरितां पाहिजेल तसलीं पातकें करण्यास ते तयार होत. हें इंग्रज लेखकांनाही कबूल करावें लागलें आहे; असा प्रकार असतां मुंबईकर इंग्रजांनीं आपल्या कौन्सिलपैकीं मि. वुइल्यम टेलर यांस, आपण राघोबाला साह्य करण्याचें कोणकोणत्या फायद्यांकडे लक्ष देऊन ठरविलें, हें वरिष्ठ कलकत्तेकरास सांगण्याकरितां पाठविलें असतां, कलकत्तेकरांची समजूत न पडतां त्यांनीं पेशव्यांबरोबर तह करविण्याचें ठरविलें, यांतलें कारण पेशव्यांना कलकत्तेकर इंग्रज चांगलेच भीत असले पाहिजेत हेंच असणें स्वाभाविक नाहीं काय ? अंगांत चांगला जोर असता, तर त्यांनीं पेशव्यांबरोबर पुरंदरचा तह करण्याचें कधीं देखील मनांत आणलें नसतें. इंग्रज इतिहासकारांनीं या संबंधांत आपल्या लोकांची अशक्तता न दाखवितां, भोसल्यानें कलकत्तेकरांचे कान राघोबा वाईट माणूस आहे असें सांगून भरविले होते, व त्यांना आपल्या अधिकाराचा जोर मुंबईकरांना दाखवायचा होता ह्मणून त्यांनीं पेशव्यांच्या बरोबर तह करविला असें सिद्ध करून दाखविण्याचा प्रयत्न करावा आणि इंग्रज प्रत्येक लढाईंत विजयी होत गेले असें ह्मणावें हें त्यांचें ब्रीदच आहे. असो. कलकत्तेकरांनीं पेशव्यांबरोबर तह

करण्याकरितां कर्नल आप्टन यास पुरंदरास पाठविलें. या तहांत इंग्रजांनीं राघोबादादाला साह्य करूं नये व कोणत्याही प्रकारें आश्रय देऊं नये, आणि इंग्रजांनीं साष्टी गव्हरनर जनरलचीं मर्जी असल्यास ठेवावी अशा अर्थाचीं कलमें होतीं. या तहाच्या अगोदर कलकत्तेकरांनीं पेशव्यांबरोबर जे पत्रव्यवहार केले, त्यांत मुंबईकरांनीं जें कृत्य केलें, तें अगदीं अन्यायाचें व राजनीतीस विरुद्ध होतें असें कबूल केलें होतें. इंग्रजांबरोबर हा जो तह झाला त्यानें नाना व बापू यांचे जीव थोडे दिवस भांड्यांत पडल्यासारखे झाले.

कलकत्तेकर वरिष्ठ इंग्रजांनीं पेशव्यांच्या बरोबर जो वरचा पुरंदरचा तह केला, तो मुंबईकर इंग्रजांना वाईट वाटण्यास कारण झाला. त्यांचे हेतु असे होते कीं, लढाईतलें नुकसान भरून आलें असतें, पण जर जयच येत गेले असते तर पुष्कळ फायदा झाला असता व स्वदेशांत आपली कीर्ति झाली असती. कलकत्तेकर इंग्रजांच्या विरुद्ध कोठें कागाळी नेण्याचा चांगलासा मार्ग नसल्यामुळें त्यांना विशेष कांहीं करितां आलें नाहीं. तथापि पेशव्यांच्या कुळाला काळोखी लावण्याचा त्यांनीं प्रयत्न करण्यास कमी केलें नाहीं. यावरून ते किती थोर असतील याची वाचकांस कल्पना करितां येईल. सवाई माधवरावसाहेब हे नारायणरावसाहेब पेशव्यांचे पुत्रच नव्हेत, असें ते वेलाशक ह्मणायला लागले. या कोणाच्या तरी मागून आणलेल्या मुलापेक्षां पेशव्यांच्या गादीला राघोबासारखा हक्कदार असतां त्याला फेटाळून लावावें हें चांगलें नाहीं,

नीतिविरुद्ध आहे, असें कर्नल अप्टन याच्या मनांत भरवून देण्याचाही त्यांनीं प्रयत्न करून पाहिला होता. परंतु त्यांच्या कोणत्याच प्रयत्नाचा उपयोग झाला नाहीं. याचप्रमाणें तहांत नुसतें राव पंतप्रधान असें ह्मटलें होतें, त्यावर हा राव पंतप्रधान कोण अशी शंका घेऊन ते त्याचें आपणच असें निराकरण करीत कीं, बापू व नाना यांनीं येथें आपलें शहाणपण चालविलें आहे व तें अशाकरितां न जाणो, सध्यांचें गंगाबाईचें असलेलें मूल मेल्यास तिच्या मांडीवर दुसरें मूल देतां यावें! हा वरील मजकूर, मुंबईकर पेशव्यांचा किती द्वेष करीत, हें स्पष्ट दाखवीत आहे. वास्तविक पाहतां त्यांनीं पेशव्यांचा अशा प्रकारें द्वेष करण्याचें कांहींएक कारण नव्हतें इतकेंच नव्हे, तर पेशव्यांचे त्यांनीं उपकारच स्मरले पाहिजे होते. कारण पेशव्यांची पूर्वीपासून त्यांना मदत मिळत आलेली होती. पण ज्यांनीं निव्वळ नफ्यावर लक्ष दिलेलें त्यांच्या लक्षांत या गोष्टी कशा येणार ?!

मुंबईकर इंग्रजांना राघोबाला साह्य करितां येईनासें झालें, पण पेशव्यांचा ते जो द्वेष करीत तो कायम होता. पेशव्यांची सत्ता कशा प्रकारें तरी बुडावी ही त्यांची मनापासून इच्छा होती. हें पुढील गोष्टीवरून स्पष्ट होतें. सदाशिवराव भाऊ जे पानिपतच्या समरभूमीवरील गर्दींत नाहींसे झाले, तो मी आहें असें ह्मणून एक कनोजा ब्राह्मण तोतया गडबड करूं लागला. सदाशिवरावभाऊ हा नव्हे अशी खात्री करून घेतल्यावर पेशव्यांकडून त्यास कैदेंत टाकण्यांत आलें

होतें. तो कोंकणांत रत्नागिरीचा सुभेदार रामचंद्र नाईक परांजपे याच्या कैदेंत असतां त्यानें बेमानपणा करून तोतया सदोबाला सोडून दिलें. त्यानें जवळ वीसपंचवीस हजार लोक जमवून कोंकणांतले पंचवीस एक किल्ले हस्तगत केले. पेशव्यांना हा एक नवा शत्रु उत्पन्न झाला आहे असें पाहून मुंबईकर इंग्रजांना फार आनंद झाला. त्यांना उघडपणें त्याला मदत करितां येत नव्हती, परंतु त्यांनीं त्याला आंतून जितकी मदत करतां येण्यासारखी होती तितकी करण्याला सुरवात केली. परंतु त्याचें बंड, पेशव्यांनीं त्याच्यावर आपलें सैन्य पाठवून तेव्हांच संपुष्टांत आणलें. तसा तो आश्रयाकरितां इंग्रजांच्याकडे धांवला. बेलापूर, मुंबई, साष्टी इतक्या ठिकाणीं तो गेला, पण मि. हार्नबी याची गांठ पडली नाहीं. तेव्हां कुलाब्यास हार्नबी असेल अशा समजुतीनें तोतया तिकडे गेला. पण तेथें रघुजी आंग्रे यानें त्याला कैद केला. इंग्रजांनीं अंग्र्यापासून त्याची मुक्तता व्हावी ह्मणून बरेच प्रयत्न करून पाहिले, पण पेशव्यांशीं बेमान होणें बरें नव्हे हें जाणून रघुजीनें तोतयाला पुण्यास पोंचतें केलें. हा तोतया कनोजा ब्राह्मण नसून सोनार होता असेंही कित्येक ठिकाणीं ह्मटलें आहे. पण इंग्रज लोक तो ब्राह्मण होता इतकेंच नाहीं, तर खुद्द सदाशिवरावभाऊ होता असें ह्मणत होते. यावरून आणि राघोबालाही त्यांची कांहीं मदत पोंचत होती तिजवरून, पुरंदरचा तह मोडण्यास इंग्रज कारण झाले हें सिद्ध होत आहे. पेशव्यांच्याकडूनही तहाचीं कलमें मोडलीं गेलीं, परंतु तें जशासतसें या

त्यायानें झालें. नानांनीं एका फ्रेंच गृहस्थाला पुण्यास आश्रय दिला होता त्याच्याशीं नानांचीं खलबतें चालत, आणि या खलबतांचा मतलब इंग्रजांची सत्ता नाहींशी करण्याचा होता असें इंग्रजांचें ह्मणणें आहे.

पुष्कळ मनुष्यें नेहमीं अशीं दृष्टीस पडतात कीं, त्यांच्या पायांखालीं कांहींही जळत असो, त्यांच्या घरांत कसलेही घोटाळे असोत, त्यांचीं कृत्यें कितीही नीच व भयंकर असोत, त्यांच्या बोलांत बोल असो वा नसो ते आपणा स्वतःविषयीं कधीं फारसा विचार करीत नाहींत. ते आपणास परम सद्गुणी आणि कारुणिक समजत असतात. व त्यांचा उद्योग ह्मटला ह्मणजे दुसऱ्यांना उपदेश करायचा, त्यांच्यावर आपली छाप ठेवायची आणि कोणत्याही मार्गानें तळिराम गार करायचा. सर्व इंग्रज लोक या वर्गांतले आहेत असें येथें ह्मणत नाहीं. तरी त्या वेळचे इंग्रज असे होते, असें ह्मणण्यास मुळीं सुद्धां दिकत वाटत नाहीं. पेशव्यांच्या कारभारांतील मंडळींचे मतभेद, शिंदे होळकरांचें धन्याला बाजूस ठेवून आपली शक्ति वाढविण्याचे प्रयत्न, हैदरचें वाढणें, मराठे सरदारांची निकृष्टावस्था, आणि सवाई माधवरावांची आई गंगाबाई यांचा मृत्यु अथवा इंग्रजांच्या ह्मणण्याप्रमाणें आत्मघात, ह्या गोष्टीनीं त्या वेळचे इंग्रज लोक तिळतिळ तुटत होते. कारण ते नीतीचे मूर्तिमंत पुतळे पडले! त्यांचें वर्तन जसें कांहीं धुतलेल्या तांदुळांसारखें शुद्ध होतें. ते राज्यकर्ते आआहेत ह्मणून त्यांच्या नैतिक वर्तनावर टीका करावी हें बरें वाटत नाहीं. पण इतकें ह्मटल्यावांचून राहवत

नाहीं कीं, पेशव्यांचें कारभारीमंडळ, जर त्यावेळीं इंग्रज लोक त्यांचा द्वेष करीत तसा तें इंग्रजांचा द्वेष करतें, तर नानांनीं, पुण्याच्या इंग्रज वकिलानें एक तोफ मुंबईहून आणविलेली पकडली त्याप्रमाणें इंग्रजांच्या लबाड्या कितीक उजेडांत आणल्या असत्या हें खचित आहे. पण आतां कोळसा उगाळीत बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. हा लेख लिहिण्यांतला मुख्य उद्देश इंग्रजांच्या नैतिक वर्तनाची मीमांसा करण्याचा नसून, मराठ्यांचें सैन्य व इंग्रजांचीं गोरीं पलटणें यांत कितपत अंतर होतें व इ. स. १७७५ पासून १७८२ पर्यंत दोघांत ज्या लढाया झाल्या त्यांत जयापजयाची वांटणी कशी झाली हें दाखविण्याचा आहे. गुजराथेंत कर्नल कीटिंग व हरिपंततात्या फडके यांच्यांत ज्या लढाया झाल्या त्यांत काय निदर्शनास आलें, हें वर लिहिलेंच आहे. यानंतर इ. स. १७७८ त फिरून दोघांत लढाया सुरू झाल्या. मध्यंतरीं मोरोबादादानें इंग्रजांच्या बरोबर जी खटपट केली ती वाचकांनीं या पूर्वीं वाचलेलीच आहे. या पुढच्या लढायांत कलकत्तेकर इंग्रज यांचेंहि मुंबईकरांना पूर्ण साह्य होतें.

इ. स. १७७८च्या नवंबरच्या २२ तारखेला पेशव्यांच्या बरोबर लढाई करायची, असा निश्चय करून काप्टन जेम्स स्टूअर्ट यांच्या हाताखालीं मुंबईहून सैन्य निघालें. तें अटी येथें उतरून, कोणत्याही प्रकारचा आडथळा न होता बोरघाट हस्तगत करून, खंडाळें येथें येऊन उतरलें. ता. २३ रोजीं दुसरें सैन्य मुंबईहून निघालें. त्यानें वाटेंत बेलापूरचा लहानसा किल्ला हस्त-

गत केला व तें पनवेलीस येऊन उतरलें. या सैन्याचा कर्नल ईगर्टन हा मुख्य होता. हें सैन्य पनवेलीस आल्यावर तेथचा पेशव्यांचा कारकून, इंग्रज आपली काय दशा करतील या भीतीनें तेथून पळून गेला. तो पनवेलींतून पळून गेल्यावर कर्नल ईगर्टन यांनीं, राघोबादादांच्या नांवानें गांवांतील लोकांस जाहीरनामा वाचून दाखविला. त्याखेरीज ईगर्टन यांनीं लोकांचें समाधान व्हावें म्हणून त्यांस पुष्कळ समजुतीच्या व उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या. परंतु लोकांचें त्यापासून मुळींच समाधान झालें नाहीं. पेशव्यांचा भयानें पळून गेलेला कारकून ब्राह्मण होता, त्याच्या रहाण्याच्या घरांत कर्नल ईगर्टन जाऊन उतरले, यामुळें लोकांना फारच वाईट वाटलें. पुष्कळ लोक पनवेल सोडून पेशव्यांच्या हद्दींतील दुसऱ्या गांवांत जाऊन राहूं लागले. पेशव्यांच्या प्रजेला सुख मिळत नाहीं, ती त्यांच्या जुलमी अमलाला नाराज झाली आहे, अशा प्रकारचे उद्गार त्या वेळचे इंग्रज बेधडक काढीत असत. ते त्यांचे उद्गार केवळ आपमतलबाचे होते. त्यांत सत्याचा अंश क्वचित होता, हें वरील गोष्टीवरून स्पष्ट होत आहे. असो. राघोबादादा व त्याचा दत्तक मुलगा अमृतराव यांनीं कांहीं सैन्य जुळविलें होतें, तें बरोबर घेऊन ते इंग्रजांच्या सैन्याला येऊन मिळाले. तिकडे काप्टन स्टुअर्ट व पेशव्यांचें थोडेंसें सैन्य यांच्या झटापटींना डिसेंबरच्या २३ तारखेपासून सुरवात झाली. कर्नल ईगर्टन घाटमाथ्यावर आल्यावर त्यांनीं आपल्या सैन्याचे दोन भाग केले. एका भागावर त्यांनीं लेफ्टनंट कर्नल

के यांस नेमिलें. या सैन्याच्या टोळ्या अगदीं साव-काशपणें रस्ता चालत होत्या. त्यांतलें कारण खरें काय असेल तें असो. परंतु इतिहासकार याचें कारण सामान वाहून नेण्याची गैरसोय असें सांगतात.

इंग्रज घाट चढून राघोबाला बरोबर घेऊन पुण्याकडे येणार, अशी बातमी पुरंदरास कळतांच, नाना, बापू, तात्या वगैरे मंत्रीमंडळींनीं लढाईची तयारी केली. हरिपंततात्या बरोबर सैन्य घेऊन, इंग्रजांच्या वाटेवर चालले. त्यांनीं इंग्रजांना घाट उतरतानांच गांठलें. परंतु प्रत्येक ठिकाणीं इंग्रज वरच्या बाजूला आणि तात्यांचें सैन्य खालच्या बाजूला असें होत गेल्यामुळें तात्यांना दोन तीन वेळां माघार घ्यावी लागली. पण तात्यांनीं, अशा प्रकारें दोन तीन वेळ माघार घ्यावी लागल्यामुळें, आपल्या लोकांस उत्तेजन देऊन इंग्रजांचें सैन्य खंडाळ्याहून निघालें असतां, त्याजवर जोराचा हल्ला केला. त्यांनीं ज्याप्रमाणें त्वेषानें हल्ला केला, त्याप्रमाणें इंग्रजांच्या सैन्याच्या एका भागावरचा मुख्य लेफ्टनंट कर्नल के यास जखमी केलें. ही जखम साधी नव्हती, कर्नल के यानें थोड्याच दिवसांत मेलें पाहिजे अशी होती व त्याप्रमाणें तो मेला. हा एक चांगल्यांपैकीं ऑफिसर असल्यामुळें इंग्रज लोकांना पुष्कळ जाणवला. शत्रूचे हजार शिपाई मारण्यापेक्षां त्या हजारांच्या मुख्याला खालीं करणें यांत विशेष महत्त्व आहे, शौर्य आहे, कुशलता आहे असें आपले लोक समजत असत, व त्याप्रमाणें तात्यांनीं इंग्रजांच्या सैन्यांतील एक मोहरा तर खालीं केला. यानंतर चार दिवसांनीं

तात्यांनीं, काप्टन स्टुअर्ट या इंग्रजांकडल्या फार प्रसिद्धीस आलेल्या योध्यास कारलें येथें गांठलें. याला मराठे शिपाई फार भीत असत, व त्याला त्याच्या शौर्यावरून इष्टुर फाकडा म्हणत. काप्टन स्टुअर्ट यानें तात्यांकडे सैन्य अधिक असतांही, आपल्या नांवाप्रमाणें मोठ्या धाडसानें लढाईला सुरवात केली. इंग्रजांकडला गोळीबाराचा मार फार मोठा असल्यामुळें तात्यांचें सैन्य प्रथम तोंड घेईना. तरी त्यांनीं आपल्या स्वारांकडून एकामागून एक हल्ले करविण्यास आरंभ केला. हे पेशव्यांच्या सैन्याचे हल्ल्यामागें हल्ले होत आहेत असें पाहून, काप्टन स्टुअर्ट मनांत बराच चरकला. शत्रूचें एकंदर सैन्य तरी किती आहे, तें पहावें असें मनांत आणून इष्टुरफाकडा एका झाडावर चढून दुर्बीण लावून सैन्याकडे पाहूं लागला. हरिपंततात्यांचें त्याच्याकडे लक्ष होतेंच. त्यांनीं आपल्या गोलंदाजास सांगितलें कीं, तो पहा फाकडा इंग्रज झाडावर चढून दुर्बीण लावून पहातो आहे. समय हाच आहे; तर आतां शिस्तवी धरून, निशाण लावून तोफ डाग व फाकडा खालीं कर. इंग्रजांपेक्षां पेशव्यांच्या सैन्यांत शस्त्रकलेंत निपुण असे लोक अधिक असत, हें या गोष्टीवरूनही सिद्ध होतें. हरिपंततात्यांनीं गोलंदाजास नेम धरून तोफ डाग, व गोरा खालीं कर, अशी आज्ञा करितांच तिकडे झाडावर गोळा लागून, काप्टन स्टुअर्ट प्रेत होऊन खालीं यावा, हें अभिमान वाटण्यासारखें नव्हे काय ? अशा प्रकारचें शस्त्रनैपुण्य इंग्रजांच्या सैन्यांत क्वचितच होतें, हें इंग्रज कबूल न करोत, पण हें खरें

आहे यांत शंका नको. काप्टन स्टुअर्ट पडल्यावर इंग्रजांच्या सैन्यांत अगदीं गोंधळ उडून गेला. फाकडा इष्टुर पाडल्यावर, तात्यांच्या सैन्यांतील, लोकांत वीरश्री मूर्तिमंत उभी रहावी आणि त्यांनीं शत्रूंशी लगट करावी हें साहजिक आहे. तात्यांचें सैन्य इंग्रजांच्या सैन्यावर जोरानें पडल्यावर, त्यांच्यांत अवसान असें मुळींच राहिलें नाहीं आणि ते शत्रूला पाठ दाखवून पळूं लागले. तात्यांच्या लोकांनीं त्यांना पनवेलपर्यंत पाठीवर मार देत पळविलें. अलीकडे नानांच्या मनांतून इंग्रजलोक, त्यांच्या वर्तनावरून अगदीं उतरले होते. इंग्रजांनीं राघोबाला फिरून साह्य करून लढाई आरंभिली, हें एकपरी नानांना बरेंच वाटलें. त्यांनीं इंग्रजांची चांगलीच खोडकी मोडण्याची तयारी केली. तोफखान्याचे मुख्य पानशे यांचें व नानांचें कांहीं कारणावरून बरेंच बिनसलें होतें. तरी नानांनीं वेळ पाहून त्यांना समजावून घेतलें व त्यांचा तोफखाना इंग्रजांवर पाठविला. पानशांनीं प्रथम इंग्रजांना बरेंच जेर केलें. नानांनीं इंग्रजांशीं लढण्याकरितां शिंदे व होळकर यांस बोलाविलें, मात्र होळकर दादांना मिळेल अशी त्यांना शंका होती, म्हणून त्यांनीं होळकरांना राघोबादादा व होळकर यांची गांठ पडणार नाहीं अशा बेतानें ठेवविलें होतें. याखेरीज नानांनीं असेंहि हुकूम देऊन ठेवले होते कीं, आपण आपली शिकस्त करीत असतां, इंग्रज दुर्दैवानें पुढें आले तर पुणें जाळून टाकावें, पण त्यांस पुण्यास जाऊं देऊं नये. याचप्रमाणें नानांनीं हरिपंततात्यांकडून घाटाखालीं आलेल्या इंग्रज सैन्याचा मुंबईस पत्रव्यवहार

चालूं नये ह्मणून रस्ते आडवून धरविले होते. तात्पर्य पेशव्यांच्या मंत्रीमंडळानें या लढाईची तयारी कोणत्याही प्रकारें त्यांच्या बुद्धिमत्तेस कमीपणा आणील अशा प्रकारची ठेवली नव्हती.

इंग्रजांच्या सैन्याची स्थिति पेशव्यांच्या सैन्याच्या स्थितीशीं तोलून पाहतां, कींव येण्यासारखी झाली होती. त्यांच्या सैन्यांतले दोघे चांगले योद्धे मेल्यामुळें त्यांच्या मनानें दहशत खाल्ली होती. शिवाय पेशव्यांच्या सैन्यानें त्याला चोहींकडून वेढल्यासारखें केलें होतें, त्यामुळें त्यांची अधिकच गाळण झाली होती. आपल्या हातून लढाई रेटत नाहीं तर जीव घेऊन पळून जाऊं, असें त्यांनीं मनांत आणलें असतें तर त्यांना पळून जायला देखील पेशव्यांच्या सैनिकांनीं मार्ग ठेवला नव्हता. अशा तारांबळींत इंग्रजांच्या या सैन्याचे सेनाधिपति कर्नल ईगर्टन हे आजारी पडले व त्यामुळें त्यांना आपल्या जागेवर कर्नल कॉकबर्न यास नेमणें भाग पडलें. मुंबईस जायला पेशव्यांच्या सैनिकांनीं मार्ग ठेवला नव्हता, यामुळें त्यांना सैन्याबरोबरच रहावें लागलें होतें. या लढाईला सुरवात करण्यापूर्वीं इंग्रज लोकांना आशा होती कीं, राघोबाच्या पक्षाचे जे सरदार आहेत ते आपणाला येऊन मिळतील. परंतु ती त्यांची आशा बहुतेक निष्फळ झाली होती. यामुळें इंग्रजांना आतां विचार पडला, कीं राघोबाला घेऊन पुढें पुण्यास जाण्याचा प्रयत्न करावा, किंवा आहे या स्थितींत परत मुंबईस जावें ? या संबंधांत कित्येक ह्मणूं लागले कीं, आपलें साह्य मिळविण्याचे जे प्रयत्न चा-

ले आहेत त्यांचें काय होतें तें पहावें. कित्येकांनीं मुंबईस परत जावें असें सांगितलें. पण सैन्याचा अधिपति यानें सांगितलें कीं, आपल्याबरोबर जें जड सामान, मोठमोठ्या तोफा, बैल वगैरे जनावरें आहेत हें सारें पुण्यास नेतां येणार नाहीं; पण हें कोठें ठेवण्याची व्यवस्था केली, तर आपण सहज पुण्यास जाऊं शकूं. राघोबादादाचेंही मत कर्नल कॉकबर्न याच्या मतासारखें होतें. ज्यानें पन्नास हजार सैन्य आपल्या लांबलांबच्या भराऱ्यांत सर्व हिंदुस्थानभर आपल्याबरोबर वागविलेलें त्याला नऊ कोस जाण्याचें कांहीं वाटूं नये हें स्वाभाविक आहे. शेवटीं बरोबरच्या जड सामानाचा नाश करून, तोफा तळ्यांत टाकून, पुण्यास जावें असेंच ठरलें. इ. स. १७७९ च्या जानेवारीच्या ११ व्या तारखेच्या रात्रीं इंग्रजांनीं सर्व जड सामान जाळून टाकलें आणि थोर तोफा तळ्यांत टाकून दिल्या. आणि मोठ्या गुप्त रीतीनें इंग्रजांचें सैन्य पुण्यास जावयास निघालें. इंग्रजांना अशी खात्री वाटत होती, कीं आतां आपण निर्भयपणें पुण्यास जाऊन पोंचूं. पण पेशव्यांच्या सैन्यांतले सेनानायक शत्रुपक्षाकडे काय काय कारस्थानें चाललीं आहेत तिकडे मुळीं लक्ष न देण्याइतके मूर्ख नव्हते. इंग्रजांच्या सैन्यांत काय काय बेत चालले होते ते सर्व हरिपंततात्यांना समजत होते. त्यांनीं इंग्रजांच्या सैन्याला आडविण्याची अगोदरच व्यवस्था करून ठेवली होती. या पेशव्यांच्या सैन्यानें पुण्यास जायला निघालेल्या इंग्रजांच्या सैन्यावर रात्रीं बारावर दोन वाजतां गोळ्या टाकण्यास प्रारंभ केला. हें पाहून

इंग्रजांचें सैन्य भयचकित झालें. आपण गुप्त खलबतें करून रात्रीं पुण्यास जाण्याकरितां निघालों असतांही मराठे आपल्या पाठीवर आहेतच, हें झालें कसें याचें त्यांना गूढ पडलें ! राघोबादादाच्या लोकांकडून हरिपंत फडक्यांना ही बातमी कळली, असें त्यांनीं ठरविलें. अमक्याकडून ही बातमी फुटली असें नुसतें ठरविण्यांत त्यावेळीं कांहीं मतलब नव्हता. आलेल्या प्रसंगाला सादर व्हायचें एवढेंच त्या वेळचें कर्तव्य होतें. सारांश इंग्रजांच्या पुण्यास जायला उत्सुक झालेल्या सैन्याला, मराठ्यांचे शिपाई चालून येऊन सामान लुटीत होते तें त्यांना लुटूं न देण्याला आणि जिकडून गोळ्या येत होत्या तिकडे गोळ्या टाकण्याला उभें रहावें लागलें ! रात्रीची वेळ असल्यामुळें पेशव्यांचें सैन्य आपल्याला पुढें जाऊं न देण्याकरितां किती आलें आहे याचा इंग्रजांच्या सैन्याला कांहीं अंदाज करितां येईना. परंतु सकाळ झाल्यावर पाहूं लागले तों चारी दिशांना त्यांना पेशव्यांचें सैन्य दिसूं लागलें. काप्टन स्टुअर्ट लढाईंत पडल्यावर त्याच्या जागेवर काप्टन जेम्स हार्टले यांस नेमिलें होतें. या इंग्रज योध्यानें या लढाईंत, जे एका मागून एक मराठ्यांनीं भयंकर मारे केले त्यांनीं न डगमगतां, आपला पराक्रम पुष्कळ गाजविला. हा इंग्रज योद्धा या वडगांवच्या लढाईंत नसता तर इंग्रजांचा मराठ्यांनीं जो नाश केला, त्यापेक्षां पुष्कळच अधिक केला असता. या लढाईंत मराठ्यांचे हल्ले याच्यावर किती तरी झाले, पण तो ह्मणून गडबडला नाहीं. याच्या हाताखालचे शिपाई शत्रूचा मार सहन करवेना

तेव्हां पळून जाऊं लागले होते, परंतु यानें त्यांना पळतां पळतां आपल्या उत्तेजक भाषणानें मागें फिरविलें. यावरून त्याजवर शिपायांची प्रीति फार होती किंवा तो आपल्या अंगच्या गुणांनीं प्रीतिपात्र झाला होता असें ह्मणण्यास हरकत नाहीं. उजाडलें नव्हतें तेथपर्यंत मराठ्यांच्या शिपायांनीं इंग्रज बहादुरांच्या पलटणीचें सामान लुटण्याकडे आपलें लक्ष दिलें होतें. परंतु दिवस उगवल्यावर मराठ्यांनीं, इंग्रजांच्या सैन्याच्या पिछाडीवर हल्ला केला. हा हल्ला वर ज्याचें आतांच वर्णन केलें आहे, त्यानें आपल्या अंगावर घेतला व तो मोठ्या शौर्यानें लढूं लागला. हल्ला केलेले लोक मागें सरताहेत असें पाहून त्यानें त्यांचा पाठलाग आरंभिला. पण त्याला थोडक्यांत कळून आलें कीं, आपल्या शौर्याकडे पाहून मराठे मागें सरले नसून, त्यांनीं पळण्याचें मीष करून त्यांच्या तोफांच्या व बंदुकांच्या माऱ्यांत आपल्याला नेलें! काप्टन हार्टलेनें अशाही स्थितींत मोठ्या दमानें लढाई चालविली, परंतु त्यानें आपला एक ऑफिसर कर्नल काकबर्न यांजकडे पाठवून, त्यानें त्याच्या मुख्य पलटणी मदतीस बोलाविल्या. पण बिचारा काकबर्न तरी काय करतो? त्याच्या मुख्य पलटणींना शत्रूंच्या घोडेस्वारांनीं ताणून धरलें होतें. तेथून त्यावेळीं पलटणीं हालविणें ह्मणजे लढाईच्या प्रारंभालाच अपजयाला कारणीभूत होणें होतें. तरी कॉकबर्न यानें, आपण हार्टलेच्या मदतीला पलटणी पाठविल्या नाहींत, तर स्थिति फार भयंकर झाल्यावांचून रहाणार नाहीं असें जाणून, युरोपियनांच्या

पांच टोळ्या व नेटिवांच्या दोन टोळ्या अशी मदत पाठवून दिली. ही मदत येऊन पोंचल्यावर हार्टले फिरून जोरानें लढूं लागला. अशी, सुमारें दहा वाजेपर्यंत जोराची चारी बाजूंनीं लढाई चालली असतां, या लढण्यानें परिणाम चांगला होणार नाहीं, असें मनांत आणून कॉकबर्न यानें लढाई एकदम बंद करा असा हुकूम हार्टले यांस कळविण्याकरितां एक ऑफिसर पाठविला. हार्टले यानें यावेळीं लढाई बंद करणें ह्मणजे उद्यांचें मरण आज आणण्याप्रमाणें होतें! परंतु त्याच्या नशिबानें त्याला तो हुकूम येऊन पोंचला नाहीं. लेफ्टनंट राटरे ह्मणून एक त्या सैन्यांत व्हॉलंटियर ऑफिसर होता, त्याला कॉकबर्नकडून हुकूम घेऊन येणारा मनुष्य वाटेंत भेटला, व त्यानें त्याला परत पाठवून काकबर्नपाशीं अशी विनंति करण्यास सांगितलें कीं, हार्टले यानें लढाई अशीच पुढें चालविली, तर आपल्याला जय येण्याचा संभव आहे. हार्टलेनें तशीच बारा वाजेपर्यंत नेटानें लढाई चालविल्यावर, कॉकबर्न यानें तो दमला असेल असें जाणून, मेजर फ्रेड्रिक यास त्याची जागा संभाळायला पाठविला. ही आतांपर्यंत जी झपाट्याची लढाई झाली ती इतर ठिकाणांपेक्षां हार्टले याजवर जोराचा मारा होत असल्यामुळें त्याच्या हाताखालील सैन्याचा फार नाश झाला. ही लढाई सायंकाळपर्यंत चाललीच होती. परंतु ती होत असतांनाही इंग्रजांच्या सैन्यानें एकेक पावलानें वडगांवचा रस्ता धरला होता. इंग्रजांच्या सैन्यानें आपलें पुष्कळ सामान जाळलें होतें, तरी बाकी जें उरलें होतें

तें देखील रक्षण करणें त्यांच्या जिवावर आलें. कारण अशा वेळीं त्या सामानाबरोबर असलेलें बाजारबुणगें जिवाचें रक्षण व्हावें अशा इच्छेनें शिपायांच्या टोळ्यांमध्यें आश्रयाकरितां शिरतें, पण तें, शिपायांना नदींत पोहणाराच्या गळ्यास एकाद्या न पोहतां येणाऱ्यानें मिठी मारावी त्याप्रमाणें होतें. माराठ्यांच्या जोरदार माऱ्यामुळें इंग्रजांच्या सैन्यांत त्यानें मागच्या पायानें वडगांवचा रस्ता धरला असतां, असा प्रकार झाला. सायंकाळीं चार वाजण्याच्या सुमाराला गांव जवळ आला, असें पाहून इंग्रजांच्या सैन्यांतील बाजारबुणगें आश्रयाकरितां गांवाकडे धावूं लागलें. ती धांदलीची वेळ गांठून, पेशव्यांच्या घोडेस्वारांनीं हल्ले करून इंग्रजांच्या सैन्यांत एकच हलकल्होळ उडवून सोडला ! या वेळच्या हल्लयांत मराठ्यांच्या घोडेस्वारांपैकीं कित्येकांनीं इतकें धैर्य केलें कीं, ते इंग्रजांचें सैन्य पिटीत वडगांवांत शिरले. अशा प्रकारचें धाडस युरोपियन शिपायांत क्वचितच दिसून येईल. इंग्रजांचें सैन्य वडगांवांत शिरल्यावर, त्या दिवशीं लढाई थांबली आणि अतिशय श्रमून गेलेल्या शिपायांना विसावा मिळाला.

पण दुसरे दिवशीं ह्मणजे ता. १३ रोजीं सूर्य क्षितिजापासून वर आला नाहीं तोंच, आदल्या दिवशीं इंग्रजांच्या सैन्याचा अर्धा जीव केलेल्या मराठ्यांच्या सैन्यानें, वडगांवावर तोफांचा मारा सुरू केला. कालच्यापेक्षां आज इंग्रज अधिक त्वेषानें लढतील असें मराठ्यांच्या सैन्याला वाटलें होतें, परंतु मराठ्यांच्या

बरोबर त्यांच्यानें मुळींच दम धरवेना. काप्टन हार्टले-वांचून इंग्रजांच्या सैन्यांत कोणालाही लढाईचा हुरूप चढेना. तो विचारा एकटा काय करणार ? त्या दि-वशींचा मराठ्यांचा पराक्रम पाहून इंग्रजांना वाटूं ला-गलें, कीं आपण जर आतां मराठ्यांना शरण गेलों नाहीं, तर ते आपल्यापैकीं एक मनुष्य जिवंत ठेव-णार नाहींत. आणि याच समजुतीनें कितीक लोक ल-ढाई करितां करितां पळून गेले. या लढाईत इंग्रजांचें खरें सैन्य किती मेलें असेल, हें आतां सांगतां येणें काठिण आहे. इतिहासांतून जे आंकडे दृष्टीस पडतात त्यांवर भरंवसा ठेवावासा वाटत नाहीं. कारण ते, इंग्रजां-नीं नाक मुठींत धरून पेशव्यांना शरण जाण्यासारखे नाहींत. ज्यांच्या लेखांवर विद्वान लोक पुष्कळ भरं-वसा ठेवतात, ते मराठ्यांचा इतिहास लिहिणारे ग्रां-डफ वडगांवच्या लढाईची माहिती लिहून तींत ९६ मनुष्यें मृत्युमुखीं पडलीं, १९१ जखमी झालीं, आणि १९९ लढाईच्या गर्दींतून पळालीं असे शेवटीं आंकडे देत आहेत. ह्या आंकड्यांवरून वडगांवच्या लढाईत मराठ्यांनीं अंगावर शहारे उठण्यासारखा इं-ग्रजांचा नाश केला, असें कोणालाहि ह्मणतां येणार नाहीं. मेलेल्यांच्या व जखमी झालेल्यांच्या संख्येंत १९ ऑफिसर होते. कसेंहि असलें, तरी मराठ्यांनीं इंग्रजांच्या सैन्यांतलें सामान पुष्कळ लुटलें असेल, पण त्यांना प्राणहानी करितां आली नाहीं, असें वरच्या आंकड्यांवरून ह्मणावें लागतें. इंग्रजांचें या लढाईत एकंदर सैन्य पांच हजारांवर नव्हतें आणि मराठ्यांचें

सैन्य कोणी ह्मणतो चाळीस हजार होतें, कोणी साठ हजार ह्मणतो, कोणी एक लाख होतें म्हणतो, आणि कर्नल कॉकबर्ननें तर मराठ्यांच्या सैन्याचा अदमास सव्वालाखाचा केला होता ! इंग्रजांच्या सैन्यांतील शूर शिपायांनीं मराठ्यांचा अनर्थ नाश केला, असें ह्मटलेलें दिसतें, परंतु वरच्यासारखे आंकडे दिलेले आढळले नाहींत. ते सांपडले असते, तर मराठे व इंग्रज यांच्या शक्तींतील अंतराचा हिशोब बसविण्यास ठीक झालें असतें. तरी एक लाख मराठ्यांच्या सैन्यापुढें पांच हजार इंग्रजांचें सैन्य लढाईंत उभें राहिलें, यावरून इंग्रजांच्या शक्तीचा मुळींच अदमास करितां येणार नाहीं असें नाहीं. सरळ हिशोबानेंच वीस मराठे शिपायां-बरोबर एक इंग्रजांचा शिपाई पडतो. इंग्रजांच्या सै-न्यांत मराठ्यांपेक्षां तोफा पुष्कळ असत व त्या चांग-ल्या असत. त्याचप्रमाणें त्यांच्या बंदुका मराठ्यांच्या सैन्यांतील बंदुकांपेक्षां चांगल्या असत ही गोष्ट अक्ष-रशः खरी असेल. इंग्रज आपल्या तोफांच्या व बंदु-कांच्या आगीनें मराठ्यांची अगदीं त्रेधा उडवून देत, व तसें होणेंहि स्वाभाविक आहे. म्हणून पांच हजार इंग्रजांचें सैन्य मराठ्यांच्या पन्नास साठ हजार किंवा एक लाख सैन्यापुढें उभें राहिलें असेल, यावर विश्वास ठेववत नाहीं. मराठ्यांच्या सैन्याला तोफांची व बंदु-कांची ओळख देखील नव्हती असें कांहीं नाहीं. मात्र त्यांच्या तोफा व बंदुका इंग्रजांसारख्या सुधारलेल्या नव्हत्या. शरीरसामर्थ्यासंबंधानें पाहतां, दोघांत म्हण-ण्यासारखा फरक नव्हता. एकाद्या धडधाकड युरोपि-

यन सोल्जराचा एकाद्या मराठ्या शिपायानें हात हिसडला, तर तो ठीक दुखावल्यावांचून राह्यचा नाहीं, असे शिपाई मराठ्यांच्या सैन्यांत पुष्कळ होते. सारांश वीस मराठे शिपायांस एक इंग्रजांचा शिपाई पुरे होता अशी जी पुष्कळांची समज झालेली आहे, ती चुकीची आहे. वडगांवच्या वरच्या लढाईंत, इंग्रजांच्या बाजूला पांच हजारांपेक्षां पुष्कळच अधिक सैन्य असलें पाहिजे व नाशही पुष्कळच अधिक झाला असला पाहिजे, हें थोडा अधिक विचार केला असतां वाचकांस दिसून येईल. या लढाईंत मराठ्यांच्या बाजूला चाळीसपासून पन्नास हजारपर्यंत सैन्य असावें असा पुष्कळांचा समज आहे. शिंद्यांच्या पदरीं पाटीलबोवांच्या कारकीर्दींत एक लाखपर्यंत सैन्य होतें. परंतु या लढाईच्या वेळीं, पाटिलबोवांच्या पाशीं इतकें सैन्य नव्हतें. यानंतर त्यांनीं आपलें सैन्य वाढविलें. यावेळीं शिंद्यांच्या पदरीं साठ एक हजार सैन्य होतें, पण तें त्यांना सगळेंच इकडे आणतां येत नव्हतें. देशाच्या रक्षणाकरितां तें जागजागीं ठेवलेलें होतें असें म्हटलें तरी चालेल; किंवा इंग्रजांच्याच करितां पाटीलबोवांना त्याच्या मुलखांत, पन्नास एक हजार सैन्य कायमचें ठेवावें लागे, असें म्हटलें तर तेंही खोटें नाहीं. होळकरांपाशीं नेहमींचें असें पसतीस हजारपासून पन्नास हजारपर्यंत सैन्य असे. पण त्यांनाही शिंद्याप्रमाणेंच आपल्या मुलखाचें संरक्षण करण्याकरितां त्यांतलें पुष्कळ मुलखांत ठेवावें लागे. तात्पर्य, वडगांवच्या लढाईंत शिंदे व होळकर या दोघांचें मिळून वीस एक हजार सैन्य

असेल. ही गोष्ट येथें सांगितली पाहिजे कीं, ऐनवेळीं शिंदे व होळकर या दोघांनाही आपलीं सैन्यें अधिक वाढवितां येत असत. तशीच वेळ येती, तर दोघांनींही श्रीमंतांच्या सेवेकरितां अधिक सैन्यें आणिलीं असतीं. पण हरिपंततात्यांना इंग्रज कसे काय लढवय्ये आहेत हें समजलेलें होतें, व त्यामुळें दोघांना नेहमींप्रमाणें बोलाविण्यांत आलें होतें. तथापि दोघांनींही आपल्या सैन्यांतले चांगले लोक आणले होते. हरिपंततात्यांचे खाजगी स्वार व श्रीमंतांचे पागे, पथकी, सरंजामी, खाजगी मिळून पंचवीस एक हजारांची बेरीज असावी. एकंदरींत मराठ्यांचें सैन्य वडगांवच्या लढाईत पन्नास हजारांच्या आंत असावें. आणि इंग्रजांच्या बाजूला निदानपक्षीं, वीस एक हजार तरी सैन्य असावें असें विचाराअंतीं सिद्ध होतें.

राघोबादादाला पेशवाईतून हाकलून दिलें होतें, तरी तो जातीचा शिपाई असल्यामुळें त्याला पदरीं कांहीं सैन्य असल्यावांचून राहवत नसे. तो घाले घाली, लूट करी, एकादा लहानसा पाहून त्याला दरडावून त्याजपासून कांहीं लुंगावी, पदरच्या सैन्याला सहा सहा महिन्यांत पगार देत नसे; काय हवें तें करी पण पदरीं सैन्य ठेवी. कर्नल वुइल्क्सनें ह्मटलें आहे कीं, हैदरानें राघोबादादाला निरनिराळ्या वेळा मिळून सोळा लाख रुपये दिले. तात्पर्य राघोबा हव्या तशा घालमेली करी आणि आपल्या पदरीं सैन्य संभाळून असे. गुजराथेंतल्या लढायांत इंग्रजांच्या सैन्याबरोबर राघोबाचें सैन्य होतेंच. राघोबावर त्याच्या कांहीं सरदारांची इतकी

भक्ति होती कीं, ते त्याच्याकरितां मरण्यास तयार होते. तेव्हां या वडगांवच्या लढाईंत इंग्रजांच्या मदतीला राघोबाचें कांहींतरी सैन्य खचीत होतें. इंग्रजांचीं पलटणें पुढाकारानें लढत होतीं, हें मात्र खरें आहे. पण त्यांची संख्या तोफखान्याकडचे लोक धरून पांच हजारांपेक्षा अधिक नव्हती असें जें म्हणतात तें इंग्रजांची शक्ति राक्षसासारखी होती असें दाखविण्याकरितांच केवळ म्हटलेलें असावें. मराठ्यांच्या सैन्याला कवाईत शिकविली जात नसे, ह्मणून त्यांना लढतां येत नव्हतें असें नाहीं. मराठ्यांच्या सैन्यांतले लोक कांहीं अंधळे किंवा मूर्ख नसत. शत्रूवर चढ कसा करावा, त्याला घेरा कसा घालावा, अंगावर घेऊन खळग्यांत कसा गांठावा, यांचें त्यांना जसें कांहीं बाळकडूच मिळालेलें असे. कवाइतींतले पुष्कळ प्रकार त्यांना पुष्कळ दिवस कराव्या लागलेल्या लढायांच्या अनुभवानें सहज करितां येत असत, व कवाइती पलटणींच्या लोकांच्या पुढें ते,ते करून दाखवून त्यांना आश्चर्यचकित करीत.कवाइतीमुळें आमच्या पलटणींतले दहा शिपाई तुमच्या शंभरांना भारी होत, हें असें जें ऐकण्यांत येतें ती निव्वळ आत्मश्लाघा आहे. लढाईंत खरे लोक किती पडले हें सत्य स्मरून न लिहितां, मेलेल्यांची व जखमी झालेल्यांची संख्या थोडी ल्याह्यची, हाही आत्मश्लाघेचाच प्रकार होय ! या आत्मश्लाघेबद्दल फार वाईट वाटतें. याचें कारण हिंदुस्थानांतील मुलांच्या मनावर स्वतःविषयीं कांहीं भलताच ग्रह होतो हें होय. ही इंग्रज लेखकांची व इतिहासकारांची आत्मश्लाघा, हिं-

दुस्थानांतील मुलांना लहानपणापासून आपण मेषपात्र, ढिले, मिळमिळीत व भ्याड आहोंत, आपली सगळी जातच अशी, असें वाटवितें ही मोठ्या दुःखाची गोष्ट नव्हे काय ? एकाद्या झाडाचें रोप करपलें ह्मणजे तें वाढणार कसें, व त्याला चांगलीं फळें तरी कोठून येणार ? हिंमत अशी अलीकडे आपणांत दिसेनाशी झाली आहे. याला बहुंशांनीं राज्यकर्त्यांची फाजील आत्मश्लाघा कारण झाली आहे. त्यांनीं आपले गोडवे गावेत यांत त्यांचा हितसंबंध आहे. त्यांनीं आपली आत्मश्लाघा सहेतुक केली आहे. पण आमच्यांत असे कित्येक पढतमूर्ख आहेत, कीं त्यांना इंग्रज ह्मणजे एक दैवत व आपण जनावरांच्या वरच्या वर्गांतलीं रानटी माणसें असें वाटतें ! इंग्रजांचें बेणें घेतल्यावांचून आपणाला उन्नतावस्था येणार नाहीं असें ह्मणणारे या पढतमूर्खांत कित्येक षंढ उत्पन्न झालेले दिसतात, याहून दुर्विनीत दशा ती दुसरी कोणती ? ! वाचकहो, हें पक्कें लक्षांत ठेवा, कीं आपला वंश त्यानें परदास्यच करीत असावें असा नाहीं. आपल्या शरीरांत जें रक्त खेळतें आहे तें आतां थंड पडावें हें परिस्थितीला अनुरूप आहे, ह्मणून तें मुळांतलें थंड नाहीं. त्याला तापवलें पाहिजे, तरच आपल्याला बरे दिवस येतील. असो.

वडगांवच्या लढाईत इंग्रजांचें सैन्य पांच हजारांपेक्षां अधिक असावें, आणि दिलेल्या आंकड्यापेक्षां मृत्युसंख्या पुष्कळच अधिक असावी याला आणखी एक प्रमाण आहे. त्याविषयीं लिहून मग मूळ विषयांकडे वळूं. नवीनच पिंजऱ्यांत कोंडलेल्या वाघाला, बाहेरून

काठ्या टोंचून सतावलें तर त्याच्या अंगांत इतका क्रोध येतो, कीं तो पिंजऱ्याचे लठ्ठ गज आपल्या पंजाच्या तडाक्यानें फोडून, बाहेर येतो कीं काय असें वाटतें. आणि दुर्दैववशात् तो पिंजरा फोडून बाहेर आला तर काठ्या टोंचणारांना यमपुरीच दाखवितो. प्रत्यक्ष अनुभव नसला तरी कल्पनेनें हें प्रत्येकाला समजून येण्यासारखें आहे. इंग्रजांच्या आगीच्या भडिमारानें मराठ्यांच्या सैन्यांतील तलवारबहादूर स्वार शिपायांची स्थिति, पिंजऱ्यांतील खाड खाड पंजे आपटणाऱ्या रागावलेल्या वाघाप्रमाणें त्यावेळीं झाली नसेल काय ? ते जागच्याजागीं दांत ओंठ खात, हातपाय आपटीत, काय करावें या आगीमुळें पुढें जाऊन शत्रूंचीं मुंडकीं उडवितां येत नाहींत, असें ह्मणाले नसतील काय ? टोपीवाल्यांना लांबून लढतांना पाहून छातीला छाती भिडवून लढणाऱ्या त्या खऱ्या शूरांना किती त्वेष चढला असेल ! शूर शिपाई मनाचे महा उदार असतात हें खरें, परंतु जेथपर्यंत ते समरभूमीवर असतात, तेथपर्यंत त्यांचें औदार्य शत्रूच्या प्राणनाशांत असतें. जोंपर्यंत त्यांच्या तलवारी रक्तानें भिजलेल्या असतात तोंपर्यंत त्यांच्या धारेला खा खा सुटलेली असते. त्यांत शत्रूपक्षाचा सूड घेण्याची वेळ असली, ह्मणजे तर त्या उग्रस्वरूपी समरभवानीला ब्रह्मांड खाईन कीं काय अशी खा खा सुटते. याचे अनुभव इतिहासांत शेंकडों दृष्टीस पडतात. इंग्रजांनीं आगीच्या मारानें आपला पुष्कळ नाश केलेला पाहून मराठे शिपायांना, त्यांनीं जेव्हां इंग्रजाला जेरीस आणून लगट केली तेव्हां सूड घेण्याची

बुद्धि झाली नसेल काय ? असें कसें होईल ! मराठे शिपायांनीं दीड दिवसाच्या लढाईंत कित्येक वेळां जोरानें हल्ले करून, इंग्रजांना पळवायला लावून, त्यांच्या तलवारींना तीनशेंपेक्षांही कमी मनुष्यांचें रक्त लागलें, तर ते तलवार धरणारे नव्हते असें ह्मणावें लागेल ! पेशव्यांच्या चाळीस पन्नास हजार सैन्यानें दीड दिवस लढाई करून छपन्न माणसें मारायचीं, ह्मणजे त्यांच्या शिपाईगिरीला वार्धक्य आलें होतें असें ह्मटलें तरी शोभणार नाहीं. शिपाईगिरीला आसन्नमरणस्थिति आली होती असेंच ह्मणावें लागेल. परंतु वडगांवच्या लढाईच्या वेळेस मराठ्यांच्या शिपाईगिरीला अशी स्थिति आली नव्हती, हें मराठ्यांनीं यानंतर ज्या लढाया मारल्या त्यांवरून उघड होतें. आणि एवढींशीं माणसें मेलीं असतांना, इंग्रजांनीं शरण येऊन तह करण्याकरितां मि. फार्मर यास पाठवावें, हें चमत्कारिक नाहीं काय ? कल्पनेच्या बाहेर नाश व फजीति झाल्यावांचून राघोबाला पेशवाई देण्याचा विडा उचलेले इंग्रज, पेशव्यांच्याबरोबर तह करण्यास तयार झाले नाहींत, हें वाचक कल्पनेनें आजूनही न जाणतील, तर आणखीही किती लिहिलें तरी तें व्यर्थच होईल. आणखी हेंही वाचकांनीं लक्षांत ठेवावें कीं, इंग्रजांचें जर सारें पांच हजारच सैन्य असतें, तर वीरश्री संचरलेल्या मराठे शिपायांच्या तलवारींच्या भुकेला तें मुळींच पुरलें नसतें. आतां परमेश्वराच्या कृपेनें कांहीं दैविक चमत्कार होऊन इंग्रजांच्या सैन्यांत एकाचे दहा शिपाई व्हावे असला कांहीं प्रकार असला, तर हें लिहिणें परत घ्यावें

लागेल ! असो. यासंबंधानें विचार करण्यासारखी आणखी एक गोष्ट आहे. या लढाईनंतर इंग्रजांनीं तहाचीं कलमें ठरवून तीं पुरीं करून देईपर्यंत, मि. वुइल्यम गामुल फार्मर आणि लेफ्टनंट चार्लस स्टुअर्ट या दोघा गृहस्थांस ओलीस ठेवून, आपली सुटका करून घेतल्यावर, जी मुंबईस चौकशी केली व कित्येकांस कामावरून दूर केलें व कित्येकांस वर चढविलें, हा प्रकार लढाईतल्या थोड्याशा नुकसानावरून कोणीं तरी केला असता काय ? या पुढील चौकशीवरून आणि शिक्षा वढत्यांवरून, इंग्रजांचा वडगांवच्या लढाईत मनाला झोंबेसारखा नाश झाला असावा हें सिद्ध होत आहे. हा नाश इंग्रजांचा झाला याबद्दल आतां आपल्याला दुःख वाटावें हें साहजिक आहे. पण मराठ्यांनीं गाजविलेल्या शौर्याबद्दल आपल्याला अभिमान धरला पाहिजेच. हो; या वडगांवच्या लढाईत इंग्रजांचे अधिक लोक मेले असावेत, याचें पुष्टीकरण पुढील गोष्टीवरून होईल. लढाई झाल्यानंतर इंग्रजांनीं मुंबईस जी चौकशी केली तींत मि. फ्रासर या नांवाच्या गृहस्थाला कामावरून दूर केला. याला कांहीं सैन्य देऊन बोरघाटाचें रक्षण करण्याकरितां ठेविला होता. मराठ्यांच्या निकरामुळें याच्या हातून घाटाचें रक्षण झालें नाहीं. त्याच्याशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं. त्यानें एक पत्र लिहिलेलें आहे, त्यांत तो प्रथमच लिहितो कीं, " आमचें सैन्य कापून त्याचे तुकडे तुकडे केले." या वाक्यावरून ९६ मनुष्यें लढाईत प्राणास मुकलीं, या इतिहासकारांच्या लिहिण्यावर भरंवसा ठेववेल काय ? असो.

मुंबईकर इंग्रजांनीं कलकत्तेकरांच्या हुकुमाखालीं सर्व प्रकारचे राज्यव्यवहार करावेत अशी विलायतसरकारानें शिस्त घालून दिलेली होती. परंतु मुंबईकर कलकत्तेकरांची परवानगी न आणतां, कित्येक गोष्टी करीत. कलकत्तेकरांनीं मुंबईकरांच्या साह्याला कर्नल लेस्ली यांच्या हाताखालीं सैन्य पाठवून दिलें होतें. पण तें येऊन पोंचण्याच्या अगोदरच, यशांत आपल्याला दुसरा कोणी वांटेकरी नसावा, या इच्छेनें मुंबईकरांनीं पेशव्यांबरोबर लढाई आरंभिली व पदरीं अपयश घेतलें. पुढें आला तह करण्याचा प्रसंग. तेव्हां कलकत्तेकरांच्या मतावांचून तो त्यास करितां येईना. मुंबईकरांनीं कलकत्तेकरांना सर्व मजकूर लिहून कळविला. परंतु कलकत्तेकरांनीं, आधींच सैन्य पाठविलें होतें, आणि तहाच्या कलमांत नुकसानीची होती बाब, यामुळें तिकडे विशेषसें लक्षच दिलें नाहीं. कलकत्तेकरांनीं कर्नललेस्ली याच्या हाताखालीं सैन्य देऊन त्याला पाठविलें होतें, त्यानें वाटेंत फार दिवस लावून खर्चही फार केला. तेव्हां त्यांनीं कर्नल गोडर्ड याला त्याच्या जागेवर पाठविलें. हा मनुष्य कर्तबगार असल्यामुळें कलकत्तेकर व मुंबईकर या दोघांनाही आशा सुटली. कलकत्तेकरांनीं कर्नल गोडर्ड यास मुंबईकरांचा कमांडर इंचीफ नेमून त्यास मुधोजी भोसले, फत्तेसिंग गायकवाड, शिंदे, पेशवे यांच्यांशीं तह वगैरे करण्याचा अधिकार दिला. कलकत्तेकरांनीं पेशव्यांबरोबर तह करायचा, त्यांत पुरंदरचीं तेवढीं कलमें सुचविलीं!

वडगांवची लढाई झाल्यानंतर लागलींच, पेशव्यां-

नीं इंग्रजाबरोबरच्या लढायांला कारण जो राघोबादादा त्याला इंग्रजांपासून मागून घेतलें. इंग्रज नडलेले, तेव्हां त्यांनीं राघोबाला पाटिलबोवांच्या स्वाधीन केलें. नंतर राघोबाला बुंदेलखंडांत जहागीर करून दिली आणि पाटिलबोवांनीं त्याच्या बरोबर आपलें कांहीं सैन्य देऊन त्याला तिकडे पाठविलें. नाना, पाटिलबोवा वगैरे राजकारस्थानी मंडळीचा आंतला बेत, राघोबाला जहागीर वगैरे कांहींएक न देतां, झांशी येथें कैदेंत ठेवावा असा होता. परंतु निम्या वाटेंत राघोबाला हा बेत समजला. त्याचें कांहीं सैन्य त्याच्या पाठोपाठ होतेंच. त्याच्या साह्यानें त्यानें त्याजबरोबर असलेल्या शिंद्याच्या सैन्याचा मोड केला व तो आपले स्नेही जे इंग्रज त्यांच्या आश्रयाकरितां भडोच येथें गेला. राघोबाला इंग्रजांनीं आश्रय दिला इतकेंच नाहीं, तर तो जेव्हां दत्तक मुलगा अमृतराव आणि औरस मुलगा बाजीराव ( जो या वेळीं चार वर्षांचा होता ) यांच्यासह पूर्वीचा कर्नल पण आतां जनरल झालेला मि. गोडर्ड यास जाऊन भेटला, तेव्हां त्यानें राघोबाला महिना पन्नास हजार रुपये तैनातीदाखल देण्याचें कबूल केलें. परंतु कलकत्तेकर इंग्रजांना हें गोडर्डचें करणें आवडलें नाहीं. गोडर्ड हा जो इतका उदार झाला, तो राघोबाच्या संबंधांत पुढें होणाऱ्या फायद्याकरितां झाला. तथापि त्यानें राघोबाबरोबर तह करण्याचें मनांत आणलें नाहीं. त्यानें पुण्यास नानांच्या बरोबर सलोख्यासंबंधानें पत्रव्यवहार चालविला. त्यांत वडगांवांस जीं कलमें ठरलीं होतीं तीं बहुतेक गाळलीं होतीं, आ-

णि आह्मी ह्मणतों तीं कलमें कबूल नसल्यास लढाईचा प्रसंग येईल अशी धमकावणीही होती.

इंग्रजांचें पहिल्यापासून आत्महिताचें वर्तन दिसत आल्यावरून हैदर, निजाम व पेशवे या तिघांनीं मिळून इंग्रजांबरोबर एकदम लढाई उभी करावी, अशा प्रकारचा कांहीं बेत चालला होता. खेरीज नानाफडणविसांच्या सुरत येथें असलेल्या वकिलांनीं तेथील डच अधिकाऱ्याबरोबर, इंग्रजांबरोबर लढाई करण्यासंबंधाचें बोलणें चालविलें होतें. त्यावरून जनरल गोडर्ड यानें त्यांस काढून टाकलें, आणि गुजराथेंत जो पेशव्यांचा मुलूख होता तो काबीज करून घेण्याची तयारी केली. गुजराथेंत प्रथम लढाई सुरू करण्यांत इंग्रजांचा एक हेतु होता. तो हा कीं, फत्तेसिंग गायकवाड यांजबरोबर तह करून त्याचे हात बांधून टाकावेत अशी त्यांची पुष्कळ दिवस खटपट चालली होती, परंतु फत्तेसिंगानें अळंटळं चालविलें होतें. तेव्हां जनरल गोडर्ड यानें असा विचार केला कीं, पेशव्यांचा गुजराथेंत जो मुलूख आहे तो फत्तेसिंगाच्या मुलखाला लागून आहे. आपण पेशव्यांचा मुलूख बळकावायला लागलों, ह्मणजे आपल्या आपण फत्तेसिंगाचे डोळे उघडतील. आणि त्याप्रमाणें झालेंही. पेशव्यांचा गुजराथेंतील मुलूख काबीज करण्याची इंग्रजांची तयारी पहातांच फत्तेसिंगानें त्यांजबरोबर तह केला व त्यांच्या साह्याला आपलें कांहीं सैन्य दिलें. आणि याप्रमाणें इ. स. १७८० च्या जानेवारी महिन्याच्या सुरवातीला इंग्रजांनीं पेशव्यांच्या बरोबर ल-

ढायला सुरवात केली.

जनरल गोडर्ड आपल्याबरोबर सैन्य घेऊन डभोई-चा किल्ला हस्तगत करून घेण्याकरितां गेला. मि. बोडॅम पेशव्यांचा सुरतेजवळील मुलूख काबीज करण्याकरितां आपलें सैन्य घेऊन त्यांत शिरला. मि. रॉबर्ट गांबीर, हानसोट, देशबोर, अमोद वगैरेकडील पेशव्यांचीं ठाणीं उठवूं लागला. डभोईच्या किल्याचें रक्षण करण्याकरितां त्या किल्यांत पेशव्यांनीं आपलें दोन हजार सैन्य ठेविलें होतें. इंग्रजांचें सैन्य येतांच किल्लेदारानें किल्ला लढवायला सुरुवात केली. किल्लेदारानें हा किल्ला इंग्रजांच्या हातीं न जावा, ह्मणून मोठ्या शर्तीनें लढाई केली. परंतु इंग्रजांचें सैन्य अधिक, आणि किल्ला घेण्याचे प्रयत्न एकसारखे चोवीस तास, यामुळें किल्यावरचे लोक अगदीं दमून गेले. व तशा स्थितींत अपरात्रीं इंग्रजांनीं तो किल्ला हस्तगत करून घेतला. हा किल्ला घेतल्यावर जनरल गोडर्ड फेब्रुवारीच्या दहा तारखेस अमदाबाद शहर हस्तगत करण्याचा प्रयत्न करूं लागला. प्रथम गोडर्ड यानें पेशव्यांच्या पदरच्या, शहरच्या अधिकाऱ्याला शहर खालीं करून देण्याबद्दल सांगितलें. तेथील ब्राह्मण अधिकाऱ्याला इंग्रज चांगल्या जारीनें तयारीनें आले आहेत हें माहित होतें. तेव्हां त्यानें विचार केला कीं, आपण जर एकादें वांकडें उत्तर दिलें तर इंग्रज शहरावर एकदम हल्ला करून शहरांतील हजारों लोकांची कत्तल करण्यास सुरुवात करतील, याकरितां आपण यांना वांकडा जबाब देऊं नये. त्यानें फार लीनतेनें जनरल गोडर्ड याजकडे नि-

रोप पाठविला कीं, तुमच्याबरोबर लढाई करण्याची आमची मुळींच शक्ति नाहीं. नसती हिंमत आणून तुमच्याबरोबर लढाई करावयाची आणि प्राणनाश वाढवायचा, शहरांतल्या लोकांचे प्राण संकटांत पाडायचे हें मला पसंत नाहीं. तुमच्या स्वाधीन शहर करण्यास मीं खुषीनें तयार आहें. पण या शहराचें संरक्षण करण्याकरितां आमच्या सरकारांनीं येथें जें थोडेंसें सैन्य ठेविलेलें आहे, त्यांतील लोक माझा हुकूम एकदम पाळतील असें मला वाटत नाहीं. याकरितां त्या लोकांना चार समजुतीच्या गोष्टी सांगायला तुम्हीं मला कृपा करून थोडी फुरसत द्यावी. हें त्या शहरच्या अधिकाऱ्याचें सांगणें अगदीं शिस्तवार होतें, हें कोणालाही कबूल करावें लागेल.

परंतु न्यायी ह्मणविणाऱ्या इंग्रज लोकांत त्या वेळीं झोटिंग संचरलेला होता. भला मनुष्य कोण, बुरा कोण, कोणाशीं कसें वागावें याचा विधिनिषेध त्यांच्यांत उरला नव्हता. अठरा विश्वे दारिद्र्यांतून श्रीमंत झालेल्या एकाद्या मनुष्यांत जसा उन्माद चढतो, तशी इंग्रजांची स्थिति झाली होती. शहरच्या अधिकाऱ्यानें किती लीनतेनें उलट निरोप पाठविला, याचा कांहींएक विचार न करितां दुसऱ्या दिवशीं इंग्रजांचें कांहीं सैन्य शहराभोंवतालच्या कोटाला जाऊन भिडलें. शहरच्या रक्षणाला जें कोटावर पेशव्यांचें सैन्य होतें, त्यानें या पुंडखोर सैन्याचा सडकून समाचार घेतला. त्यांत लेफ्टनंट कर्नल पारकर यांस चांगलीच जखम झाली. इंग्रजांच्या चांगुलपणाला, न्यायीपणाला या गोष्टीनें हर-

ताळ लागला नाहीं काय? यांत ले० क० पार्कर याला जखम झाली नसती, तर इंग्रज लोक असें देखील ह्मटल्यावांचून राहिले नसते कीं, शहरच्या अधिकाऱ्याचा निरोप आला असतां, आमच्या सैन्यांतल्या शिपायांनीं दुसऱ्या दिवशीं जो हल्ला केला, तो आमच्या हुकुमानें मुळींच केला नाहीं; कांहीं शिपाई आपण होऊनच कोटाकडे गेले व तेथें कांहीं लहानशा कारणावरून पेशव्यांच्या व आमच्या शिपायांची मारामारी जुंपली. पण कर्नेल पार्कर यास जखम झाल्यामुळें असल्या लप्पंछप्पंच्या गोष्टी इंग्रजांना सांगतां येईनाशा झाल्या. शहरच्या अधिकाऱ्याच्या निरोपाप्रमाणें सरळ वर्तन ठेवण्याची इंग्रजांची मुळींच इच्छा नव्हती. कारण वरची गोष्ट झाली त्याच्या दुसऱ्या दिवशीं, खुद्द जनरल गोडर्ड यानें शहराच्या भोंवतालचा कोट पाडण्याकरितां तोफखाना सज्ज केला! कोटावर तोफांचे गोळे जाऊन दणादण आदळूं लागले! जनरल गोडर्डनें कोटाला मोठेसें भगदाड पडेपर्यंत आपला तोफखाना चालविला होता. शहरांत घुसायला चांगली वाट झाली असें जेव्हां गोडर्ड याच्या दृष्टीस पडलें, तेव्हां त्याच्या हृदयांत भूतदयेचा उमाळा आला व त्यानें तोफा सोडण्याचें बंद केलें! अशा प्रकारें अन्यायानें कोट फोडल्यावर, शहरचा पेशव्यांच्या पदरचा अधिकारी, शहर खालीं करून देतो कीं काय तें पाहण्याकरितां गोडर्डनें ह्मणे एक दिवस वाट पाहिली! अशा रीतीनें आपली बाजू स्वच्छ आहे असें दाखविण्याचा प्रयत्न करणारांना धिःकार असो, असें म्हटलें

तर खचित पातक लागणार नाहीं.

फेब्रुवारी महिन्याच्या पंधरा तारखेस जनरल गोडर्ड यानें कोटाला पाडलेल्या भगदाडांतून शहरांत शिरायचें असा निश्चय करून सैन्य तयार केलें. पेशव्यांचें शहराच्या रक्षणाला असलेलें सैन्यही इंग्रजांच्या सैन्याला शहरांत न येऊं देण्याकरितां लढाईच्या तयारीनें येऊन उभें राहिलें. इंग्रजांचें सैन्य आंत जाण्याकरितां त्वेषात्वेषानें त्या लोकांवर हल्ल्यांवर हल्ले करीत होतें, परंतु त्यांनीं इंग्रजांच्या विजयी सैन्याला कित्येक वेळां बोंडें वेंचायला लाविलीं. या सैन्यावर वडगांवच्या लढाईत नांव मिळविलेल्या कर्नल हार्टलेची योजना केली होती पण पेशव्यांच्या शिपायांचें रणकर्म पाहून तोही थक्क झाला. शहरच्या रक्षणाकरितां ठेवलेले लोक थोडे होते, त्यामुळें शेवटीं त्यांचा पराभव होऊन इंग्रज आंत शिरले. इंग्रजांना जय मिळाला ही गोष्ट नवलाची नव्हे. शहरच्या रक्षणाकरितां ठेवलेल्या शिपायांनीं इंग्रजांचे शंभरांवर लोक मारून त्यांच्या अंगाचें पाणी पाणी करून सोडलें, हें वाचकांनीं ध्यानांत ठेवावें.

अमदाबादेस असा प्रकार चालला असतांना, पाटिलबोवा व तुकोजीराव होळकर पुण्याहून पंधरा हजार सैन्य घेऊन आले, अशी बातमी पसरली. वडगांवच्या लढाईंत हे दोघेही मराठे सरदार आपल्या क्षात्र तेजानें चमकत होते आणि त्या लढाईंतून वांचून आलेले कांहीं लोक इंग्रजांच्या सैन्यांत होते. त्यांनीं आपल्या भाईबंदांस त्या लढाईची हकीकत सांगितली होती.

यामुळें शिंदे व होळकर सैन्य घेऊन आले असें कळ-तांच इंग्रजांच्या सैन्याला दहशत वाटूं लागली. त्यां-च्या अंगांत संचरलेला झोटिंग थंड पडूं लागला. मि. बोडाम व मि. रॉबर्ट गांबीर यांनीं पेशव्यांच्या गुजरा-थेंतील मुलखांतलीं ठाणीं उठवून लावण्याच्या संबंधांत जो जुलमी प्रकार चालविला होता तोही कमी कमी होऊं लागला. कारस्थानी मंडळींना पुढें काय करावें याचा विचार पडला. नानांचें व महादजी शिंद्यांचें बरें नाहीं असा इंग्रज कारस्थान्यांचा बळकट समज झालेला होता. यामुळें त्यांना प्रथम भय वाटलें खरें, पण मागून तोंडाला पाणीही सुटूं लागलें. तरी त्यांनीं, पाटील बो-वांनीं या स्वारीवर निघतांना, राघोबादादांच्या संबंधाचा यापुढें तंटा उरूं देणार नाहीं असा पण केला आहे असें जेव्हां ऐकिलें, तेव्हां त्यांच्या छातींत मोठाच धक्का बसला. कारण मराठ्यांत महादजी हा पुरुष बोलल्या-प्रमाणें करून दाखविणारा आहे असें इंग्रजांना पक्कें समजलेलें होतें. याप्रमाणें पाटिलबोवांच्या येण्यानें इं-ग्रज गांगरून गेले असतां त्यांना मद्रासेहून सैन्याची मदत येऊन पोंचली, त्यानें त्यांना बराच धीर आला. या मद्रासेहून आलेल्या सैन्यावर लेफ्टनंट कर्नल ब्रा-ऊन हा मुख्य होता. पाटिलबोवा व तुकोजीराव होळ-कर खानदेशांतून पुढें आले नाहींत, तोंच मि. ब्राऊन आपल्या सैन्यासह सुरतेस येऊन उतरला. असो.

इंग्रज लोक आपल्याला मोठे दयाभूत ह्मणवितात, परंतु स्वार्थापुढें स्वकीयजनांची देखील त्यांना कांहीं किंमत वाटत नाहीं याचें चांगलें उदाहरण या लढा-

ईत दोनदां दृष्टोत्पत्तीस आलें. वडगांवच्या लढाईनंतर राहिलेल्या इंग्रजांच्या सैन्याला पेशव्यांनीं त्यांचे दोन ऑफिसर ओलीस ठेवल्याशिवाय मुंबईस जाऊं दिलें नाहीं हें वाचकांच्या ध्यानांत असेल. यावरून त्या दोघांनीं आपले जीव गहाण ठेवून, आपल्या जातभाईंची सुटका केली असें होत नाहीं काय? त्यांचे त्यांच्या जातभाईवर महदुपकार झाले नाहींत काय? पण त्या दोघांच्या सुटकेकरितां दयाभूत (का कृतघ्न?) अंतःकरणाच्या इंग्रजांनीं काय केलें? इंग्रजांचें स्वार्थाकडे लक्ष होतें तर त्यांनीं स्वार्थ साधायचा होता. पण प्रथम त्यांना सोडवून मग तो साधण्याचा प्रयत्न करणें न्याय्य होतें. परंतु इंग्रजांनीं तसें कांहीं न करितां आपली लढाईची चांगली तयारी करून फिरून पेशव्यांबरोबर लढाई उपस्थित केली. पेशव्यांनीं ओलीस ठेवलेले ते दोन इंग्रज गृहस्थ पाटिलबोवांच्या बरोबर होते. त्यांनीं त्या दोघांना चांगल्या रीतीनें वागविलें होतें, व या स्वारीवर आल्यावर त्यांना सोडून दिलें.

पाटिलबोवांनीं मराठ्यांच्या अथवा हिंदूंच्या उदार स्वभावाला अनुरूप असें जें हें कृत्य केलें, त्याबद्दल इंग्रजांनीं पाटिलबोवांचे जितक्या लीनतेनें आभार मानले पाहिजे होते, तितक्या लीनतेनें आभार मानल्याचें कोठें दिसत नाहीं. मात्र पाटिलबोवांच्या या कृत्यांवरून त्यांनीं आपल्या मनाशीं, पाटिलबोवांचें व नानांचें बरें नाहीं अशी गांठ बांधली आणि ते पाटिलबोवांनीं तह करावा या उद्योगाला लागले. असो. पाटिलबोवा व तुकोजीराव होळकर यांनीं बडोद्यापाशीं आपल्या सै-

न्याचा तळ दिला होता. पाटिलबोवांचीं व इंग्रजांचीं तहासंबंधानें बरींच बोलणीं झालीं. पण त्यांत इंग्रजांना कांहीं फायदा दिसूं न लागल्यामुळें पाटिलबोवांचीं कलमें त्यांना रुचेनात. शेवटीं इंग्रज आपलीं कलमें कबूल करीत नाहींत असें पाहून पाटिलबोवांनीं गोविंदराव गायकवाड याला, तुला गुजराथेचा मालक करितों अशी लालूच लावली. महादजी आपल्या मनाजोगा तह करीत नाहीं आणि त्यानें गोविंदराव गायकवाडाबरोबर राज्यकारस्थान आरंभिलें आहे, असें जेव्हां जनरल गोडर्ड यास समजलें तेव्हां त्यानें आतां व्यर्थ दिवस जाऊं द्यायचे नाहींत, लढाई करायची असा निश्चय केला. ही बातमी पाटिलबोवांस समजतांच त्यांनीं आपलें जड सामान पवनगड किल्यांत पाठवून दिलें व त्याच्या रक्षणाला आपले कांहीं लोक पाठविले, आणि ते गोडर्डची वाट पहात बसले.

जनरल गोडर्ड एप्रिलच्या तिसऱ्या तारखेस रात्रीचे दोन वाजतां आपलें सैन्य घेऊन मराठ्यांच्या सैन्यावर छापा घालण्याकरितां निघाला. अरुणोदयाच्या सुमाराला तो मराठ्यांच्या तळाजवळ गेला. पाटिलबोवांनीं लागलीच लढाईची तयारी करून आपले लोक उभे केले. प्रथम लढाईला इंग्रजांनीं सुरवात केली तेव्हां महादजीनीं आपल्या तोफांचा मारा चालविला. ही लढाई फार वेळ टिकली नाहीं. तरी मराठ्यांचें पुष्कळ नुकसान झालें असें इतिहासकारांचें ह्मणणें आहे. या लढाईत आपला जय झाला असें जनरल गोडर्ड याचें मत होऊन तो आपल्या सैन्याच्या तळावर खुशालींत जाऊन उतरला.

परंतु पाटिलबोवांनीं कोणाचें उसनें ठेवूं नये असा बेत करून, आपलें निवडक सैन्य बरोबर घेऊन जनरल गोडर्ड याच्या छावणीवर हल्ला करून पुष्कळ नुकसान केलें आणि गोडर्ड याजवरही आपल्या शिपाईगिरीची छाप बसविली. पाटिलबोवांच्या या शिपाईगिरीनें गोडर्ड याच्या मनाला चटका लागल्यासारखा झाला व त्यानें मद्रासेहून आलेल्या सैन्याची मदत पोंचतांच तारीख चौदा रोजीं फिरून लढाई दिली. पण ही लढाईही फार वेळ टिकली नाहीं.

याप्रमाणें इंग्रजांच्या भरंवशाचे जनरल गोडर्ड गुजराथेच्या या दुसऱ्या स्वारीवर असतांना दिसावा तसा परिणाम दिसेना आणि तिकडे कोंकणांत मुंबईकरांनीं लढाई चालविली होती तींतही पेशव्यांचें सैन्य हार येईना, तेव्हां मुंबईकरांनीं जनरल गोडर्ड याजबरोबर कोठें तरी एके ठिकाणीं लढाई चालवावी व ती पेशव्यांच्या राजधानीजवळ ह्मणजे कोंकणांत चालवावी अशा प्रकारचें बोलणें चालविलें. जनरल गोडर्ड यास हें एक मोठें संकट येऊन पडलें. मुंबईकरांच्या ह्मणण्याप्रमाणें कोंकणांत लढाई चालविल्यास पेशव्यांची राजधानी जवळ असल्यामुळें मोठा फायदा होण्याचा संभव खरा, पण तसें करणें ह्मणजे हातचें सोडून पळत्याच्या पाठीस लागण्याप्रमाणें होतें. जनरल गोडर्ड यास पुरतेपणीं कळून आलें कीं, गुजराथची लढाई टाकून आपण जर पुढच्या आशेनें कोंकणांत गेलों, तर इकडे आपण जो पेशव्यांचा मुलूख त्यांचीं ठाणीं उठवून हस्तगत करून घेतला आहे, तो आपल्या मागें शिंदे होळकर

फिरून परत घेऊन पूर्ववत् त्यांत पेशव्यांचीं ठाणीं बसविल्यावांचून रहाणार नाहींत. मुंबईकरांचा जेव्हां विशेष आग्रह दिसूं लागला तेव्हां गोडर्ड याची खात्री झाली कीं, यांनीं जी कोंकणांत लढाइ चालविली आहे तींत पेशव्यांचें सैन्य यांना आटपत नाहीं हेंच खचित; तेव्हां आतां जर आपण त्यांचें कांहींच ऐकिलें नाहीं तर फिरून वडगांवची स्थिति येईल आणि इकडे आपल्यावरही त्याचा परिणाम झाल्याशिवाय रहाणार नाहीं. जनरल गोडर्डनें असा विचार करून लेफ्टनंट कर्नल हार्टले याजबरोबर कांहीं सैन्य देऊन त्याला मुंबईकडे पाठविलें. कोंकणांत जें इंग्रजांचें सैन्य लढत होतें त्याला मदतीची इतकी जरूर होती कीं, कर्नल हार्टले जर यावेळीं गुजराथेंतून कोंकणांत न येता, तर इंग्रजांचा मोठाच पराभव होण्याचा संभव होता.

मुंबईकरांनीं कोंकणांत चालविलेल्या लढाईत त्यांच्या हातीं कल्याण लागलें होतें, व घाटावर त्यांनीं दोन तीन ठिकाणीं रस्ते रोखून धरले होते. परंतु पेशव्यांच्या सैन्यानेंच नव्हे, तर कोंकणांतल्या डोंगरांवर शेतें करणाऱ्या कुणब्यांनीं सुद्धां त्यांना इतकें त्रासून सोडलें होतें कीं, त्यांनीं आपल्याला खाण्याकरितां ह्मणून जें आणावें, तें त्यांच्या तोंडांत पडत नसे. सामान संभाळतां संभाळतां त्यांच्या नाकीं नव आले. इंग्रजांनीं कल्याण घेतलें असें नानांना जेव्हां वर्तमान समजलें तेव्हां त्यांना फार वाईट वाटलें. कारण कल्याण हें ठिकाण नानांना फार महत्त्वाचें वाटत होतें व तें तशा जागेवर आहेहि. त्यांनीं इंग्रजांवर कोंकणांत जें सैन्य

पाठविलें त्याला ताकीद दिली होती कीं, कसेंही करून कल्याण आपल्या हातीं ध्या. नानांच्या आज्ञेप्रमाणें पेशव्यांच्या सैन्यानें कल्याण घेण्याचा उद्योग चालविला. त्यांनीं घाटांतल्या लोकांवर हल्ला करून तेथील इंग्रजांच्या सैन्याचा पुरा मोड केला. इंग्रजांच्या सैन्यांतले त्या हल्यांत पुष्कळ लोक मेले व कित्येक जीव घेऊन पळून गेले. पेशव्यांच्या सैन्यानें त्यांच्या तोफा घेतल्या व कांहीं लोक कैद केले. खेरीज या हल्यांत इंग्रजांच्या सैन्यांतले तीन ऑफिसर प्राणास मुकले.

इंग्रजलोक दयाभूत अंतःकरणाचे आपल्याला ह्मणवोत, पण याच्या विरुद्ध पुरावा करणारें उदाहरण मागें सांगिल्याप्रमाणें यावेळीं दुसरें घडून आलें. लढाया उपस्थित करून प्राणनाश करावेत हें मराठे सरदारांना मनापासून आवडत नव्हतें. त्यांनीं वरच्या हल्यांत इंग्रजांच्या सैन्यांतले जे लोक कापले होते, त्यांच्याबद्दल त्यांना वाईट वाटत होतें. कल्याण परत घेतांना यापेक्षां अधिक प्राणनाश होईल, तो न व्हावा या सद्धेतूनें त्यांनीं त्यांच्या हातीं जे गोरे सांपडले होते त्यांतील एकाकडून कल्याण येथें असलेल्या त्याच्या मुख्यास एक पत्र लिहविलें कीं, तुह्मीं जर कल्याण सोडलें नाहींत तर पेशव्यांच्या सैन्यांतलें मुख्य, आह्मी जितके त्यांच्या हातीं लागलों आहोंत तितक्यांचीं डोकीं उडविणार आहेत. इंग्रज लोकांचीं अंतःकरणें दयाभूत असतीं, त्यांच्यांत कांहीं स्वजनप्रेमा असता, तर त्यांनीं आपल्या लोकांच्या सुटकेकरितां

त्यावेळीं कल्याण सोडून दिलें असतें. कारण कल्याणास असलेल्या काप्टन रिचर्ड कांपबेल यास पेशव्यांच्या सैन्याचा झालेला एक कैदी मि. थॉमस फाइफ यानें आपल्या पत्रांत लिहिलें होतें कीं आह्मी फार वाईट स्थितीमध्यें आहोंत. परंतु क्यांबेल यास त्याचें कांहींच वाटलें नाहीं ! या गोष्टीवरून इंग्रजांच्या संबंधाच्या दोन गोष्टींचा बोध होतो. एक स्वजनाविषयींचें नैष्ठुर्य व दुसरी स्वपराक्रमाविषयींची साशंकता. स्वतःच्या पराक्रमाची खात्री आणि स्वजनप्रेमा या जर गोष्टी इंग्रजांत असत्या, तर कांपबेल यानें स्वजनांची सुटका करण्यापुरतें कल्याण सोडून आपल्या पराक्रमानें तें फिरून हस्तगत करून घेतलें असतें. पण त्यावेळीं तसा पराक्रम इंग्रजांत नव्हता हें आतां वाचकांना विशेष विस्तारानें सांगण्याची जरूर उरली नाहीं. जे आपल्या छत्रपती शिवरायांना तो लढवय्या नव्हता असें ह्मणतात, तेच इंग्रज लोक पेशव्यांच्या बरोबर लढाया करितांना शिवरायांना वंदन करूनच कीं काय, त्यांच्या सारखे रात्रीचे छापे घालीत होते हें आतां वाचक विसरणार नाहींत. जनरल गोडर्ड यानें गुजराथेंतून हार्टले यास पाठवून दिलें असें वर सांगितलें आहे. हा इंग्रजांच्या सैन्यांत एक चांगला योद्धा होता. तेव्हां त्याच्या अंगांत तरी सरळ लढाई देण्याची धमक असायची होती. पण तशी धमक नसल्यामुळें, पेशव्यांच्या सैन्याचा विचार कल्याणवर हल्ला करण्याचा चालला असतांना त्यानें मे महिन्याच्या २४ तारखेच्या रात्रीं पेशव्यांच्या सैन्यावर छापा घातला व त्यांची दाणादाण

उडविली. हार्टले याचा निश्चय पेशव्यांच्या सैन्याच्या तोफा घेण्याचा होता, परंतु मरठ्यांनीं तशाही स्थितींत त्या इंग्रजांच्या हातीं लागूं दिल्या नाहींत याबद्दल मराठे शिपायांची तारीफ केली तर ती अप्रासंगिक होणार नाहीं. असो. यानंतर पावसाळा लवकरच लागेल असा सुमार दिसूं लागल्यामुळें, पेशव्यांच्या सैन्यानें कर्नल हार्टले याच्या बरोबर लढाई देण्याचा घाट घातला नाहीं. तथापि त्यानें जो रात्रीं छापा घातला व दाणादाण उडविली ती त्यांच्या मनांत राहून गेली आणि वेळ येईल तेव्हां याबद्दल सूड घेतल्यावांचून राहणार नाहीं असा त्यांनीं निश्चय केला.

तिकडे गुजराथेंत इंग्रजांनीं पेशव्यांचीं ठाणीं उठवून कित्येक ठिकाणीं आपलीं ठाणीं बसविलीं खरीं, पण मराठ्यांनीं त्यांची इतकी दुर्दशा करण्याचा प्रसंग आणला, कीं सैन्यांतील गुरांना वैरण मिळण्याची मारामार पडूं लागली. त्यांना जवळपास वैरण मिळेना. घोडीं, जनावरें वैरणीवांचून उपाशी मरूं लागलीं. फत्तेसिंगाशीं इंग्रजांनीं तह करून घेतला होता, ह्मणून त्यांना लांबून का होईना पण वैरण आणतां आली. मध्यंतरीं मराठ्यांची व इंग्रजांची एक लहानशी चकमक झाली. परंतु तिचें वर्णन करण्यासारखें तींत कांहीं झालें नाहीं. परंतु गणेशपंत या नांवाच्या पेशव्यांच्या सरदारानें कोंकण सोडून जी भरारी मारली तों तो इंग्रजांच्या मुलखांतून नासधूस करीत सुरतेपावेतों गेला. त्यानें इंग्रजांचें पुष्कळ नुकसान केलें. सुरतेच्या भोंवतालून तर त्यानें फारच नाश केला. तो मोठासा फौजबंद होता

अशांतला भाग नाहीं. तरी पण विजयी ह्मणविणाऱ्या इंग्रजांच्यानें दिवसांढवळ्या त्याजवर हल्ला करवला नाहीं. त्याचा मोड करण्याकरितां जनरल गोडर्डनें पाठविलेल्या लेफ्टनंट वेल्शनें एप्रिलच्या २३ तारखेच्या दिवशीं पहाटेस त्याजवर छापा घातला. तो घाईघाईनें उठून आपल्या लोकांस लढाईला तयार करीत असतां, त्याला एक वर्मीं गोळी लागली आणि त्या जखमेनें तो मेला. या छाप्यांत त्याचे शंभरएक लोक मेले व बाकीचे पळून गेले. इंग्रजांनीं त्याचें सामानसुमान सर्व लुटून नेलें. याप्रमाणें गणेशपंताचा मोड केल्यावर लेफ्टनंट वेल्श पुढें दमणपर्यंत गेला व दमणजवळील त्यानें पेशव्यांचे दोन तीन किल्ले घेतले. मुंबईकर इंग्रजांनीं पेशव्यांना बुडविण्याकरितां गुजराथेंत व कोंकणांत लढाया चालविल्या त्यापासून त्यांना थोडासा मुलूख मिळाल्यासारखा वाटला, पण पैसे फार खर्च झाल्यामुळें पैशाची व्यवस्था काय करावी असें त्यांना संकट पडलें. त्यांनीं कलकत्तेकरांपाशीं यासंबंधानें गोष्ट काढली पण कांहीं उपयोग झाला नाहीं. मद्रासकरांच्या मागें हैदराचा ससेमिरा होता तेव्हां त्याजकडूनही मदत मिळण्याचा संभव नव्हता. शेवटीं कंपनीजवळ दहाबारा लाखांचें तांबें होतें तें गहाण ठेवण्याची पाळी आली. तरी मुंबईकरांनीं पैसे मिळविण्याची एक युक्ति काढली. ती युक्ति शत्रूचा दाणा, वैरण, खजिना हीं लुटण्यापलीकडे दुसरी कोणती नव्हती. छत्रपतींना लुटारू ह्मणणाऱ्या नीतिमान् इंग्रज लोकांनीं पैसे मिळविण्याकरितां काढलेली ही युक्ति, हें वा-

चकांनीं ध्यानांत ठेवावें आणि मग त्यांच्यामागें किती गोडवीं विशेषणें लावायचीं असतील तीं लावावींत.

पावसाळा संपतांच मुंबईकरांनीं कोंकणांत लढण्याची मोठी तयारी केली. जनरल गोडर्डनें आपलें कांहीं सैन्य समुद्रांतून वसईचा किल्ला घेण्याकरितां पाठविलें. लेफ्टनंट कर्नल हार्टले याच्या हाताखालीं पुष्कळ सैन्य देऊन त्याला पेशव्यांचीं ठाणीं उठवायला, कोंकणांत असलेल्या पेशव्यांच्या सैन्याला कोंकणांतून पिटाळून लावायला आणि मुंबईकरांच्या वसूल करणाऱ्या कामदारांना मदत करायला सांगितलें. काप्टन अबिंग्टन मलंगडाच्या जवळ, तो घेण्याच्या खटपटींत होता त्याच्या मदतीला काप्टन जेम्सन यास सैन्य देऊन पाठविलें. याप्रमाणें पावसाळा संपतांच इंग्रजांनीं जारीची तयारी केली. नाना इंग्रजांच्या बरोबर लढाई देण्याच्या विचारांत होतेच, परंतु त्यांच्याकडून वेळेला व्हावी तशी सैन्याची तयारी झाली नाहीं. तथापि कोंकणांत जें पेशव्यांचें सैन्य होतें, तें इंग्रजांच्या कटाचा तयारीला भिऊन स्वथ बसलें नव्हतें. त्यानें आपल्याकडून होईल तितकी इंग्रजांच्या विचारांत व्यत्यय आणण्याची खटपट चालविली होती. त्यानें कर्नल हार्टले यास एकदां गांठून त्याजबरोबर दोन हात केले. मलंगड याच्या पायथ्याशीं तर त्यानें कर्नल हार्टले, काप्टन अबिंग्टन, काप्टन जेम्सन, मेजर हाप्किन्स इतक्यांच्या बरोबर मोठ्या छातीनें एक लढाई दिली. ही लढाई मोठ्या शहाणपणानें करण्याचा त्यांनीं घाट घातला होता. आणि त्यांच्या विचाराप्रमाणें

लढाईला स्वरूप आलें असतें, तर त्यांनीं इंग्रजांना अडचणीच्या जागीं नेऊन त्यांजवर निकराचा मारा करून त्यांना दांतीं तृण धरायला लाविलें असतें. परंतु ईश्वराच्या मनांतून तसें नसल्यामुळें त्यांच्या विचाराप्रमाणें इंग्रज अडचणीच्या जागीं गेले नाहींतच, पण लढाईच्या गर्दींत मराठ्यांनाच त्या जागीं जावें लागलें व त्यामुळें पळण्यावांचून त्यांना दुसरा मार्ग उरला नाहीं. इंग्रजांना जसा या लढाईत जय मिळाला तसें कर्नल हार्टले यानें मनांत आणलें कीं, आपलें सैन्य विजयानें आनंदलें आहे तोंच त्यांजकडून आणखी कामगिरी घेतल्यास ते ती खुषीनें करतील. त्यानें आपल्या लोकांस स्वस्थ बसूं न देतां पेशव्यांच्या पराभव पावलेल्या सैन्याचा पाठपुरावा चालविला आणि त्याला घाटाच्या पलीकडे पळवून लाविलें. कर्नल हार्टले यानें यावेळीं जो शहाणपणा केला त्यानें मुंबईकर इंग्रजांना त्यांच्या मताप्रमाणें कांहीं वेळ कोंकणचा वसूल करायला निर्धास्त सांपडलें.

तिकडे गुजराथेंत प्रत्येक ठिकाणीं प्रांताच्या रक्षणाकरितां थोडें थोडें सैन्य देऊन अक्टोबरच्या सोळा तारखेला कर्नल गोडर्ड सुरतेहून निघाला. तो नोव्हेंबरच्या तेरा तारखेला वसई येथें येऊन पोंचला. त्यानें स्वतः किल्ला पाहिल्यावर त्याची खात्री झाली कीं किल्ला घ्यायला अवघड आहे. तेव्हां तो निरनिराळ्या माऱ्यांचे मोर्चे बांधून त्याजवर तोफा चढविण्याच्या उद्योगाला लागला. गोडर्डनें किल्ला घेण्याकरितां आणलेलें सैन्य व पेशव्यांचें किल्याच्या रक्षणाला असलेलें

सैन्य या दोहोंत फार अंतर होतें. किल्याच्या रक्षणा-
पुरता वर दारूगोळाही नव्हता आणि तोफा वगैरे ह-
त्यारेंही पण नव्हतीं. अशा स्थितींतला किल्ला घ्यायला
गोडर्ड करीत होता एवढ्या तयारीचें कांहीएक का-
रण नव्हतें. असो. मध्यंतरीं एकदां वाचकांना कर्नल
हार्टलेकडे नेलें पाहिजे. तो मराठ्यांच्या सैन्याला घा-
टाखालीं पळवून लावून बोरघाटांत तोंड धरून बसला
होता. त्यानें मे महिन्याच्या २४ व्या तारखेस रात्रीं
मराठ्यांच्या सैन्यावर छापा घालून जी त्यांची दाणा-
दाण उडविली होती ती ते विसरले नव्हते. त्याजबद्द-
लचा सूड त्यांना घ्यायचा होता. तो त्यांनीं हार्टले
बोरघाटांत असतांना चांगला घेतला. हार्टले याजवर
हल्ले करकरून त्याला त्यांनीं अगदीं गाय बनविलें.
त्याच्या सैन्यांतील शेंकडोंशें लोक जखमा लागून मृ-
त्युपंथाला लागले. मराठ्यांच्या सैन्याचा घास, दाणा,
व खजिना लुटण्याचा इंग्रजांनीं विचार केला होता.
त्यांना तें करतां आलें नाहींच. पण मराठ्यांनीं हार्टले-
च्या सैन्याला इतकें नागविलें, कीं त्यांना खाण्याची
पंचाईत पडण्याचा प्रसंग आला. मुंबईकर इंग्रजांची
हार्टलेवर मोठी भिस्त होती. त्यांना वाटत होतें कीं,
हा आपला योद्धा पेशव्यांच्या सैन्याला कोंकणांत येऊं
देणार नाहीं आणि सर्व कोंकण आपल्याला मिळवून
देईल. आणि ते हार्टलेला वरचेवर या दोन्ही गोष्टी
करण्याबद्दल लिहीत होते. पण त्या बिचाऱ्याचें आप-
लें रक्षण करितां करितां कंठीं प्राण आले होते. तो
नेटदार होता, विलक्षण धाडसी होता ह्मणून एक म-

हिनाभर मराठ्यांचा मार खात आपली जागा धरून बसला होता. दुसरा कोणी असता तर कधींच मराठ्यांना भिऊन मुंबईस पळून गेला असता. शेवटीं मार घेण्याची देखील अंगांत ताकद उरली नाहीं असें जेव्हां त्याला दिसून आलें, तेव्हां त्यानें आपल्या वरिष्ठांच्या ह्मणजे मुंबईकर इंग्रजांच्या सांगण्याकडे लक्ष न देतां, मराठ्यांचें सैन्य वसईकडे फार चाललें आहे, तिकडे मीं गेलों नाहीं तर आपल्यावर भयंकर प्रसंग गुदरेल असें कारण योजून एके दिवशीं बोरघाटांतला आपला तळ हालवला व तो मराठ्यांच्या मारांतून मुक्त झाला. हार्टलेच्या मागोमाग पेशव्यांचें सैन्य कोंकणांत उतरलें. पेशव्यांचा एक सरदार रामचंद्र गणेश यानेंच हार्टले यास सळोकांपळो करून सोडलें होतें. त्यानें हार्टलेला वाटेंत गांठलें व एक लढाई दिली. त्या लढाईंत तो पडला व त्यामुळें पेशव्यांचें सैन्य पुढें लढाई करायची सोडून मागें फिरलें. याच सुमारास तिकडे जनरल गोडर्डनें वसईचा किल्ला हस्तगत करून घेतला व तो हार्टलेच्या मदतीला आला. परंतु हार्टलेनें नुक्ताच मिळविलेला जय ऐकून त्याला फार आनंद झाला. हार्टलेनें वडगांवच्या लढाईंत जें शौर्य गाजविलें होतें, त्यावरून इतरांचे हक्क मागें टाकून त्याला कर्नल केलें होतें. पण याच्या बढतीनें ज्यांचे हक्क बुडाले त्यांनीं कोर्ट ऑफ डायरेक्टरकडे एक तक्रारीचा अर्ज केला. त्याचें उत्तर या सुमारास आलें, आणि त्यांत ज्यांचे हक्क बुडाले होते ते त्यांचे त्यांस द्यावेत असें लिहिलें होतें. हार्टले यास वाईट वाटून त्यानें आपल्या नौकरीचा

राजीनामा दिला व तो आपला हक्क भांडून घेण्याकरितां इंग्लंडमध्यें गेला. हार्टलेसारखा खंबीर योद्धा गेल्यामुळें इंग्रजांच्या सैन्यांतील लोकांना चटपट लागली.

हैदर, निजाम, पेशवे आणि इतर सर्व मराठे सरदार यांचा बेत सर्व हिंदुस्थानभर आपल्या बरोबर लढाई सुरू करून आपल्याला हिंदुस्थानांतून घालवून द्यायचें असा चालला आहे, अशी बातमी याच्या अगोदर कांहीं दिवस कलकत्तेकरांना समजली. सर्वांनीं एकदम आपल्यावर शस्त्र उचलल्यावर आपला एक दिवस देखील हिंदुस्थानांत निभाव लागायचा नाहीं, असें कलकत्तेकरांच्या मनांत येऊन त्यांनीं, मुंबईकरांनीं चालविलेली लढाई बंद करवून पेशव्यांबरोबर तह करण्याच्या नादीं लागावें हें स्वाभाविक आहे. कलकत्तेकरांनीं पेशव्यांच्या बरोबरची लढाई एकदम बंद करा असा हुकूम पाठविला. मुधोजी भोसले आपल्या तंत्रानें चालणारा आहे असा कलकत्तेकरांचा समज होता व ह्मणून त्यांनीं मुधोजीच्या मध्यस्तीनें तह करण्याचा बेत केला. त्यांनीं आपलें सर्व ह्मणणें एक पत्र पाठवून मुधोजीला कळविलें; पण दोन महिने झाले तरी मुधोजीनें कलकत्तेकरांना त्याचें उत्तर पाठविलें नाहीं. त्यांनीं पेशव्यांकडेही तहाची नक्कल पाठविली होती. पण त्यांनीं घातलेलीं कलमें नानांना पसंत नसल्यामुळें नानांनींही कलकत्तेकरांना उत्तर पाठविलें नाहीं. मध्यंतरीं कांहीं दिवस दम खाऊन जनरल गोडर्ड फिरून कोंकणांतील लहानसहान किल्ले घेण्याची खटपट करूं लागला. नानांचें कलकत्तेकरांना कांहीं उत्तर गेलें नाहीं, तसें त्यां-

नींही मुंबईकरांना पेशव्यांच्या बरोबर जोरानें लढाई चालविण्याविषयीं लिहिलें. तेव्हां गोडर्ड यानें पुण्याकडे वळण्याचा विचार ठरविला. हरिपंततात्या इतके दिवस कोंकणांत होते ते बोरघाटाचें रक्षण करण्याकरितां कांहीं सैन्य ठेवून पुण्यास गेले. जनरल गोडर्डनें कर्नल पारकर यास पुढें पाठवून बोरघाटांत असलेल्या मराठ्यांच्या सैन्यावर हल्ला करावयास सांगितलें. त्यानें जो मराठ्यांवर घाटांत हल्ला केला तो दिवसां केला नाहीं. मराठ्यांचे लोक निजले आहेत अशा सुमाराला रात्रीच्या वेळीं पारकरनें छापा घातल्यामुळें त्याला आपल्या लोकांसह पुढें जातां आलें. त्यानें काप्टन स्टुअर्ट यानें ज्या जागीं तळ दिला होता त्याच जागेवर आपला तळ दिला. तेथें तळ दिल्यावर त्याला गोडर्डनें मागून पाठविलेली आणखी मदत येऊन मिळाली. याप्रमाणें सैन्य पुढें पाठविण्यांत गोडर्डचा हेतु असा होता कीं, पेशव्यांची नाना वगैरे मंत्री मंडळी भिऊन जाईल. परंतु तसें कांहीं झालें नाहीं. नानांना इंग्रजांचें सैन्य जवळ आलें याचें कांहींच वाटलें नाहीं. कारण त्यांनीं लढाईची तयारी चालविली होती आणि त्यांना पूर्वीं जितकें इंग्रजांचें भय वाटत असें, तितकें इंग्रजांबरोबर बऱ्याच चकमकी उडाल्यामुळें वाटेनासें झालें होतें. तरी आपल्याला तयारीला आणखी कांहीं दिवस मिळावेत अशा मतलबानें त्यांनीं जनरल गोडर्डकडे एक मनुष्य तहाचें बोलणें करण्याकरितां ह्मणून पाठवून दिला. गोडर्डचें व त्या मनुष्याचें बरेंच बोलणें झालें. पण तह करून स्नेह जोडावा अशी दोघांचीही मना-

पासून इच्छा नसल्यामुळें थोडेसे दिवस शांततेंत जाण्यापलीकडे याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं.

या फुरसतींत नानांनीं आपल्या सैन्याची पुरी तयारी केली. कलकत्तेकर इंग्रजांनीं शिंद्यांच्या मुलखांत त्रास दिला होता, यामुळें पाटिलबोवांना पेशव्यांच्या मदतीला यावेळीं येतां आलें नाहीं. नानांनीं परशुरामभाऊंना त्यांच्याबरोबर दहा हजार सैन्य देऊन इंग्रजांनीं कोंकणांतलीं जीं ठाणीं उठविलीं होतीं, तीं फिरून बसविण्याकरितां कोंकणांत पाठविलें. परशुरामभाऊ कोंकणांत शिरतांच त्यांनीं इंग्रजांचीं ठाणीं उठविण्यास सुरवात केली. नानांनीं सवाईमाधवरावसाहेबांना पुरंदरास पाठविलें आणि ते हरिपंततात्या व तुकोजीराव होळकर यांच्या बरोबर घाटावर आले. परशुरामभाऊंनीं काप्टन माके हा पनवेलीहून आपल्या सैन्याचें धान्य घेऊन जात असतां त्याजवर हल्ला करून त्याजबरोबरचें धान्य पुष्कळ लुटलें व त्याच्या बरोबरच्या शिपायांना जखमी केलें. यांतून मोठ्या शर्तीनें बचावून तो पुढें पांच सहा कोस गेला असतां भाऊंनीं फिरून त्याला गांठलें व त्याजवर झपाट्यानें हल्ला केला. या हल्याच्या वेळीं इंग्रजांचे शिपाई बरेच लढले. परंतु भाऊंनीं त्यांचे पुष्कळ हाल केले. शेवटीं काप्टन माके हा कोंकणच्या डोंगरी वाटेचा विचार न करितां आपल्या जखमी लोकांना घेऊन रात्रीचा पडत झडत भाऊंच्या भयानें दूर निघून गेला. पुढें त्यास जनरल गोडर्डनें पाठविलेली मदत येऊन मिळाली तेव्हां त्याच्या अंगांत थोडा जीव आला. पण इतक्यांत, नाना, हरि-

पंततात्या व तुकोजीराव होळकर बरोबर मोठें सैन्य घेऊन लढण्याकरितां आले आहेत हें वर्तमान इंग्रजांस समजलें. हें वर्तमान ऐकून जनरल गोडर्ड याची कंबरच खचली. कारण परशुरामभाऊंनीं कोंकणांत पेशव्यांचीं ठाणीं फिरून बसवीत आणलीं होतीं. मद्रासकरांनीं गोडर्डच्या मदतीला जें सैन्य पाठविलें होतें, तें तिकडे हैदरानें इंग्रजांचा पुष्कळ नाश केल्यामुळें त्यांनीं परत बोलाविलें. घाटाचें रक्षण करण्याकरितां गोडर्डनें जें सैन्य ठेवलें होतें, त्याजकडून घाटाचें रक्षण होईना. हा इकडचा सर्व प्रकार कलकत्तेकरांना वेळोवेळीं कळत असल्यामुळें, इतके श्रम होऊन, पुष्कळ पैसा खर्च होऊन, ह्मणण्यासारखा कांहीं फायदा झाला नाहीं असें त्यांना वाटूं लागलें. आणि त्यांनीं पेशव्यांबरोबर पुढें लढाई न चालवितां तह करावा असें लिहिलें. कलकत्तेकरांना वाटत होतें कीं, पेशव्यांनीं जरी आपला पुष्कळ नाश केला तरी तेही एकसारखी लढाई चालवावी लागल्यामुळें जेरीस आले असतील. त्यांनीं पुढें जी लढाई चालविली आहे ती आह्मीं लढतों आहोंत ह्मणून चालविली असेल. त्यांच्यांत आतां लढण्याचा दम उरला नसेल. तेव्हां ते आतां तह करण्यास खुषीनें कबूल होतील. कलकत्तेकरांना पेशव्यांचा प्रत्यक्ष अनुभव नसल्यामुळें असें वाटत होतें. जनरल गोडर्ड प्रथम गुजराथेंत आला तेव्हां त्याचीही पेशव्यांविषयींची कल्पना अशीच झाली होती. परंतु कोंकणांत आल्यावर त्याला खरा प्रकार कळून आला. आपण आजवर केल्या या लढायांनीं गुजराथेंतला व कोंकणांतला

कांहीं मुलूख व कांहीं किल्ले आपल्या हातीं लागले आहेत, पण त्यांची अवस्था पाण्यावरच्या बुडबुड्या-प्रमाणें आहे. पेशव्यांनीं मनांत आणून तशीच जोराची तयारी केली, तर ते चार दिवसांत गेलेलें परत मिळविल्यावांचून रहाणार नाहींत. ते आमच्या लढायांनीं जेरीस आले आहेत असें मुळींच नाहीं. आणखी चार वर्षे जरी आह्मी लढलों तरी पेशव्यांना त्याचा शीण येणार नाहीं. हें गोडर्ड यांस अनुभवानें पक्कें कळलें असल्यामुळें, कलकत्तेकर ह्मणतात तशा प्रकारचा तह करण्यास पेशवे कबूल होणार नाहींत व आपण लढाई पुढें चालवावी तर त्यांचा रोष होईल अशा पेंचांत गोडर्ड सांपडला. काय करावें, हें त्याला सुचेनासें झालें. जी गोडर्डची स्थिति तीच मुंबईकरांची स्थिति. शेवटीं पुष्कळ विचार करून मुंबईकरांनीं गोडर्ड याच्या विचारानें, पेशव्यांचें सैन्य येऊन धडकलें आहे त्या अर्थीं त्याजबरोबर निकराची लढाई करावी, मग काय होईल तें होवो असा निश्चय केला.

कोंकणांत परशुरामभाऊंनीं आपल्या सैन्याला एक दिवस देखील स्वस्थ बसूं द्यायचें नाहीं असा जणोकाय निश्चय केला होता. कोंकणांतली इंग्रजांची चळवळ त्यांनीं बंद पाडल्यासारखी केली. दहा रुपयांच्या कामाला, सैन्यांतले शंभर लोक पाठविल्यावांचून तें इंग्रजांना कोंकणांत करितां येईनासें झालें. भाऊंनीं इंग्रजांच्या सर्व प्रकारच्या चळवळीवर आपलें लक्ष ठेविलें होतें. ते त्यांना घायाळ केल्याशिवाय फिरकूं देत नसत. भाऊंनीं काप्टन माकेची त्रेधा उडविली, तेव्हां

पनवेलीहून दुसरे वेळीं सैन्याला धान्य, इतर सामान, व बैल वगैरे आणण्याकरितां,गोडर्डनें लढाईची तयारी करून द्यावी, त्याप्रमाणें लेफ्टनंट कर्नल ब्राऊन याज-बरोबर तयारी करून दिली ! अशा मोठ्या तयारीनें जरी लेफ्टनंट कर्नल ब्राऊन पनवेलीहून सामान घेऊन चालला, तरी भाऊनीं त्याजवर हल्ला करून त्याचें सामान लुटण्याचा विचार केलाच. मात्र हल्ला कर-ण्यापूर्वीं त्यांनीं ब्राऊन बरोबर सैन्य पुष्कळ आहे हें पाहून, नानांच्याकडे आपल्याला मदत पाठवून देण्या-विषयीं लिहिलें. इंग्रजांना, भाऊ आपल्यावर वाटेंत हल्ला केल्याशिवाय रहाणार नाहींत हें पक्कें माहीत असल्यामुळें, त्यांनीं आपल्या सामानाचें संरक्षण फार दक्षतेनें चालविलें होतें. पण भाऊंनीं त्यांच्यावर एक-दम हल्ला करून, त्यांच्या तोंडचें पाणी पळविलें. इं-ग्रज यावेळीं चांगल्या लढाईच्या तयारीनें होते. त्यां-चा मुख्य, बराच प्रसिद्धीस आलेला लेफ्टनंट कर्नल ब्राऊन हा होता. त्यांचें सगळें कवाइती सैन्य होतें. पण भाऊंनीं आपल्या बिन कवाईतीच्या सैन्याकडून इंग्र-जांची इतकी त्रेधा उडविली, कीं त्यांचे जीव, सामान संभाळतां संभाळतां मेट्याकुटीस आले. इतकेंही करून त्यांच्यानें त्यांच्या सामानाचें रक्षण झालें नाहींच. मराठ्यांनीं त्यांचे बहुतेक बैल व कांहीं सामान पाहतां पाहतां लांबवलें ! इंग्रजांप्रमाणें, भाऊंनीं ब्राऊनवर रा-त्रीं छापा घातला नाहीं. भर दिवसां त्यांच्यावर हल्ला करून त्यांना दे माय धरणी ठाव करून सोडलें. या पहिल्या हल्ल्यांत भाऊंनीं इंग्रजांची अशी त्रेधा उड-

विली, तेव्हां त्यांनीं मुंबईहून आपल्याला आणखी मदत आणविली. इकडे परशुरामभाऊंच्या मदतीला होळकराला नानांनीं पाठवून दिलें. तेव्हां दोघांनीं मिळून सामान नेत असलेल्या इंग्रजांवर दुसरा हल्ला केला. यावेळीं इंग्रज फार व्यवस्थेनें होते. त्यांनीं लागलींच लढाई देण्याचा घाट घातला. पण मराठ्यांच्या जवळ तोफा वगैरे नसल्यामुळें, त्यांनीं हल्ल्यांत मिळाली तेवढी लूट मिळवून आपला रस्ता धरला. आणि या पुढें, परशुरामभाऊ व तुकोजीराव होळकर असे दोघे मिळून दोन तीन दिवस लागोपाठ इंग्रजांवर हल्ले करून त्यांच्यापैकीं कित्येकांचे प्राण घेत, कित्येकांना जखमी करीत आणि इंग्रजांच्या कवाइती सैन्याला लाज उत्पन्न व्हावी, अशा प्रकारें कांहीं लूट उचलून पाहतां पाहतां दिसतनासे होत. या एकंदर हल्ल्यांत मराठ्यांनीं इंग्रजांचें फार नुकसान केलें. इंग्रजांच्या सैन्यांतले पांच ऑफिसर मेले व शंभर लढाऊ शिपाई मेले, हें इतिहासकार कबूल करीत आहेत हें वाचकांनीं लक्षांत ठेवलें पाहिजे. या हल्ल्यांत इंग्रजांच्या सैन्यांत जखमी पुष्कळ झाले. ज्यांच्यावर साखर लादली होती, असे बैल मराठ्यांनीं इंग्रजांच्या सैन्यांतून दीडशें नेले. याखेरीज ज्यांच्यावर कांहीं लादलें नव्हतें असे बैल पुष्कळच आणले. याखेरीज इतर सामानही बरेंच सांपडलें. विजयी ह्मणविणाऱ्या इंग्रजांवर मराठ्यांनीं दिवसां ढवळ्या हल्ले करून त्या हल्ल्यांत त्यांचे दोन लेफ्टनंट, एक काप्टन व आणखी दोन निराळे ऑफिसर मारावेत, इतर सैन्याची गाळण उडवावी,

सामान लुटावें, हा चमत्कारच समजला पाहिजे! पेशवे चांगल्या तयारीनें आले आहेत असें पाहून जनरल गोडर्ड यानें लढाई देण्याची तयारी चालविली. कोंकणांत घाटाच्या पायथ्याशीं, तो आपल्या समजुतीनें मोठ्या गुप्त रीतीनें तोफा, दारुगोळा वगैरे पाठवूं लागला. आपण काय करीत आहोंत याची माहिती मराठ्यांना मुळीं देखील समजत नाहीं अशी त्याची पक्की समजूत होती. परंतु परशुरामभाऊंना गोडर्डच्या सैन्यांत काय काय होई तें जसेंच्या तसें समजत असे. ते गोडर्डचीं सर्व कृत्यें पाहत होते. नाना, हरिपंततात्या, परशुरामभाऊ व तुकोजीराव होळकर यांनीं, जनरल गोडर्ड आपलें सर्व सैन्य घेऊन निघाला म्हणजे, त्याजवर तिघांनीं तिहींकडून हल्ले करावयाचें असें ठरविलें. आणि त्याप्रमाणें त्यांनीं तीन जागा धरल्या. तुकोजीराव आपल्या सैन्यासह कासार घाटाच्या पायथ्याशीं उभा राहिला. परशुरामभाऊंनीं भीमाशंकराखालील घाटाचा तळ धरला आणि नाना व हरिपंततात्या इंग्रजांच्या सैन्याच्या समोर घाटावर आपलें सैन्य घेऊन पुढें येऊं लागले. हरिपंततात्यांनीं त्याचें सैन्य चाललें असतां, त्याच्यावर जोराचा हल्ला केला. या हल्ल्यांत तात्यांनीं आपलें शौर्य आणि सेनाधिपतित्वाची कला चांगली दाखविली. त्यांनीं इंग्रजांच्या सैन्यांतील शिपायांचा प्राणनाश जितका केला, त्यापेक्षां सर्व तऱ्हेच्या सामानाची लूट मोठी केली. तुकोजीराव होळकर व परशुरामभाऊ यांनींही तात्यांना फार मदत केली. या हल्ल्यांनीं इंग्रजांचें सैन्य अगदीं जेरीस आलें. हे ह-

ल्ले संपल्यावर, गोडर्डनें त्या दिवशीं आपल्या सैन्याचा तळ खालापूर येथें दिला. दुसरे दिवशीं सकाळीं गोडर्डनें खालापूरचा तळ हालविला व तो पुढें चालूं लागला. त्याबरोबर हरिपंततात्यांनीं चांगली जागा गांठून गोडर्डवर हल्ला केला. तात्यांच्या पाठोपाठ परशुरामभाऊ व तुकोजीराव होळकर इंग्रजांवर पडले. यावेळीं इंग्रजांचें सैन्य खळग्यांत सांपडलें होतें, आणि मराठ्यांच्या सैन्याला अशा जागा मिळाल्या होत्या कीं, इंग्रजांच्या सैन्यांतून येणाऱ्या गोळ्या झाडेंझुडपें व खडकाचे कपारे यांच्यामुळें मराठ्यांना लागूं नयेत. मराठ्यांनीं इंग्रजांना, अशा जागांचा फायदा घेऊन गांठल्यामुळें त्यांनीं इंग्रजांच्या सैन्याचा नाश अतिशयींत केला. ही लढाई सकाळीं सात वाजल्यापासून दुपारीं एकवाजेपर्यंत झाली. गोडर्डनें एक वाजल्यावर, भोंवताली तोफा पसरून तळ देण्याकरितां तंबू ठोकण्यास सुरवात केली, तसा हरिपंततात्यानीं आपल्या सैन्याचा तळ खालापूर येथें दिला, व परशुरामभाऊ आणि होळकर यांनीं आपले तळ इंग्रजांच्या सैन्यापासून फार दूर नाहींत अशा ठिकाणीं दिले. दुसरे दिवशीं गोडर्डनें आपला तळ हालविला नाहीं व त्यामुळें, त्या दिवशीं मराठ्यांना गोडर्डच्या सैन्यावर चांगलेसे हल्ले करण्यास सांपडावी तशी जागा सांपडली नाहीं. त्या दिवशीं रात्रीं दोन वाजतां गोडर्डनें आपल्या बरोबरचें सर्व सामान मराठ्यांना मुळींसुद्धां कुणकुण न कळूं देतां पुढें पाठविलें. यामुळें तेविसाव्या तारखेस त्याला आपला तळ झटदिशीं हालवितां आला.

आणि मराठ्यांनीं मध्यंतरीं हल्ले केले असतां इंग्रजांना आपले जीव सभाळून लवकर पळता आले. तरी एका हल्यांत मराठ्यांनीं लेफ्टनंट कर्नल पार्कर याच्या टोळीवर निकर करून तिची दाणादाण उडविली, आणि कर्नल पार्कर यास मृत्युमुखीं पाठविलें. यादिवशीं जनरल गोडर्डचें सैन्य पनवेलीस जाऊन पोंचलें आणि इंग्रजांच्या व पेशव्यांच्या लढायासंपल्या. या लढायांत इंग्रजाकडली पेशव्यांना लूट मोठी मिळाली व हरिपंततात्यांच्या ह्मणण्याप्रमाणें पंधराशे लोक प्राणास मुकले. इंग्रज इतिहासकार इतके लोक मेले नाहींत ह्मणतात. जखमी झालेल्यांची व मेलेल्यांची एकंदर संख्या चारशे सहासष्ट होती असें त्यांचें ह्मणणें आहे. याच्या खरेंखोटेपणाबद्दल अधीक चर्चा करण्यांत कांहीं मतलब नाहीं. परंतु एवढी गोष्ट खरी आहे कीं, पेशव्यांनीं जनरल गोडर्ड याच्यावर जे हे जय मिळविले, त्यांनीं कलकत्तेकर इंग्रजांना पाटीलबोवांच्या मध्यस्तीनें सालबाईचा तह करणें भाग पाडलें. हा तह होण्याच्या अगोदर, मध्यंतरीं एकदां जनरल गोडर्ड यास पेशव्यांच्या बरोबर फत्तेसिंगाचें साह्य घेऊन निकराची लढाई करण्याची उकळी फुटली होती. परंतु विचाराअंतीं त्याचें त्यासच कळून आलें कीं, पेशव्यांच्या बरोबर चांगली लढाई करायची ह्मणजे मुंबईकर इंग्रजांपाशीं पैशाचा भरपूर पुरवठा पाहिजे. तसा मुंबईकरांपाशीं पैशाचा भरपूर पुरवठा नसल्यामुळें विजयी ह्मणविणाऱ्या गोडर्डास शेवटीं अपयशाचाच स्वीकार करावा लागला. सालबाईच्या तहांत साष्टी शिवाय क-

रून इंग्रजांनीं पेशव्यांचा सर्व मुलूख पेशव्यांस परत दिला. पाटिलबोवांना भडोच व त्याच्या भोंवतालचा मुलूख इंग्रजांनीं दिला, या तऱ्हानें पेशव्यांनीं राघोबादादास पंचवीस हजार रुपये महिना देण्याचें ठरलें. असो.

ह्या ज्या पेशव्यांच्या व इंग्रजांच्या लढाया झाल्या त्यांवरून या वेळीं पेशव्यांची शक्ति इंग्रजांपेक्षां पुष्कळ अधीक होती, हें स्पष्ट होत आहे. तथापि ही वेळ संक्रमणाची होती, यांत शंका नाहीं. नाना विलक्षण डोक्याचे होते, इंग्रजांना त्यांची दहशत वाटत होती व दहशत वाटण्यासारखे ते कर्तबगार होते या गोष्टी जरी अक्षरशः खऱ्या असल्या,तरी त्यांची स्वतःविषयींची महत्वाकांक्षा वाजवीपेक्षां अधीक असल्यामुळें पेशव्यांच्या शक्तीला ऱ्हास लागत चालला होता. सखारामबापूंसारख्या राज्यकारस्थान्यांना, नानांनीं ज्याप्रमाणें किल्ले दाखविले, त्याप्रमाणेंच राघोबाच्या पक्षाचे ह्मणून कित्येक तलवारबहाद्दर मराठे सरदार नानांनीं नाहींसे केले ! याचा वाईट परिणाम हरिपंततात्या फडके जिवंत होते तोंपर्यंत पेशवाईवर झाला नाहीं. पण पुढें फारसे दिवस लागले नाहींत ! पेशव्यांच्या पदरीं पहिल्याप्रमाणें जर फौजबंद शूर सरदार असते, राघोबाच्या भाऊबंदकीमुळें जुटींत जी फूट पडली ती न पडती, तर पेशवाई इतक्या जलदीनें नामशेष झाली नसती असें पुष्कळांचें मत आहे. असो. वरच्या लढायांवरून मराठे शिपायांत शौर्य कमीं नव्हतें इतकें वाचकांस समजलें ह्मणजे पुरें आहे.

# शिवचरित-उत्तरार्ध.



शिवरायांच्या रमणीय चरित्राचा उत्तरार्ध लिहि-
ण्याला सुरवात करण्यापूर्वी, त्यांच्या विषयीं महारा-
ष्ट्रीयांत आतां जी भक्ति उत्पन्न झाली आहे, तिजबद्दल
आनंद प्रदर्शित केल्यावांचून राहवत नाहीं. ज्या वेळीं
शिवरायांच्या चारित्राचा पूर्वार्ध स्वदेशबंधूंच्या पुढें ठे-
विला, त्यावेळीं इतक्या अल्पकालांत महाराष्ट्रीयांत शि-
वरायांच्या संबंधाचा इतका अभिमान उत्पन्न होईल,
शिवरायांचे, लोक जन्मोत्सव करूं लागतील, शिवराय-
गुणवर्णनपर कथा करतील, काव्यें करून गाऊं लाग-
तील, शिवरायांचा प्रसाद प्रेमानें बंधुवर्गांत वाटतील,
शिवरायांच्या उत्सवमंडपांत त्यांच्या आवडीचे मर्दु-
मकीचे खेळ खेळतील, त्यांचे छबीने काढतील अशी
कल्पना देखील झाली नाहीं! असें असतांना दीड वर्षा-
च्या अवधींत सर्व महाराष्ट्रीयांना ही जी स्फूर्ति झाली,
ती केवळ जगच्चालकाचीच कृपा होय; व त्याच जग-
च्चालकाच्या कृपेनें, शिवरायांच्या चरित्राची महारा-
ष्ट्रीयांनीं पारायणें केल्यास, ते पूर्ववत वैभवशाली हो-
तील अशी खात्री वाटत असल्यामुळें, शिवरायांचें च-
रित्र लिहिण्याविषयीं विशेष उल्हास वाटत आहे.
लिहिणाराची भाषा वेडी वागडी असली, तरी शिवरा-
यांच्या चरित्रांत विलक्षण माधुरी असल्यामुळें तें वा-
चकांस प्रियच होईल. आणि त्याच्या वाचनापासून वा-

चकांच्या मनावर कांहीं तरी सुपरिणाम होईल, अशी बळकट आशा आहे.

प्रथमगुच्छाच्या शेवटीं छत्रपतींना अवरंगजेबाच्या कैदेंत ठेऊन पुस्तक संपवावें, हें मनाला अगदीं अप्रशस्त वाटल्यामुळें, एका पानांत छत्रपतींची दिल्लीच्या कैदेंतून सुटका केली, व पुस्तक संपविलें. परंतु त्या संबंधाची विशेष हकीकत समजण्याविषयीं वाचकांना जिज्ञासा असावी, हें स्वाभाविक आहे. छत्रपतीना, अवरंगजेबानें सामोरे हलक्या दर्जाचे लोक पाठविले, यानेंच त्यांच्या कोपानलानें पेट घेतला. त्यांत दरबारांत छत्रपतींना तिसऱ्या प्रतीच्या पांच हजारी सरदारांत बसायला जागा दिली! मग काय पुसावें ? त्या मानधनाला मृत्यू यावा असें झालें ! कित्येकांनीं असें वर्णन केलें आहे कीं, अवरंगजेबानें केलेल्या अपमानाचा छत्रपतींच्या हृदयावर, ते कांहीं वेळ बेशुद्ध पडले इतका परिणाम झाला ! छत्रपती दरबारच्या शिरस्त्याप्रमाणें वस्त्रें वगैरे कांहीं एक न घेतां, दरबारांतून संभाजीसह उठून गेले. पुढें अवरंगजेबाचें मन आपल्याविषयीं शुद्ध नाहीं असें पाहून, छत्रपतींनी जाफरखानाची भेट घेऊन, त्याजकडून अवरंगजेबानें आपल्याला परत जाण्याबद्दल लवकरच हुकूम द्यावा, अशाबद्दल खटपट चालविली. जाफरखानाची बायको ती शाहिस्तेखानाची बहीण. तिनें आपल्या नवऱ्याला, शिवाजीवर विश्वास ठेवूं नका, त्याच्या नादीं लागूं नका, तो आपला घात करील, अशा गोष्टी सांगितल्या. जाफरखानाला त्याच्या बायकोचा उपदेश मिळतांच,

तो छत्रपतींच्या संबंधानें खटपट करीनासा झाला.

प्रथम अवरंगजेबाची इच्छा, छत्रपतींच्या बरोबर सख्य करावें अशी होती. परंतु छत्रपतींच्या संबंधाची त्याला जशी अधीक हकीकत समजली, तशी त्याची बुद्धी फिरली. शिवाजी थोड्या लोकांनिशीं आपल्या राजधानींत आला आहे तर त्याला आतांच कैद करून ठेवावें, ह्मणजे त्याच्या संबंधाच्या भीतीचें कारण संपलें, असें त्या शठ अवरंगजेबाच्या मनांत आलें, व त्यानें लागलीच पोलादखान कोतवालाला अणवून त्याजकडून छत्रपतींना जी हवेली रहाण्याकरितां दिली होती, तिच्या भोंवती पांच हजार लोकांचा पहारा बसविला! छत्रपतींचे दिल्लींतून लवकर परतण्याचे विचार चाललेले होते, तों ते एकेदिवशीं अवरंगजेबाचे कैदी बनले! मग त्यांच्या चित्ताची अस्वस्थता काय पुसावी? ते कधीं कोणत्या प्रसंगाला न गडबडणारे, पण या प्रसंगानें त्यांच्या डोळ्यांत आश्रू आले. आपल्या सर्व विचारांची परिसमाप्ति झाली व आपलें जीवित नष्टप्राय झालें, असें ते दुःखाचे वेगांत बोलूं लागले. निराजी रावजी, माणको हरी सबनीस, त्रिंबकजी सोनदेव, हिरोजी फरजंद वगैरे बरोबरच्या मंडळींना छत्रपतींची ती स्थिति पाहून अति दुःख झालें. तरी त्यांनीं छत्रपतींना धीराच्या गोष्टी सांगितल्या. श्रीशंभुमहादेव, मायभवानी आणि श्रीसमर्थ रामदास हे त्रिवर्ग आपले साह्यकर्ते आहेत, त्यांना आपली सर्वस्वी काळजी आहे, तेच आपल्याला या संकटांतून सोडवितील असें त्यांनीं छत्रपतींना सांगितलें. त्रत्रपतींचाही या त्रिवर्गांवर फार

विश्वास होता. तेव्हां दुःखाचा पहिला कढ जाताच त्यांनाहि वाटूं लागलें कीं, आपण दुःख करणें व्यर्थ आहे. ज्यांच्या कृपेनें आपण इतक्या योग्यतेस चढलों, तेच आतां या संकटांतून आपल्याला मुक्त करतील. ह्या सध्याच्या सत्ययुगांत निराकार प्रभूच्या भजकांची दाटी होऊं पहाते आहे. त्यांना छत्रपतींच्या संबंधाच्या दैवीक चमत्काराच्या गोष्टी विश्वासार्ह वाटणार नाहींत. मजसारख्यांचा त्या दैवीक चमत्कारांवर विश्वास बसत असला, तर ते आमची टवाळी केल्यावांचून रहाणार नाहींत. पण त्यांची ती टवाळी, एकाद्या उत्तम गवयाचें गाणें, चित्रासारखे तटस्थ होऊन ऐकत बसणारांची एखाद्या बहिऱ्यानें टवाळी करण्याप्रमाणेंच होय! त्यांची टवाळी कवडीमोलच समजली पाहिजे. असो; सांगायचें कारण, छत्रपती अवरंगजेबाच्या कैदेनें चिंताक्रांत होऊन निजले असतां, त्यांचें सदां रक्षण करणारी देवी त्यांच्या स्वप्नांत आली आणि तिनें मस्तकावर हात ठेऊन सांगितलें, शिवराया भिऊं नकोस. हें संकट ह्मणजे कांहीं मोठेंसें नाहीं. सत्कर्माकडे प्रवृत्ति ठेव. सद्धर्मकर ह्मणजे यांतून तूं मुक्त होशील. याप्रमाणें देवीनें छत्रपतींना स्वप्नांत दर्शन देऊन अश्वासन दिल्यावर त्यांना पुष्कळ धीर आला. थोडे दिवस मध्यंतरीं गेल्यावर छत्रपतींनीं आपल्या बरोबरच्या लोकांना परत स्वदेशीं पाठवून देण्याबद्दल अवरंगजेबाकडे अर्ज पाठविला. त्या अर्जांत आपल्या बरोबरच्या लोकांना दिल्लीची हवा मानवत नाहीं, हें त्यांना परत स्वदेशी पाठविण्याचें कारण लिहिलें होतें. दिल्ली-

स येताना छत्रपतींनीं आपल्या बरोबर किती लोक आणले होते त्याचे अंकडे निरानिराळे दृष्टीस पडतात. बखरकार एक हजार पायदळ व तीन हजार स्वार छत्रपतींनीं दिल्लीस बरोबर नेले होते असें ह्मणतात. परकीय इतिहासकार लिहितात कीं, शिवाजीनें आपल्याबरोबर निवडक पांचशें स्वार आणि एक हजार पायदळ नेलें होतें. पण मीं छत्रपतींच्या दिल्लीस जाण्यासंबंधाची जी दंतकथा ऐकली आहे, ती, छत्रपतीनीं दोनशेंपेक्षां जास्त लढाऊ लोक आपल्या बरोबर घेतले नव्हते; पण ते दोनशें लोक मात्र त्यांना तळहातावरच्या फोडाप्रमाणें जपणारे व प्रसंगीं दोन हजार लोकांस भारी होणारे असे होते, असें सांगते. छत्रपतींनीं इतके थोडे लोक बरोबर नेण्याचें कारणही पण सयुक्तिक आहे.तुह्माला दगा होणार नाहीं,असें जयसिंगानें हमी घेऊन सांगितलें होतें.दुसरा छत्रपतींनीं असा विचार केला कीं, दिल्लीपतीचें वैभव पूर्णदशेस पोंचलेलें आहे, तेव्हां आपण मोठ्या थाटानें व बरोबर पोक्त लवाजमा जरी घेऊन गेलों, तरी तेथें आपल्या लवाजम्याचें तेज पडणार नाहीं. मग उगीच बरोबर अधिक लोक नेण्यांत काय मतलब ? यापेक्षां थोडेच न्यावेत, पण चांगले न्यावेत, कीं जे वेळींप्रसंगीं आपल्या हुषारीनें कामें करतील. आणि अशा करण्यानें लोकांना आपला साधेपणा दिसेल व अवरंगजेबाचा विश्वास बसेल. असो. छत्रपतींचा बरोबरचे लोक परत पाठविण्याचा अर्ज पहातांच, अवरंगजेबानें आनंदानें परवानगी दिली. अवरंगजेबाच्या आज्ञेप्रमाणें छत्रपतींच्या

बरोबर आलेले लोक दिल्लींतून बाहेर पडले खरे, पण त्यांतील कित्येक लोक फिरून दिल्लींत येऊन राहिले. त्यानंतर छत्रपतींनीं अवरंगजेबाच्या विश्वासांतील मुसलमान सरदारांस वश करण्याचा प्रयत्न करून कांहीं फायदा होणार नाहीं, आपल्याला फार दिवस कैदेंत रखडत बसावें लागेल असा विचार करून अजारीपणाचें सोंग घेतलें. दिल्लीची हवा आपल्याला बाधली असें ते ह्मणूं लागले. पोलादखानानें औषधपाणी घेण्याविषयीं सांगितलें. तेव्हां छत्रपतींच्या सेवेंत असलेल्या हिरोजी फर्जंदानें सांगितलें कीं, आमचे यजमान फार धर्मनिष्ठ आहेत ते हकीमांचें औषध कधीं घेत नाहींत, याकरितां हिंदु वैद्य आणण्याची आह्माला परवानगी द्यावी. पोलादखानानें त्यांना हिंदु वैद्यांना आणण्याची परवानगी दिली. देवानें मनुष्याकरितां सर्व साहित्यांची योजना करून ठेवली आहे. परंतु मनुष्यानें आपली कल्पना लढविल्यावांचून मात्र त्यास कांहीं मिळत नाहीं. छत्रपतींना देवीनें स्वप्नांत अमुक अमुक कर असें कांहीं सांगितलें नव्हतें.नुसतें सद्धर्म कर ह्मणून सांगितलें होतें. त्यावरून छत्रपतींनीं कल्पना लढवून, बहाणा केलेल्या रोगाला उतार पडावा ह्मणून साधूसंत व मोठमोठे फकीर यांना पेटाऱ्यांतून फळफळावळ, मेवामिठाई रोज पाठविण्याचा प्रघात पाडला. बाहेरच्या पाहरेकऱ्यांनीं प्रथम प्रथम वाड्यांतून बाहेर जाणारे पेटारे उघडून पाहिले. पण त्यांची जेव्हां पेटाऱ्यांतून धर्म करण्याकरितां फळफळावळ व मेवामिठाई रोज पाठविण्यांत येते अशी खात्री

झाली, तेव्हांपासून ते चौकशी न करितां पेटारे बाहेर जाऊं देऊं लागले. छत्रपतींची प्रकृति पहाण्याकरितां व त्यांना औषध देण्याकरितां जे हिंदु वैद्य येत, त्यांत कित्येक दिल्लीस राहिलेले छत्रपतींचे मित्र असत. ते प्रकृति पाहण्यास आले ह्मणजे छत्रपतींच्या सुटकेचीच चिकित्सा चाले. एके दिवशीं हिरोजी फरंजदानें छत्रपतींच्या पलंगावर निजावें, त्याच्याजवळ एक लहान मुलगा बसवावा आणि छत्रपतींनीं व संभाजीनें पेटाऱ्यांत बसून बाहेर यावें असें ठरलें. रोज फळफळावळीचे व मेवामिठाईचे पेटारे बाहेर जात, पण शिवरायांनीं व संभाजीनें पेटाऱ्यांत बसून बाहेर पडायचें असें ठरलें, तेव्हां हें निर्विघ्नपणें कसें सिद्धीस जातें याची शिवरायांना व त्यांच्या मित्रांना धास्ती वाटूं लागली. वास्तविकच आहे, पाहरेकऱ्यांनीं रोजच्याप्रमाणें पेटारे न पाहतां जाऊं दिले तर बरें, पण जर त्यांनीं पेटारे उघडून पाहिले, तर दुष्ट अवरंगजेबाशीं प्रसंग. तो रागाच्या भरांत दोघांना एकदम जिवें मारण्याची शिक्षा सांगायलाही चुकायचा नाहीं! तथापि केव्हां तरी असें धाडस केलें पाहिजे, त्यावांचून या कैदेंतून सुटका व्हायची नाहीं असें मनांत आणून एके दिवशीं सायंकाळीं शिवराय व संभाजी दोन पेटाऱ्यांत बसून अवरंगजेबाच्या कडेकोट पहाऱ्यांतून श्रीजगदंबेच्या कृपेनें सुरक्षितपणें बाहेर पडले. हे पेटारे, एका गुप्त जागीं एक घोडा तयार करून ठेवला होता तेथें गेले. शिवरायांनीं संभाजीला आपल्यापुढें घोड्यावर घेऊन लागलीच मथुरेची वाट धरली.

## अवरंगजेब.

इकडे मागें हिरोजी फरजंद शिवरायांच्या पलंगावर अजारीपणाचें ढोंग करून दीड दिवस होता. त्यानें बाहेरच्या लोकांना शिवराय निसटून गेले, याचा काडी इतका संशय येऊं दिला नाहीं. दुसरे दिवशीं तो आपल्या जवळच्या मुलास बरोबर घेऊन, शिवरायांना वैद्याकडून औषध आणायला जातों असें पहारेकऱ्यांना सांगून तेथून राजरोसपणें बाहेर पडला. मागें स्वयंपाक करणारीं वगैरे जीं चाकरमाणसें राहिलीं होतीं, तीं दिल्लींतून शिवरायांनीं आपल्या बरोबर आणलेले लोक परत पाठविल्यावर तेथलींच ठेवलेलीं होतीं. पण चमत्कार असा कीं, त्यांना या घडवून आणलेल्या गुप्त बेताचा यत्किंचित् देखील मागमूस लागला नाहीं. दीड दिवसांत हिरोजी फरजंदानें आपल्या तोंडावरचें पांघरूण काढलें नाहीं. तोंडावर पांघरूण ठेवून तो एकसारखा कण्हत मात्र होता ! हिरोजीनें शिवरायांच्या मागें दीड दिवस औरंगजेबाच्या कैदेंत राहून आपला सेवकधर्म कसाला लावून दाखविला नाहीं काय ? शिवरायांच्या पलंगावर निजून राहणें ह्मणजे रसरशीत निखाऱ्यांवर निजण्याप्रमाणें नव्हतें काय ? कल्पना करा, शिवराय गेले ही बातमी फुटली असती तर हिरोजीची काय अवस्था झाली असती ? ! हिरोजी पहारेकऱ्यांना औषध आणायला जातों असें सांगून फरारी झाल्यावर, पलंग रिकामा पाहून वाड्यांतील चाकरमाणसांनीं ती गोष्ट पहारेकऱ्यांना कळविली. मग पहारेकऱ्यांची त्रेधा काय पुसावी ! त्यांनीं त्या बिचा-

ऱ्या चाकरमाणसांनाच समज देण्यास सुरुवात केली ! हं हं ह्मणतां ही बातमी सर्व दिल्ली शहरभर पसरली. कपटपटु अवरंगजेब मनगटें चावूं लागला ! त्याच्या पदरचे सर्व सरदार दक्षिणचा वाघ पिंजऱ्यांतून सुटून गेला, आतां तो काय प्रळय करून सोडील त्याची कल्पना करवत नाहीं, असें ह्मणूं लागले. कित्येक बरी आपल्या राजधानींतून ब्याद गेली, तिकडे दक्षिणेंत कांहीं करो, असेंही ह्मणूं लागले. पण खुद्द अवरंगजेबाला मेल्यापेक्षां मेल्याप्रमाणें झालें ! त्याला आपल्या कपटपटुत्वाची, आपल्या अकलेची, आपल्या कार्यसाधुत्वाची, आपल्या शहाणपणाची मोठी घमेंड ! शूर सरदार व अक्कलवान राजकारस्थानी मीरजुमला यांजपासून द्रव्य व सैन्य घेतलें; मोहिनीमंत्र टाकून, मी फकीर होणार असें पुरें ढोंग करून, कुराणाची शपथ वाहून मुरादास मुठींत आणलें; बादशाह मेला अशी खोटीच कंडी उठवून मुरादाला साह्याला घेऊन उत्तरेचा मार्ग धरिला; नर्मदेच्या तीरावर दारानें सैन्य पाठविलें असतां कासमखानाला फितूर करून शूर यशवंतसिंगाच्या रजपूत सैन्याचा पुरा मोड करून नर्मदा उतरून पुढें गेलों; पुढें कलीलुल्लाखान यास पैसे भरून त्याजकडून दाराशीं हरामी करवून विजयी झालों; प्रत्यक्ष जन्मदात्या वडलांना व पोटच्या मुलाला कैदखाना दाखविला; कपटकारस्थानें रचून दाराचा, मुरादाचा व त्यांच्या मुलांचे वध करविले; सुजाला व त्याच्या कुटुंबाला देशोधडीला लावलें, आणि या अवाढव्य राजसत्तेचा मालक बनलों, ह्या गोष्टी आ-

ठवून तो शठ अवरंगजेब सर्द झाला ! आपण अशा प्रकारचे महाठक असून शिवाजी आपल्या हातावर तुरी देऊन गेला, तेव्हां हा आपल्याला शेराला सव्वाशेर भेटला असें अवरंगजेबाला वाटूं लागलें. शिवाजी इतक्यांत आपल्या हातीं लागला नाहीं तर तो आपली दक्षिणेंतली सत्ता समूळ उपटून टाकील हें हींव अवरंगजेबाला भरलें ! या हिवांत अवरंगजेबानें तीन दिवस अन्नग्रहण केलें नाहीं व तो कोणाला न भेटतां एकसारखा अल्लाची प्रार्थना करीत होता असें कित्येकांचें ह्मणणें आहे. यावरून शिवरायांच्या अतुलपराक्रमाला अवरंगजेब किती भीत होता हें स्पष्ट होत आहे. शिवरायांच्या अवरंगजेबाच्या हातावर तुरी देऊन जाण्यानें, तो जरी वर सांगितल्याप्रमाणें तीन दिवस वेडा झाला होता, तरी त्यानें बातमी कळतांच शिवरायांना धरून आणण्याकरितां ताबडतोबीनें चोहींकडे हजारो स्वार पिटाळले, व जो कोणी शिवाजीला धरून आणील त्याला मोठें इनाम दिलें जाईल असें जाहीर करविलें. शिवाय त्यानें ठिकठिकाणच्या अंमलदारांना बहिरागी, गोसावी, जती, यती, फकीर, कावडी, बहुरूपी, यात्रेकरू वगैरेवर नजर ठेवण्याबद्दल आपल्या हुकुमाचीं ताबडतोबीने पत्रें लिहविलीं. याखेरीज त्यानें आपल्या विश्वासांतले गुप्त हेर रवाना केले. शिवाजीला धरून आणण्याकरितां इतकी कडेकोट व्यवस्था केली असतां त्याचे पाय दक्षिणेला कोठून लागतात अशी अवरंगजेबाला मोठी आशा होती. तो मोठा धर्मवेडा होता. अल्लावर त्याचा भारी विश्वास हो-

ता. अल्लाची आपल्यावर पूर्ण कृपा आहे आणि त्यामुळेंच आपले सर्व ग्रह जोरावर आहेत, आपल्याला अनिष्ट तें कधीं फलास यायचें नाहीं, अशी त्याची समजूत होती. अवरंगजेबाचें धर्मवेड आणि अमानुष कृत्यांनीं कां होईना, पण त्याचा उत्कर्ष ह्या गोष्टी मनांत आणतां, त्याला अल्लाची आपणावर पूर्ण मर्जी आहे व आपले ग्रह पूर्णपणें जोरावर आहेत असें वाटत असावें हें स्वाभाविक होतें. पण तो ज्या अर्थी पक्का संशयी होता, त्या अर्थी शिवरायांचा प्रथमपासून होत असलेला उत्कर्ष पाहून, हा पुरुषही आपल्यासारखा अल्लाच्या मर्जीतला कशावरून नसेल अशी अवरंगजेबाला शंका येणें स्वाभाविक होतें. अथवा स्वोत्कर्षदर्पानें मनुष्य अंध होतो, त्या अंधतेनें अवरंगजेबाला घेरलें असावें! ही अंधता आपल्या शिवरायांना मात्र कधींही शिवली नाहीं. त्यांनीं तिचा आपल्यावर कधींही पगडा बसूं दिला नाहीं. अवरंगजेबाची व शिवरायांची साम्यता लावणें उचित होणार नाहीं. अवरंगजेब दैवशाली खरा, पण अशा प्रकारचा नष्ट होता कीं, दिल्लीची बादशाही भोगून अंतीं त्याला रवरव नर्काचीच प्राप्ति झाली असावी! कारण बापाला कैदेंत टाकणाऱ्या, त्याजकडे नजर ह्मणून त्याच्या एका मुलाचें शिर पाठविणाऱ्या, आपल्या बंधूंना, पुतण्यांना वनवास दुःखें देऊन, अधमपणानें कैदेंत टाकून शेवटीं त्यांचा वध करविणाऱ्या महंमदी धर्मानुयायास महंमदी शास्त्रानें पुण्यलोक सांगितला असेल असें कधींही होणार नाहीं. आपले शिवराय दैव-

झाली होती, आपल्यावर श्रीशंभूंची, जगन्मातेची व तत्कालीन सर्व सत्पुरुषांची पूर्ण कृपा आहे, जाऊं तेथें आपला उत्कर्ष व्हावा असें आपल्या जन्मकाळचे ग्रह आहेत हें त्यांना पुरें कळून आलेलें होतें, पण त्यांनीं नष्ट अवरंगजेबासारखीं अधम कृत्यें कधींही केलीं नाहींत. तेव्हां दोघांची साम्यता लावूं पहाणें कसें उचित होईल ? पितृभक्तिसंबंधानें पाहतां शिवरायांचें वर्णन करावें तितकें थोडें आहे. शहाजहानाची अवरंगजेबावर विशेष प्रीति होती असें इतिहासकार सांगतात. पण त्या नष्टानें त्या बिचाऱ्या म्हाताऱ्याला आजन्म कैदेंत कोंडलें ! आणि आपल्या शिवरायांनीं त्यांच्यावर शहाजींचें म्हणण्यासारखें प्रेम नसताना, त्यांना यत्किंचित् ताप होऊं नये म्हणून आपल्या स्वराज्यस्थापनेच्या महत्कार्याला कांहीं दिवस बाजूस ठेवलें. हरप्रयत्नानें त्यांनीं केलेली त्यांच्या शत्रूचा कपाळमोक्ष करण्याची आज्ञा पार पाडली व ते भेटायला आले असतां एखाद्या हुजऱ्याप्रमाणें त्यांच्या पालखीचा कल धरून त्यांना घरीं आणिलें ! शहाजींना आपण पूर्ण वैभवास चढण्याच्या अगोदर मृत्यू आला, ते आपलें वैभव पाहण्यास राहिले नाहींत, याचें शिवरायांना त्यांच्या अंतकालापर्यंत दुःख होत असे ! ही पितृभक्ति कोणीकडे व अवरंगजेबाची पितृभक्ति कोणीकडे ? शिवरायांनीं कित्येक छापे, घाले घातले, कित्येक शहरें लुटलीं, अफजुलखानाचीं आंतडीं बाहेर काढलीं, एवढ्यांवरून त्यांना परकीय इतिहासकारांनीं नाहीं नाहीं तसलीं विशेषणें दिलीं आहेत, परंतु त्यांनीं

शहाजहान, अवरंगजेब अशा तत्कालीन अगडबंब बादशहांच्या काळ्याकुट्ट कृतींचें पर्यालोचन करून, मग शिवरायांच्या कृतींची मीमांसा करून त्यांची कोटी ठरविण्याचें मनांत आणिलें नाहीं याचें नवल वाटतें! असो. प्रथम गुच्छांत शहाजहान मेल्याची वार्ता आली होती, ह्मणून अवरंगजेबानें दक्षिणेंतून जाण्याचा निश्चय केला, अशा प्रकारचा उल्लेख आलेला आहे. पण त्यासंबंधानें खरा प्रकार असा होता कीं, ती वार्ता स्वहेतुसिध्यर्थ अवरंगजेबानेंच पसरविली होती! अवरंगजेबानेंच अशी वार्ता पसरविली होती असें नाहीं! सुजा बंगालच्या सुभेदारीवर होता, तिकडे त्यानेंही हाच कित्ता गिरविला होता!! शहाजहान त्यावेळीं आजारी पडला होता, इतका कायतो त्यांत खरा मजकूर होता. शिवराय अवरंगजेबाच्या कैदेंतून निघून दक्षिणेंत आल्यावर तिकडे बिचारा शहाजहान कैदेंत असतांनाच मृत्यु पावला व आपल्या सर्व दुःखांपासून मुक्त झाला! असो. शिवराय दिल्लींतून संभाजीला घेऊन मथुरेकडे गेले ह्मणून मागें सांगितलेंच आहे, पण त्यांनीं पुढें काय केलें, हें वाचण्याविषयीं वाचक उत्सुक झाले असतील तेव्हां आतां तिकडे जाऊं.

## शिवरायांची अपूर्व धर्मनिष्ठा व रायगडीं गमन.

दिल्लीहून शिवराय मथुरेस गेले, त्यावेळीं त्यांच्याबरोबर निराजी रावजी, दत्ताजी त्रिंबक व राघोमित्र हे त्यांचे तीन विश्वासु सेवक त्यांच्या बरोबर होते. मथुरेंत

मोरोपंत पेशवे यांचे कृष्णाजीपंत, काशीराव व विसाजीपंत असे तिघे मेव्हणे राहत होते, ते विश्वासू आहेत, प्राणावर येऊन बेतली तरी भेद करणार नाहींत, अशी पेशवे यांनीं खातरी करून दिल्यावरून शिवरायांनीं मथुरेस जाऊन त्यांच्या घरीं उतरण्याचा विचार ठरविला होता. त्याप्रमाणें मथुरेस ते त्यांच्या घरीं जाऊन उतरले. त्या तिघां बंधूंनीं शिवरायांचा फार आदरसत्कार केला इतकेंच नाहीं, तर त्यांना आपलें घर शिवरायांचे पाय लागल्यानें पावन झालें असें वाटलें. अवरंगजेबानें आपल्या शोधाकरितां चोहींकडे माणसें पाठविलीं असतील तेव्हां एका जागीं चार दिवस राहणें धोक्याचें झाल्यावांचून रहाणार नाहीं असें मनांत आणून, शिवरायांनीं संभाजीला पेशव्यांच्या मेव्हण्यापाशीं ठेवून, आपण इतक्या संनिध आलोंच आहों, त्याअर्थीं मोक्षपुरी वाराणशींत जाऊन श्रीकाशीविश्वेश्वराचें दर्शन घ्यावें, स्नान पान दान इत्यादि पुण्यकर्में करावींत असें मनांत आणलें ! शिवराय या वेळीं कशा स्थितींत होते हें वाचकांस माहीत आहेच. अशा स्थितींत त्यांनीं काशी, प्रयाग वगैरे तीर्थें करण्याचें मनांत आणणें ह्मणजे त्यांची धर्मनिष्ठा अलौकिक होती असेंच नव्हे काय ? दुसरा जर कोणी अशा प्रसंगांत सांपडलेला असता, तर त्यानें वेष पालटून तावडतोब आपल्या घराचा रस्ता धरला असता. तीर्थांची त्याला आठवण देखील झाली नसती ! व यदाकदाचित् आठवण झाली असती, तर तो आपल्या मनाशीं ह्मणतां, तीर्थें करितांना शत्रूंनीं आपल्याला धरलें तर

हीं तीर्थें अथवा येथील देवता आपलें शत्रूंपासून रक्षण करतील काय ? पण महात्म्या शिवरायांच्या मनाची अशी खात्री झालेली होती कीं, जोंपर्यंत आपण सद्धर्मांत आहोंत, तोंपर्यंत शत्रूंची भीति धरण्याचें मुळींच कारण नाहीं. त्यांच्याकडून आपलें कांहीं देखील वांकडें व्हावयाचें नाहीं. आणि खरेंच आहे, सर्वशक्ति परमात्म्याचा आश्रय केल्यावर त्यापुढें मानवी शत्रूचा पिंगा तो किती चालणार ?! शिवरायांना धरण्याच्या संबंधांत अवरंगजेबानें जी कट्टी व्यवस्था केली, तिचा परिणाम असाच झाला. शिवरायांनीं भोंवतालचीं तीर्थें करून प्रत्येक ठिकाणीं पुष्कळ दानधर्म करून गोसाव्यांचीं सोंगें घेऊन दक्षिणची वाट धरली. ते गोंडवणांतून भागानगराकडे जाऊन तिकडून विजापुराकडून रायगडास जाऊन सुखरूप पोंचले. वाटेंत त्यांना मुळींच त्रास झाला नाहीं असें नाहीं; त्यांना बराच त्रास झाला, पुष्कळ संकटें सोसावीं लागलीं, पण परमेश्वराची त्यांच्यावर कृपा, ह्मणूनच ते अवरंगजेबाच्या लोकांच्या हातीं लागले नाहींत. अवरंगजेबाच्या ठिकठिकाणच्या अंमलदारांनीं गोसावी, यती, जती, फकीर, यात्रेकरू वगैरे लोकांना शिवरायांचा संशय घेऊन भारी त्रास दिला. हाच शिवाजी ह्मणून कित्येकांच्या दिल्लीसही रवानग्या झाल्या. आतां आपल्याला बादशहाकडून मोठें इनाम मिळेल ह्मणून कित्येकदां कैकांच्या तोंडाला पाणी सुटलें. कैक वेळां खुद्द अवरंगजेब क्षणिक आनंदानें नाचला ! पण मोठ्या बंदोबस्तानें आणलेल्या शिवाजीला ओळखण्याचा प्रयत्न झा-

त्यावर सगळेंच ओम्‌फस्त होई ! असो. शिवराय दिल्लीस गेले तेव्हां त्यांना दिल्लीस जाऊन पोंचायला सगळे दोन महिने लागले होते. पण दिल्लीहून रायगडास परत येतांना त्यांना नऊ महिने लागले. यावरून त्यांचे वाटेंत बरेच हाल झाले असतील, त्यांना पुष्कळ दबत दबत यावें लागलें असेल, हें वाचकांच्या सहज ध्यानांत येईल. वाटेनें निराजी रावजी, दत्ताजी त्रिंबक व राघोमित्र हे तिघे विश्वासु सेवक शिवरायांच्या बरोबर होतेच. आणि या तिघांनीं स्वतः हाल सोसून शिवरायांची इतकी एकनिष्ठपणें सेवा केली कीं, ते त्यांना नेहमीं ह्मणत, तुह्मी मजवर जे उपकार करीत आहांत ते या जन्मांत माझ्या हातून फिटायचे नाहींत; तुमचे उपकार फेडण्याकरितां मला दुसरा जन्म घ्यावा लागेल. छत्रपतींनीं असे उद्गार काढले ह्मणजे त्या तिघांना लाजल्यासारखें होई, आणि ते म्हणत, महाराज, आह्मी या पायांचें चाकर आहोंत, सेवा करणें हा आमचा धर्मच आहे, यांत आह्मी आपल्यावर उपकार कसचे करतों ? आह्मीं जर आपली अशी सेवा केली नाहीं तर मात्र आह्मी आपले अपराधी ठरूं. या त्यांच्या अशा लीनतेच्या भाषणावर शिवराय ह्मणत, सेवक जे असतात ते नियमित सेवा करितात, आणि तुह्मी तर दोन दोन दिवस अन्न मिळालें नाहीं तरी त्यांची फिकीर न करितां नुसते पाणी पिऊन अष्टौप्रहर माझ्यावर उपकार करण्याकरितां दक्ष असतां. तुह्मी जर सेवक असतां तर कधींच, पोटाला वेळेवर मिळत नाहीं, थंडीवाऱ्यांत, पावसांत, उन्हांत एकसारखीं अ-

नवाणी जंगलें तुडवावीं लागतात, डोंगर चढावे उतरावे लागतात, शिवाय कोणी ओळखून कैद करील कीं काय ही सार्वकाल भीति आहेच, असें पाहून मला सोडून दुसऱ्या कोणाची सुखाची मेवा पत्करली असतीत. तुह्मी माझे सेवक नसून अत्यंत विश्वासु उपकारकर्ते मित्र आहांत. खचित तुमचे हे उपकार कधीं फिटणार नाहींत. छत्रपतींच्या अशा प्रकारच्या भाषणानें त्या तिघांच्या मनोवृत्तीवर काय परिणाम होत असेल त्याची आपल्याला नेटकी कल्पना होणें अशक्य आहे. असो. अनेक संकटें व ताप सोसून छत्रपती आपल्या विश्वासु सेवकांसह इ. स. १६६६ च्या दिसेंबर महिन्यांत रायगडास येऊन पोंचले. छत्रपतींना रायगडास आलेले पाहिल्यावर सर्वांना परमानंद झाला. हत्तीवरून साखरा वाटल्या. जिकडे तिकडे आनंदोत्सव सुरू झाले. छत्रपतींनीं आपण दिल्लीहून सुखरूपपणें परत आलों ह्मणून दानधर्म पुष्कळ केला. सर्व दक्षिणेंतील लोकांना छत्रपतींच्या येण्यानें कालरात्र संपून सुखदायी दिनकर उगवल्याप्रमाणें वाटलें.

## शिवराय दिल्लीकडे गेल्यावरची मागील स्थिति.

अवरंगजेबानें कपटानें दिल्लीस कैदेंत टाकलें असतां, ईश्वराच्या कृपेनें कैदेंतून सुटून परत आलों याबद्दल छत्रपतींना जितका आनंद झाला, त्यापेक्षां आपल्या विश्वासू कामदारांनीं आपणामागें मुलखाचा बंदोबस्त उत्तम राखला याबद्दल अतिशय आनंद झाला. त्यांनीं मुलखाचा बंदोबस्त छत्रपतींनीं घालून दिलेल्या शिस्ती-

प्रमाणें राखला इतकेंच नाहीं, तर भोंवतालीं लक्ष ठेवून स्वहिताची वेळ आली कीं ती वायां जाऊं द्यायची नाहीं, हें छत्रपतींचें धोरणही त्यांनीं राखलें होतें. या वेळेसंबंधानें इतिहासकारांनीं अवरंगजेबाच्या राज्याविषयीं असें ह्मटलें आहे कीं, तें पूर्ण वैभवास चढत होतें. त्याच्या काश्मीर येथील सुभेदारानें टिबेटचा कांहीं भाग घेतला. बंगालच्या सुभेदारानें सुपीक चितागंग प्रांतांत सत्ता वाढविली. याखेरीज अवरंगजेबाशीं स्नेह करण्याकरितां अरबस्थानांतील कित्येक राजे, अबिसिनीआचा राजा, उझबेकचा राजा व पर्शिआचा बादशहा इतक्यांकडून वकील आले. यावरून अवरंगजेबाच्या वैभवाची सत्यता व्यक्त होते. ही वेळ अवरंगजेबाच्या पूर्ण वैभवाची होती याचा प्रत्यय आणखी एका गोष्टीवरून येतो. कंदाहारचा शहाअब्बस यानें अवरंगजेबाबरोबर लढाई करण्याकरितां कंदाहार भोंवतीं मोठी फौज जमविली होती. अवरंगजेब त्याच्यावर स्वतः चालून जाण्याचा विचार करीत होता. पण थोड्याच दिवसांत शहाअब्बस मेल्याची बातमी अवरंगजेबाला येऊन पोंचली. असें जरी होतें, तरी छत्रपतींनीं स्वराज्याचा मांड मांडलेल्या दक्षिणेकडे अवरंगजेबाच्या जोरावर असलेल्या ग्रहांची मात्रा चालत नव्हती. कोठें नाहीं पण दक्षिणेंत अवरंगजेबाच्या वांट्याला अपयश होतें ! मग हें छत्रपतींच्या भाग्योदयाच्या प्रभावामुळें असें झालें असलें तर कोण जाणे ! दक्षिणेंत अवरंगजेबाचा कोणी कर्तबगार माणूस नसल्यामुळें त्याच्या वाट्याला अपयश आलें, असें कोणी

ह्मणतील. पण तसें ह्मणण्यासही जागा नाहीं. जयसिंगासारखा पराक्रमी रजपूत योद्धा विजापूरकरांची दक्षिणेंतील सत्ता नामशेष करण्याकरितां झगडत असतां, व त्याच्या मदतीला दिलेरखानासारखा नामांकित योद्धा असतां यश आलें नाहीं ! छत्रपतींच्या पदरचे मोरोपंत पेशवे, निळोपंत मुजूमदार, आण्णाजीपंत सुरनीस वगैरे स्वस्थ बसले नव्हते. विजापूरकर व अवरंगजेबाचें सैन्य यांची चांगली जुंपली आहे असें पाहून, त्यांनीं हळू हळू आपला गेलेला मुलूख व किल्ले घेण्यास सुरवात केली. छत्रपती रायगडास येण्याच्या अगोदरच त्यांनीं थोडेसे किल्ले व कांहीं मुलूख परत घेतला होता. दक्षिणेंत जयसिंगाच्या हातून सांगितलेली कामगिरी तर झाली नाहींच, पण उलट पदरीं अपयश आलें असें पाहून, अवरंगजेबानें त्यास परत बोलाविलें. जयसिंग परत जात असतां वाटेंत तो मृत्यु पावला. अवरंगजेबानें जयसिंगाच्या जागीं दक्षिणेंत आपला पुत्र मोआझिम व त्याच्या मदतीला जसवंतसिंग यांस पाठवून दिलें. हें छत्रपतींच्या पथ्यावरच पडलें. कारण जसवंतसिंगाचें मोआझिम याजवर विलक्षण वजन होतें. जसवंत सिंगाच्या तंत्रानें राहणारा तो होता. आणि जसवंतसिंग जरी औरंगजेबाचा नौकर ह्मणवीत होता, तरी त्याचें लक्ष औरंगजेबाच्या हिताकडे नव्हतें. मुसलमानांची सत्ता दांडगी पडली, तिचा आपल्या हातून रोध होणें कठीण, अंगमस्तीनें तिच्याशीं वैर बांधलें तर स्वतःचें नुकसान होण्यापलीकडे कांहीं होणें नाहीं, असा विचार करून तो अवरंगजे-

बाचा नौकर झाला होता. छत्रपतींनीं दक्षिणेंत जो स्वराज्यस्थापनेचा मांड मांडला होता, त्याचा जसवंतसिंगास अभिमान वाटत होता. छत्रपतींची कर्तबगारी तो जाणून होता आणि त्याला असेंही वाटत होतें कीं, छत्रपतींना देव रगड आयुष्य देईल व त्यांना तयारी करायला चांगली फुरसत सांपडेल, तर ते अवरंगजेबाच्या खंबीर सत्तेचे पांच पाट काढून तिला पळतां भुई थोडी केल्यावांचून रहाणार नाहींत. तात्पर्य, दक्षिणच्या सुभेदारीवर मोअझिम व त्याच्या मदतीला जसवंतासिंग आल्यामुळें छत्रपतींना आपलें हित करून घेण्यास चांगली संधि मिळाली.

## अवरंगजेबावरोबर तह.

आपण अवरंगजेबाच्या हातांवर तुरी देऊन त्याच्या कैदेंतून निसटून आलों, तेव्हां तो आपलें चांगलें पारिपत्य करण्याच्या विचारांत असेल ही भीति छत्रपतींना अगदीं बिलगून राहिलेली होती. अवरंगजेबानें लढाई सुरू करविली तर आपली त्रेधा उडल्यावांचून रहाणार नाहीं हेंही छत्रपतींना स्पष्ट दिसत होतें ! आणि यामुळें त्यांच्या चित्ताला अस्वस्थता जडली होती. परंतु मोअझिमाबरोबर जसवंतसिंग आलेला ऐकून त्यांना पुष्कळ धीर आला. मुसलमानांच्या विषयीं जसवंतसिंगाचें मन शुद्ध नाहीं हें छत्रपतींना माहीत होतेंच. शिवाय ‘ दाम करी काम ’ हें एक जगांतलें मोठें तत्त्व आहेच. छत्रपतींच्या वेळेला आतांसारख्या शिक्षणाच्या शाळा नव्हत्या व स्वराज्याच्या अंतापर्यंतही झाल्या नाहींत. ह्मणून त्याकाळीं सर्वच लोक अ-

शिक्षित असत असें कांहीं नाहीं. त्याकाळीं शिक्षणाचीं दुकानें नव्हतीं किंवा सध्यां सारखा शिक्षणाचा बाजार झाला नव्हता, असें ह्मटल्यास अधिक शोभेल. सध्यांचे आपले राज्यकर्ते व्यापारी पडले, ह्मणून आपल्या आर्यभूंत शिक्षणाचाही बाजार झाला ! पूर्वींचे या आर्यभूतील विद्वान् लोक विद्येचा विक्रय करणें ह्मणजे महत्पाप समजत आणि विद्यार्थ्यांस फुकट विद्यादान करीत. छत्रपतींना स्वराज्यस्थापनेंत ज्या मुत्सद्यांची विलक्षण मदत झाली, त्यांना किंवा त्यांच्या पालकांना त्यांच्या विद्येकरितां दमडीही खर्च करावी लागली नव्हती. अशा काळाला आमचे अलीकडील पाश्चात्य विद्याविभूषित पंडित अज्ञानांधःकाराचा काळ ह्मणतात. म्हणोत बिचारे! त्यांच्या तोंडाला हात कोणी लावावा ? असो. सांगायचें कारण, छत्रपतींच्या काळीं आपल्या महाराष्ट्रांत तोंडांत बोट घालण्यासारखे जिवाला जीव देणारे तलवारबहादर शूर पुरुष जसे अनेक होते, तसेच उत्तम राजकारणी मुत्सदी पुरुषही होते. रघुनाथपंत कोरडे हा एक अशा पुरुषांपैकींच होय. हा एक छत्रपतींच्या पदरचा होता. वकिलीच्या कामांत याचा हातखंडा असे. शत्रुपक्ष कसाही खवळलेला असो; ही स्वारी एकदां शत्रूच्या गोटांत जाऊन मुख्याला बिलगली, ह्मणजे छत्रपतींचे कितीही अपराध असोत, त्यांच्यावर पांघरूण घालून शत्रुपक्षाकडील मंडळींचा राग घालविल्यावांचून कधींही राहायची नाहीं. छत्रपतींनीं प्रस्तुत सारख्या प्रसंगीं जसवंतासिंगाशीं बोलणें करण्याकरितां रघुनाथपंताची योजना करावी हें स्वाभाविक होतें. रघु-

नाथपंताबरोबर जसवंतसिंग व मोअज्झिम यांस देण्याकरितां पुष्कळ जवाहिर देऊन छत्रपतींनीं त्यास औरंगाबादेस पाठविलें. रघुनाथपंतानें जसवंतसिंगाची गांठ घेतल्यावर, जसवंतसिंगाचा ओढा आपल्याकडे आहे, आणि मोअझिम हे केवळ जसवंतसिंगाच्या हातांतलें बाहुलें आहे हें त्या धूर्तानें तेव्हांच जाणलें. रघुनाथपंतासारख्याच्या जाळ्यांत हें असें वेडें रान आल्यावर, तो सुंदर बाग बनविल्यावांचून कसा राहील ? ही, मुंगी होऊन हवी तितकी साखर खाण्यासारखी जागा आहे असें पाहून, लीनतेची कमाल करून, छत्रपतींच्या विचारानें औरंगजेबाबरोबर तह करण्याचा घाट घातला. मोअझिम व जसवंतसिंग यांच्याकडून औरंगजेबाकडे तहाचीं कलमें गेलीं. औरंगजेबाला तीं कलमें प्रथम रुचलीं नाहींत. परंतु त्याच्या शठवृत्तीनें, या तहानें आपलें मनोगत सिद्धीस जाईल अशी भर दिल्यामुळें त्यानें शिवाजीबरोबर तह करून घ्यावा, असें आपल्या पुत्रास पत्र लिहिलें. या तहांत औरंगजेबानें छत्रपतींस राजा कबूल केलें. वऱ्हाड व खानदेश यांत १९ लक्ष होन वसुलाचा मुलूख दिला. खेरीज छत्रपतींपासून घेतलेले पुणें, चाकण व सुपें हे परगणे परत दिले. मात्र या तहानें छत्रपतींना औरंगजेबाचा चाकरनामा कबूल करावा लागला आणि आपलें पांच हजार सैन्य चाकरीस द्यावें लागलें. पण या तहानें छत्रपतींचा पुष्कळ फायदा झाला ही गोष्ट निर्विवाद आहे.

### छत्रपती खंडण्या घेऊं लागले

इ० स० १६६४ त छत्रपतींचे वडील शहाजी वा-

रल्यावर, त्यांनीं आपल्या नांवाच्या मागें राजा हें पद लावून घेण्यास सुरुवात केली होती. आपल्या नांवाचें त्यांनीं नाणेंही पाडविलें. आणि आतां तर खुद्द दिल्लीच्या बादशहानें त्यांचें राजा हें पद कबूल केलें, त्यामुळें सर्व पाळेगार वगैरे त्यास शिवाजीराजे असें ह्मणूं लागले. छत्रपतींना औरंगजेबाचा मोठा धाक वाटत होता; परंतु त्याच्याशीं सख्य केल्यामुळें त्यांच्या एका बलाढ्य शत्रूची त्यांच्या मागची भीति नाहींशी झाली. यामुळें विजापूर व गोवळकोंड्याची बादशाही या दोन दक्षिणेंतील मुसलमानी सत्तांपासून आपला फायदा करून घेण्याकडे आपलें लक्ष पुरविण्यास, त्यांना चांगली फुरसत सांपडली. त्यांनीं आपलीं सैन्यें तयार करून विजापूर व गोवळकोंडा इकडे चालविलीं. छत्रपतींच्या सैन्यांतील लोक लढण्याच्या कामांत पुरे वाकब, घे घे मार करीत कशाही तुफान शत्रू सैन्याची हवेलंडी उडविणारे, त्यांत छत्रपती मोठ्या विघ्नांतून दिल्लींतून बचावून आल्यामुळें, त्यांच्या शौर्यास विलक्षण स्फुरण चढलें होतें. दिल्लीपतीच्या सैन्यानें जर्जर करून सोडलेल्या विजापूरच्या व गोवळकोंड्याच्या सैन्यांना छत्रपतींच्या सैन्याचा मार सहन होईना! छत्रपतींच्या सैनिकांचे पराक्रम पाहून या दोन्ही सत्तांना पुरें कळून चुकलें कीं, आपण जर हार खाल्ली नाहीं तर शिवाजी राजे आपल्या सत्ता नष्ट केल्यावांचून कधीं रहाणार नाहींत. दक्षिणेंतील याच मुसलमानी सत्ता छत्रपतींना पुंड, लुटारू, दरोडेखोर ह्मणत, आणि मनांत आणूं तेव्हां याला चिरडून टाकूं अशा बढ्या बढ्या बात

सांगत. त्याच या भित्तीला छत्रपतींना राजे ह्मणूं लागल्या. त्या त्यांच्या पराक्रमाला भिऊं लागल्या इतकेंच नाहीं, तर त्यांच्याशीं तह करून त्यांना खंडण्या देण्यास कबूल झाल्या! त्यांनीं लीन होऊन आपले वकील छत्रपतींच्याकडे सख्य करण्याकरितां पाठविले. त्या वकिलांशीं पुष्कळ बोलणीं होऊन खंडण्या ठरल्या. गोवळकोंड्याच्या बादशहानें प्रतिवर्षीं पांच लाख होन खंडणीदाखल देण्याचें कबूल केलें. आणि विजापूरकरांना, औरंगजेबाच्या सैन्यानें अगदीं खराबीला आणिलें आहे; त्यांच्या पदरीं आपले वडील नौकर होते, तेव्हां पर्यायानें आपल्या या उत्कर्षास विजापूरकरांची आद्य मदत आहे, या गोष्टी मनांत आणून छत्रपतींनीं त्यांच्यापासून प्रतिवर्षीं तीन लाख होन खंडणीदाखल घेण्याचें कबूल केलें. याप्रमाणें छत्रपतींना खंडण्या मिळूं लागल्यावर, त्यांचा लौकीक फार वाढला. त्यांचा चोहींकडे दरारा बसला व लोक असेंही बोलूं लागले कीं, गोवळकोंडें व विजापूरकर यांच्यापासून शिवाजी राजे खंडण्या घेऊं लागले असें आज आपण ऐकत आहोंत, पण त्यांच्यावर देवीची अशी कांहीं कृपा आहे कीं, आपण कांहीं दिवसांनीं ते दिल्लीपतीपासून खंडणी घेऊं लागले, असें ऐकूं. आमच्या आधुनिक विद्वानांचा पुढील गोष्टीवर विश्वास न बसो, परंतु बखरी व दंतकथा छत्रपतींना दैविक चमत्कारांत गुरफटलेले दाखवीत आहेत. इतिहासकारांनीं यासंबंधानें मुळींच उल्लेख केला नाहीं असें नाहीं. तत्कालीन लोकांचा, देवी त्यांच्या अंगांत येऊन त्यांच्या बरोबर

बोलते, त्यांना पुढील भविष्यें सांगतें, बिकट प्रसंगांतून निघण्याचे मार्ग दाखविते, असा पक्का ग्रह झालेला होता. छत्रपतींची देवीवर तशाच प्रकारची निष्ठा होती यांतही शंका नाहीं. छत्रपती कोणत्याही कार्यारंभीं मायभवानीची सद्भावानें विधिपूर्वक पूजा केल्यानंतर, तिला या कार्याला हात घालूं कीं नको, असें विचारीत. व ती त्यांना योग्य सल्ला देई. यावर विपर्यस्त मनाच्या परकीय लेखकांनीं ढोंगाचा आरोप केलेला पाहतांच, आपल्या कैक आधुनिक पंडितांनीं त्यांची पिंक झेलायला लागावें. अं !

हा, या लेखकाला, निव्वळ बेशरमपणा वाटतो! अज्ञान मावळ्यांना आणि घाटावरच्या मराठ्यांना, माझ्या बरोबर देवी बोलते असें दाखविण्याकरितां छत्रपतीं खोटें अंगांत आणीत, असें ह्मणणें ह्मणजे, छत्रपतींना एखादा वाघ्या बनविणें नव्हे काय ? छत्रपती तसे असते, तर त्यांच्या हुशारीच्या ढोंगानें फार झालें तर त्यांना भंडारा वांटीत दारोदार नशिबें सांगत हिंडावें लागलें नसतें. पण एखाद्या देवळांत राहून सुग्रास अन्न व मोलवान् अंगावर कपडा मिळविण्यापलीकडे, त्यांच्या कर्तबगारीची धांव गेली नसती. छत्रपतींना असल्या भाषा पसरायला नको होत्या. काय सांगावें ! चांगलासा एक शब्द आठवूं नये अशा चांगल्या मुशींतून ती मूस ओतली गेली होती. तिच्यांतील तेज असाधारण होतें. त्या तेजाला ढोंग करून अज्ञान लोकांना निजदासानुदास बनविण्याची गरज नव्हती. त्याचा प्रभावच असा होता कीं, अज्ञान्यांनीं व सज्ञान्यांनीं तल्लीन

व्हावें. त्याखेरीज कां राज्यलक्ष्मीनें छत्रपतींच्या गळ्यांत माळा घातली ? अशा तेजस्वी पुरुषानें निष्कारण ढोंग केलें असेल असें ह्मणणें, ह्मणजे छत्रपतींत केवढें वैगुण्य आणणें आहे ?! या पढतमूर्खांच्या या आरोपानें, छत्रपतींची किती तरी किंमत कमी होते ! पतितानों, तुह्मी दुर्दैवानें ईशनिष्ठेला अंतरलात, त्यासंबंधांत जन्मांध निपजलात, ह्मणून छत्रपतीसारख्या पुण्यात्म्याला ढोंगी करूं नका ! त्या धर्मात्म्याला ढोंग करण्याचें कांहीं एक कारण नव्हतें. तो सत्यभक्त होता ह्मणून तर आपल्याकडे सर्व महत्त्व घेण्याची हाव न धरतां, प्रांजळपणें देवीच्या कृपेला महत्त्व देत होता, हें तुह्माला कसें कळत नाहीं ? या पढतमूर्खांचीं हृदयें कशानें बनविलीं असतील, असें अनेक वेळां मनांत येतें ! छत्रपतींच्या बहुतेक सर्व गुणांना ते मानतात, समर्थ रामदासस्वामींना वंदन करतात, पण या दोघांचाही ज्या ज्या ठिकाणीं असाधारण कृत्यांशीं संबंध येतो, तेथें तेथें मुस्कुटें फिरवितात ! असले जन्मांध, झाले इतके कुसदुणे होवोत, असलीं विषारी बांडगुळें आपल्या पुराण धर्म—वृक्षावर पुढें न निपजोत, अशी सर्वांनीं परमेश्वरापाशीं प्रार्थना करावी ! असो. हें जें मध्यंतरीं अंजन उगाळावें लागलें, तें पुढची गोष्ट सांगण्याकरितां होय.

छत्रपतीनीं या सुमारास एके दिवशीं सद्भावानें देवीची पूजा करून निष्ठापूर्वक अनन्यभावानें पुढील भविष्याविषयीं विचारलें असतां, तिनें सांगितलें कीं, शिवराया आतां तुझ्या वैभवाला भरती येण्याचे दिवस

आले आहेत. यापुढें तुला अपयश असें कोठें येणार नाहीं. ज्या ज्या कार्याला हात घालशील, त्यांत रिद्धी सिद्धी तुझ्या सेवेला उभ्या आहेत असें तुला दिसून येईल. अशा प्रकारची भाप पसरणें सोपें होतें, पण घडवून आणणें किती तरी अवघड होतें ? पण हें जें देवीनें छत्रपतींना सांगितलें, त्याप्रमाणें घडून येत गेलें, हें वाचकांच्या दृष्टीस पडेल !

## व्यवस्था–निरीक्षण.

प्रतापराव व निराजीपंत यांजबरोबर चाकरनाम्याप्रमाणें पांच हजार सैन्य देऊन त्यांना मोअझिमकडे पाठविल्यावर, वऱ्हाड व खानदेश येथील व्यवस्थेकरितां रावजी सोमनाथ यास तेथील सुभेदारी देऊन पाठविल्यावर, गोवळकोंडें व विजापूर इकडच्या कामगिरींत यशस्वी झाल्यावर, मथुरेहून संभाजीला आणून पेशव्यांच्या तिघांही मेव्हण्यांना योग्य कामगिऱ्या दिल्यावर, दिल्लीहून रायगडास येतांना झालेल्या वनवासदुःखांत कष्टमय सेवा केलेल्या एकनिष्ठ सेवकांचें अंशतः उतराई झाल्यावर आपल्या राज्यव्यवस्थेचें निरीक्षण करण्यास छत्रपतींना चांगली फुरसत सांपडली. परकीय इतिहासकारांच्या लिहिण्याचा झोक येथपर्यंत छत्रपतींचें इकडे लक्ष नव्हतें असा आहे. पण वस्तुस्थिति अशी नव्हती. त्यांचे लहानपणचे गुरु दादोजी कोंडदेव यांनीं त्यांना जें वळण घालून दिलें होतें, तें दूरदृष्टीनें घालून दिलेलें होतें. तें चांगलें पायाशुद्ध होतें. आणि त्यांच्या छात्रानें ह्मणजे आपल्या कथानायकानें तें विनचूक गिरविलें होतें. मुलुख उजाड प-

डूं देऊं नये, शेतकऱ्यांना हरप्रसंगीं मदत करून त्यांना आपलेसे करून ठेवावेत, निमताने व धारे बांधून टाकावेत, एकाच्या हातीं कारभार देऊं नये, हे दादोजी कोंडदेवाचें उपदेश छत्रपतींनीं जसे ध्यानांत ठेवले होते, तसाच हजार खर्चायचे तेथें आठशें खर्चून दोनशें शिल्लक टाकावेत व फाजील विश्वास कोणावर ठेवूं नये, हा त्यांचा कोंकणस्थी गुरुमंत्र छत्रपतींनीं शेवटपर्यंत ध्यानांत ठेवला होता. बाळाजी विश्वनाथापर्यंत कोंकणस्थांत कोणी नांव घेण्यासारखा झाला नव्हता, हे कोंकणस्थ कानामागून येऊन तिखट झाले, असें पुष्कळांचें ह्मणणें आहे ! पण त्यांनीं हें ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं, आपल्या स्वराज्य स्थापनकर्त्याचा गुरु कोंकणस्थ होता. तो समाधानी होता, किंवा छत्रपतींना त्याचें उत्तम शिक्षण मिळायचें होतें, म्हणूनच त्यानें पुढें धांव मारण्याची हाव धरली नसावी असें वाटतें. छत्रपती कुशाग्रबुद्धीचे असल्यामुळें, जहागिरीची चांगली व्यवस्था ठेवण्याच्या मिळालेल्या शिक्षणावर, त्यांनीं मिळविलेल्या राज्याची उत्तम व्यवस्था राखली ही गोष्ट निर्विवाद आहे. गुरूंना आपल्या बुद्धिवैभवानें थक्क करून सोडणाऱ्या शिष्यांपैकीं छत्रपती एक होते, ही गोष्ट कोणालाही नाकबूल करतां यायची नाहीं. छत्रपतींचें अनेकप्रकृतिज्ञान त्यांच्या इतर गुणांप्रमाणेंच असाधारण असल्यामुळें त्यांनीं आपल्या पदरीं मोठ्या विचक्षणेनें लोक ठेवले होते. आपल्या सध्यांच्या सुधारलेल्या ह्मणविणाऱ्या राज्यकर्त्यांनीं राज्यव्यवस्थेच्या संबंधांत फुशारकी मारायला नको

आहे. गुरु दादोजी कोंडदेवांच्या वळणाप्रमाणें राज्यव्यवस्थेची त्यांनीं जी शिस्त घालून दिली होती, ती अनेक कारणामुळें पुढें टिकली नाहीं हें आपलें दुर्दैव समजलें पाहिजे. छत्रपतींची अष्ट प्रधानांची योजना किती तरी दूरदर्शित्वाची होती. या योजनेनें कामाची वांटणी होऊन राज्यव्यवस्थेंत कामाचा घोंटाळा होत नसे. सैन्याकडची छत्रपतींची व्यवस्था स्पृहणीय होती. दहा शिपायावर एक नाईक, अशा दहांच्या पांच टोळ्यांवर एक, शंभर शिपायांच्या दहा टोळ्यांवर एक मुख्य, शंभरांच्या पांच टोळ्यांवरचा मुख्य निराळा, याप्रमाणें त्यांचें सैन्य अगदीं बांधलेलें होतें, व तें सर्व पगारी होतें. सैन्यांतील लोकांचे पगार चांगले असल्यामुळें ते खुषी असत. सैन्यानें केलेल्या लुटीवर त्याची मालकी नसे. केलेली लूट सैन्याला सरकारजमा करावी लागे. छत्रपतींचें बहुतेक सर्व सैन्य मराठे लोकांचें होतें. त्यांतील मोठमोठ्या जागांवर ब्राह्मण, परभू वगैरेही असत. छत्रपतींच्या दप्तरामध्यें व जमाबंदीकडे बहुतेक ब्राह्मण नोकर असत. मुत्सद्दीगिरी ब्राह्मणांकडेसच होती. सारांश छत्रपतींना स्वराज्यस्थापनेंत ब्राह्मणांचा उपयोग दोहींकडे झाला. शेतकऱ्यावर जुलूम न होऊं देण्याकडे छत्रपतींचें विशेष लक्ष असे. त्यांची सर्व नौकरांवर विशेष जरब असे आणि त्यामुळें सर्व कारभार व्यवस्थित होत असत. आपण घालून दिलेल्या शिस्तीप्रमाणें सर्वत्र व्यवस्था चालल्या आहेत कीं नाहींत व त्यांत कांहीं फरक केले पाहिजेत कीं काय, हें स्वतः पाहण्याची छत्रपतींना उत्कंठा व्हावी;

परंतु कार्यबाहुल्यामुळें बारीकपणें पाहण्यास फुरसत सांपडूं नये, असें कित्येक दिवस चाललें होतें. छत्रपतींना शांततेची अशी ही वेळ मात्र सांपडली, व त्यांनीं सूक्ष्म रीतीनें आठरा कारखान्यांचें निरीक्षण करून जीं माणसें हुषार दिसलीं त्यांना श्रेष्ठ पदांस चढविलें आणि वाईट आढळलीं त्यांना कामांवरून दूर केलें अथवा लहान अधिकारावर घातलें. छत्रपतींनीं वनवासदुःखांत अत्यंत कष्ट केलेला राघोमित्र यांस आपला शरीररक्षक करून त्याच्या हाताखालीं दोन हजार लोक दिले. खजिन्यांत नेहमीं शिल्लक ठेवावयाची, इकडे छत्रपतींचें विशेष लक्ष असल्यामुळें, त्यांच्या सर्व राज्यव्यवस्थेंत रुक्षतेचा भाग मुळीं नव्हता. सर्व नौकरांचे पगार नियमित वेळीं होत असत. गांवोगांव सरकारी धान्याचीं कोठारें असत व त्यांतून आपत्तीच्या दिवसांत शेतकऱ्यांना दाणा घातला जात असे, यामुळें शेतकऱ्यांची उपासमार होत नसे. शेतकऱ्यांपासून शेताचा धारा धान्यरूपानें घेतला जात असे, व त्याच्या किंमतीप्रमाणें पैसे दिल्यास पैसेही सरकार जमा केले जात. देशांत वारंवार लढाया होत त्यांपासून मात्र प्रजेला त्रास होत असे. पण त्याला छत्रपतींचा इलाज नव्हता. येथें ही एक गोष्ट उल्लेख करण्यासारखी आहे. छत्रपतींच्या वेळेला लबाड, लुच्चे, केंसांनीं गरीबांचे गळे कापणारे लोक मुळींच नव्हते असें जरी ह्मणतां आलें नाहीं, तरी सध्यांच्या न्यायकचेऱ्यांची दाटी झालेल्या मनूंत या लोकांना जसा पूर आला आहे, तसा त्यावेळीं आलेला नव्हता हें खचित आहे. त्यावेळीं लोक दुष्ट-

कृत्याला व खोट्याला फार भीत असत. असा प्रकार जवळ जवळ पेशवाईच्या अंतापर्यंत होता, हें ज्यांनीं ग्रामदेवतेच्या, तुळशीच्या, कुलदेवतेच्या साक्षींचे साध्या कागदावरचे पूर्वींचे कर्जरोखे पाहिले असतील त्यांना माहीत असेलच. मीं तर असें एक कर्जरोख्याच्या अर्थाचें पत्र पाहिलें आहे कीं, त्यांत तीन पंचपात्र्या रुपये आह्मीं तुमच्यापासून घेतले, एवढाच उल्लेख केलेला होता ! ही पूर्वींची आपल्या वाडवडलांची सत्यनिष्ठा आणि सध्यांचे न्यायकचेऱ्यांतील घेवींदेवींचे वाद, यांचा विचार करूं लागलें म्हणजे अंतःकरण सर्द होतें! अल्प काळांत हा असा फरक कशानें पडला असा प्रश्न उत्पन्न होतो, पण त्याचें समर्पक उत्तर पुढें न आल्यामुळें ' राजा कालस्य कारणम् ' हेंच सूत्र येथें लावावयाचें कीं काय असें दुःखानें वाटूं लागतें ! वाचकांनीं याचा शांतपणें विचार करावा. असो. छत्रपतींच्यावेळीं त्यांची प्रजा सत्यनिष्ठ असल्यामुळें त्यांना सध्यांसारख्या न्यायकचेऱ्या स्थापाव्या लागल्या नाहींत. चोऱ्या, मारामाऱ्या, दरोडे, उचले व बदमाष लोकांचे अपराध वगैरे फिर्यादी, गांवकामगारांकडे जात. छत्रपतींची द्रव्याशा आपल्या सध्यांच्या प्रभूसारखी किंबहुना कांकणभर अधिक होती; परंतु ' जनाची माय तो भूप आहे ' हें त्यांच्या हृदयांत वसत असल्यामुळें, अर्जाच्या डोक्यावर सरकारी तिकीट चिकटल्यावांचून त्याचें न्यायाधीशाच्या टेबलावर गमन नाहीं, असला न्यायाचा बाजार करण्याचें त्यांच्या मनांत कधीं आलें नाहीं. रयतेच्या पासून अनेक मार्गांनीं

निघेल तसा पैसा काढायचा, तिला कंगाल बनवायची हे अशिव विचार त्या शिवहृदयांत कधीं वागले नाहींत. असो. जमिनीसंबंधाचे, पूर्वापार चालत आलेल्या हक्कांसंबंधाचे वगैरे तंटे, गावांत जे शिष्ट असत त्यांच्या पंचायतीकडे न्यायाला जात. कित्येक गांवकामगारांकडेही जात. मोठे व भानगडीचे जे तंटे असत, ते छत्रपतींनीं नेमलेल्या सुभेदारांकडे जात. सुभेदारांच्याकडे त्यांचा न्याय न झाला, तर खुद्द छत्रपतींच्या दरबाराकडे ते येत. लोकांचे जातीसंबंधांचे जे तंटे असत, ते जातीजातींच्या पंचांकडे जात व त्यांच्याकडून त्यांचा न्याय होई. तात्पर्य त्यावेळीं वादांचे परिणाम सध्यांसारखे, वाद करणारांना अन्नाला मोताद करण्यास कारण होत नसत. छत्रपतींना पैसा काढण्याचा हा मार्ग न सुचावा, अशा तऱ्हेची विलक्षण अक्कल आपल्या प्रभूंनीं यांत खर्च केली आहे अशांतला भाग नाहीं. छत्रपतींत प्रजारंजनाची एक सदिच्छा वसत होती, ह्मणूनच त्यांनीं प्रजेला शोषून घेण्याच्या मार्गाचा विचार केला नाहीं. आपल्या सध्यांच्या प्रभूची प्रजारंजन ही इच्छा आहे, पण धनाशा तिच्याहून बलवती आहे असें आपणा प्रजाजनांची जी स्थिति दृष्टीस पडूं लागली आहे, तिच्यावरून ह्मणावें लागतें ! मुसलमानांच्या अमलांत प्रजेवर जे वेळोवेळीं जुलूम होत असत ते छत्रपतींच्या अमलांत होतनासे झाल्यामुळें, लोक त्यांचें अभीष्ट चिंतूं लागले. असो.

---

## ज्याच्या तंगड्या त्याच्याच गळ्यांत.

सुमारें दोन वर्षें दिल्लीचे बादशाहा अवरंगजेब व छत्रपती यांच्यांत सख्य राहिलें. छत्रपतींना स्वराज्य वाढविण्याविषयीं जरी उत्कट इच्छा होती, तरी त्यांनीं आपण होऊन सख्य मोडण्याचे प्रयत्न केले नाहींत. अवरंगजेब फार दिवस हें सख्य राहूं द्यायचा नाहीं हें त्यांना पक्कें माहीत होतें, आणि ह्मणूनच त्यांनीं सख्य मोडल्याचा दोष आपल्याकडे घेतला नाहीं. त्यांनीं मोअझिम व जसवंतसिंग यांच्याशीं मात्र अत्यंत स्नेहाचें वर्तन ठेवलें होतें. असें करण्यांत त्यांचा एक मोठा हेतु होता. व तो त्यांचा हेतु सफल झाला. अवरंगजेबानें छत्रपतींबरोबर हें जें सख्य केलें होतें, तें शुद्ध भावानें केलें नव्हतें. शिवाजीचा आपल्यावर विश्वास बसूं द्यावा आणि त्याला एके दिवशीं अलगत कैद करून आपला दक्षिणचा एक प्रबल शत्रु नाहींसा करावा, हा शठभाव त्याच्या सख्य करण्यांत होता ! पण त्याच्या मनांत हें वागत नव्हतें कीं, ज्याला आपण जाळ्यांत धरूं पहात आहोंत, तो एकदां फसला असतांना फिरून फसून आपल्या जाळ्यांत कसा येईल ? ह्मटलें असतां हें त्याच्या मनांत वागलें पाहिजे होतें. कारण छत्रपतींच्या विषयीं त्याला आतां पुष्कळ माहिती झाली होती. त्यानें वऱ्हाड व खानदेश यांतील मुलूख छत्रपतींना दिल्यावर, मोअझिमला लिहिलें कीं, तुह्मीं शिवाजीराजांचा तुमच्यावर पूर्ण विश्वास बसेल अशा प्रकारें त्यांजबरोबर स्नेहानें वागावें. छत्रपतींना जो हेतु साधायचा होता त्याच्या करितां ते

मोअझिम याजबरोबर पूर्ण स्नेहानें वागत होतेच. आपला पुत्र आपण त्याला लिहिल्याप्रमाणें शिवाजी राजांच्या बरोबर स्नेहानें वागतो कीं नाहीं, याची अवरंगजेबानें चवकशी ठेवली होती व तो, शिवाजीराजे आपण पसरलेल्या या जाळ्यांत सांपडणार असे मनीं मांडे खात होता. या प्रख्यात शहाण्या बादशहानें लढाईची दगदग न पडतां शिवाजीराजे आपल्या हातांत यावेत ह्मणून आपल्या मुलाला, तूं माझ्या विरुद्ध बंड कर असेंही लिहिलें होतें. मोअझिमाला आपल्या विरुद्ध बंड करण्यास सांगण्यांतला अवरंगजेबाचा हेतु, गुप्त शत्रू कोण कोण आहेत हें कळावें असा होता असें कित्येक इतिहासकारांचें ह्मणणें आहे. अवरंगजेबाच्या दक्षिणेकडील सरदारांपैकीं एकटा दिलेरखान मोअझिमाला मिळाला नाहीं. यावरून अवरंगजेबाच्या लोकप्रीतीची बरीच परीक्षा झाली असें ह्मणण्यास हरकत नाहीं. असो.

अवरंगजेबानें, शिवाजीराजे यांच्याबरोबर सख्य केल्याला दोन वर्षें झालीं नाहींत तोंच मोअझिमाला शिवाजीला धरून कैद करण्याबद्दल पत्र लिहिलें ! मोअझिम अवरंगजेबाचा मुलगा, पण छत्रपतींनीं त्याला आपल्या वशीकरणविद्येनें इतका आपलासा करून ठेवला होता कीं, मोअझिमाला वडलांच्या पत्राप्रमाणें कपटानें छत्रपतींना कैद करावें असें वाटलें नाहीं ! त्यानें आपल्या वडलांचें सर्व विचारविलसित छत्रपतींना कळविलें. छत्रपतींच्या विरुद्ध जायचें नाहीं, त्यांच्याशीं कायमचा स्नेह ठेवायचा, हा मोअझिमाचा पक्का नि-

श्चय झालेला होता व छत्रपतींच्या मनांतही त्याच्या विषयीं संशय नव्हता. छत्रपतींनीं, शठ अवरंगजेबानें आपल्या मुलाला आपल्या विरुद्ध बंड करायला सांगितलें आहे असें पाहून, अवरंगजेबाच्या तंगड्या त्याच्या गळ्यांत चांगल्याच घालण्याचा विचार केला. मोअझिमाला छत्रपतींनीं सांगितलें, ही वेळ तुमचें दैव उघडण्याची दिसत आहे. मग हात पाय हालवून कां पहात नाहीं? तुमच्या वडलांनीं त्यांच्या विरुद्ध तुह्माला बंड करायला सांगितलें आहे, तेव्हां तुह्मीं बंड केलेंत तर कांहीं त्यांचे अपराधी होत नाहीं. मग बंड करायला कोणती हरकत ? घडी बसलीच तर दिल्लीची गादी तुह्माला मिळेल. नाहींपेक्षां त्यांच्या दृष्टीनें तुह्मी निर्दोषी आहांच. कारण त्यांच्याच सांगण्यावरून तुह्माला बंड करायचें आहे. यांत तुह्माला मजकडून जी जी ह्मणून मदत होण्यासारखी असेल ती ती मी निष्कपटपणानें करीन. दिल्लीपदबादशाहा होण्याची छत्रपतींच्या ह्मणण्याप्रमाणें ही वेळ आहे खरी, आणि छत्रपती सारखा विजयध्वज आपला पाठीराखा असल्यावर दिल्लीपद मिळविणें कठीण नाहीं, हे विचार छत्रपतींच्या सांगण्यावरून मोअझिमाच्या मनांत घोळूं लागले. अल्पकाळांतच त्यांनीं आपली छाप मोअझिमावर बसविली. त्यानें अवरंगजेबाविरुद्ध बंडाचा पुकारा करून उत्तरेचा रस्ता धरला. मोअझिमाच्या बंडांत छत्रपती त्याच्या सैन्याबरोबर स्वतः होते, असें कित्येकांनीं ह्मटलें आहे, परंतु ही गोष्ट खोटी आहे. मोअझिमाच्या बंडाचा, जमावा तसा जम जमला असता, तर छत्रपती त्या-

च्या बरोबर स्वतः गेले असते. ते उतावळे नव्हते. पूर्ण विचारी होते. जमावा तसा जम जमला नाहीं असें पाहून ते मागें राहिले. मोआझिम इतका विचारी नव्हता. छत्रपतींनीं त्याच्या ओठाला जें मोठें मधाचें बोट लाविलें त्यावर जिभल्या चाटीत चाटीत, स्वबलाचा यत्किंचित् विचार न करितां त्यानें दक्षिणेंतून जी भरारी मारली तों तो थेट अग्रच्यापर्यंत जाऊन धडकला! आपणच बंड करायला सांगितलें, पण हें खरेंच आपल्याला भोंवतें कीं काय अशी अवरंगजेबाला दहशत पडली. त्यांतच छत्रपतींची मोअझिमाला मदत आहे असें अवरंगजेबाला समजलें! मग बिचाऱ्याच्या चित्ताची अस्वस्थता काय पुसावी? त्याचें अगदीं धाबें दणाणून गेलें. केलें तुला पण झालें मला; अशी अवरंगजेबाची स्थिति झाली! छत्रपतींशीं लढाई करण्याची दगदग व खर्च नको, अशा विचारानें अवरंगजेबानें हा व्यूह रचला, पण छत्रपती त्या कपटपटु बादशहाला सवाई मिळाल्यामुळें, त्याला आपल्या मुलाबरोबरच लढाई करण्याचा प्रसंग आला! मोअझिमाबरोबर लढाई करण्याकरितां अवरंगजेब स्वतः सेनाधिपतित्व पत्करून आला होता असें इतिहासकारांचें ह्मणणें आहे. आपण रचलेला व्यूह आपल्याच गळ्यांत आल्या सारखा झाला असें पाहून, अवरंगजेब क्रोधानें अगदीं लाल झाला. त्यानें छत्रपतींबरोबर लढाई करण्याची व त्याला जीवें धरून आणण्याची प्रतिज्ञा केली. अवरंगजेबानें तह मोडल्याबरोबर, छत्रपतींनीं आपले गेलेले किल्ले परत घेण्यास प्रारंभ केला.

## गड घेतला पण सिंह पडला.

पुण्यापासून नऊ कोसांवर असलेला सिंहगड किल्ला भारी बळकट व चांगल्या मान्याचा. हा किल्ला सतत आपल्या हातीं रहावा अशी अवरंगजेबाची इच्छा होती. त्यानें या किल्यावर त्याचें रक्षण करण्याकरितां शूर रजपूत सरदार उदेभान याच्या हाताखालीं निवडक रजपूत सैन्य ठेवून त्याची योजना करविली होती. अवरंगजेबानें तह मोडल्यावर छत्रपतींच्या दरबारांत त्यांच्या शूर सरदारांनीं अमुक किल्ला मी घेईन, अमुक मी घेईन अशा प्रतिज्ञा केल्या; त्यांत छत्रपतींचा बाळपणचा मित्र निधड्या काळजाचा तान्हाजी मालुसरा यानें सिंहगड मी घेईन असा विडा उचलला. हा किल्ला आपल्याकडे असावा अशी छत्रपतींना इच्छा असणें स्वाभावीक होतें. त्यांत हा किल्ला प्रथम छत्रपतींकडे असून मुसलमानांनीं घेतला होता, ह्मणून तो परत घेण्याविषयीं छत्रपतींना भारी उत्कंठा होती. तान्हाजीनें प्रतिज्ञेचा विडा उचलल्यावर आपले रणशूर हजार मावळे बरोबर घेऊन सिंहगडाची वाट धरली. किल्ल्याच्या तळाशीं पोंचल्यावर त्यानें विचार केला कीं, आपण आपल्या लोकांसह दिवसां किल्ला चढायला लागूं, तर किल्ल्यावरचे लोक तोफा डागायला सुरवात करून आपल्याला बोटभर देखील वर चढूं देणार नाहींत. त्याचे मावळे शिपाई डोंगरचे चांगले माहितगार. डोंगर चढायला रात्रीची देखील त्यांची केव्हांही तयारी. तेव्हां तान्हाजीनें रात्रीं जाऊन किल्ला सर करण्याचा विचार ठरविला. रात्रीं तान्हाजी डोंगर चढून वर गेला. त्याचे

लोक किल्ल्याच्या भिंतींना शिड्या लावून वर चढत असतां, रजपूत शिपायांना त्यांची चाहूल लागली. मावळे आले, अशी ओरड होतांच किल्यावरचे सर्व लोक लढाईला उभे राहिले. लागलींच महाभयंकर हातोहातीच्या लढाईला सुरवात झाली. किल्ल्याचें रक्षण करणाऱ्या रजपूत शिपायांनीं आपल्या शौर्याची शिकस्त केली. उदेभानानें किल्ला आपल्या हातचा जाऊं नये ह्मणून जिवाची आशा सोडून शूर तान्हाजीशीं गांठ घातली. दोघांचें भीमदुर्योधनासारखें द्वंद्वयुद्ध झालें. दोघे सारख्या तोलाचे लढवय्ये असल्यामुळें कोणी कोणास हार जाईना. शेवटीं दोघेही पडले. उदेभान पडल्यामुळें रजपूत शिपायांत गोंधळ उडाला. तेथपर्यंत विजयी कोण होतात हें समजायला मार्ग नव्हता. दोघेही सारख्या शौर्यानें लढत होते आणि दोघांकडे सारखा प्राणनाश होत होता. तान्हाजीचा भाऊ सूर्याजी त्याच्याबरोबर होताच, त्यानें बंधू मेल्याचें दुःख न करितां, शिल्लक राहिलेल्या मावळ्यांस उत्तेजन देऊन निकराची लढाई चालविली आणि अवशिष्ट राहिलेल्या रजपूत शिपायांस दांतीं तृण धरायला लावून किल्ल्यावर छत्रपतींचा भगवा झेंडा रोवला !

छत्रपतींना सिंहगड सर झाल्याचें वर्तमान समजलें, तेव्हां शूर तान्हाजीच्या मृत्यूनें त्यांच्या नेत्रांतून दुःखाश्रू वाहूं लागले. ते ह्मणाले, किल्ला कधींही हस्तगत करितां आला असता; पण मित्र तान्हाजी गेला तो पुन्हा मिळेल का ? ! असो. छत्रपतींनीं सूर्याजीनें तान्हाजी मेला असतां धीर न सोडतां किल्ला सर केला

ह्मणून त्याची वाहवा केली व त्याला पोषाख व बहुमोल अलंकार दिले. याखेरीज सिंहगडच्या लढाईंतून आलेल्या सर्व शिपायांस एक एक रुप्याचें कडें दिलें. सिंहगड हस्तगत झाल्यावर छत्रपतींच्या शूर सरदारांनीं गेलेले बरेच किल्ले व मुलूख परत घेतला.

## विजापूरकर विथरले.

अवरंगजेबाचा व छत्रपतींचा तह मोडला जाऊन दोघांत लढायांना सुरवात झाली असें पाहून, विजापूरकरांना आपल्या मानाची आठवण झाली. छत्रपतींच्या बरोबर आपण लढाईला पुरणार नाहीं असें लक्षांत आणून त्यांनीं खंडणी देण्याचें कबूल केलें होतें. परंतु छत्रपतींना खंडणी देण्यांत आपला अपमान होत आहे हें त्यांच्या मनांत डाचत होतें. छत्रपतींना आतां मोठा शत्रु झाला आहे असें पाहून, त्यांनीं आपले गेलेले किल्ले व मुलूख परत घेण्याचा विचार चालविला. विजापूरकरांचा वजीर रुस्तुमजमा हा स्वतः बरोबर आठ हजार सैन्य घेऊन रांगणा किल्ला व त्याच्या भोंवतालचा मुलूख सर करून येतों अशी प्रतिज्ञा करून विजापुराहून निघाला. रांगण्यावर छत्रपतींचे लढाऊ लोक होतेच. किल्लेदारानें मोठ्या धीरानें रुस्तुमजमा याजबरोबर लढाई चालविली. छत्रपतींना ही बातमी समजतांच त्यांनीं कांहीं सैन्य किल्लेदाराच्या मदतीला पाठवून दिलें. रुस्तुमजमा किल्ला हस्तगत करण्याच्या इच्छेनें मोठ्या शर्थीनें लढत होता, परंतु किल्लेदारानें त्याला दाद दिली नाहीं. छत्रपतींनी पाठविलेली मदत येऊन पोंचल्यावर तिनें विजापूरकरांच्या वजिरास, आ-

पण कोठून या लढाईच्या भानगडींत पडलों इतका जेरीस आणला. शेवटीं त्यानें एक निकराची लढाई केली, तींत रुस्तुमजमाला छत्रपतींच्या शूर शिपायांनीं अल्लाच्या भेटीला पाठवून त्याच्या सैन्याची दाणादाण करून सोडली. विजापूरकरांनीं ह्मटलें असतां, झालेल्या या त्यांच्या नुकसानावरून थोड्यांत शहाणे व्हायचे आणि छत्रपतींची क्षमा मागून त्यांना पूर्ववत खंडणी द्यायला लागून स्नेह कायम ठेवायचा. पण आपली कितीक दिवसांची बादशाही, शिवाजी हा आपल्या पदरच्या एका सरदाराचा मुलगा, त्याला खंडणी द्यायची हा आपल्या बादशाहीचा केवढा अपमान, असल्या मानापमानाच्या विचारांत विजापूरकर असल्यामुळें, त्यांनीं लढाईचेच विचार चालविलें. जंजिऱ्याचा शिद्दी हा विजापूरकरांचाही मांडलीक, त्याला त्यांनीं छत्रपतींच्या कोंकणांतल्या मुलखांत पुंडाई करण्यास सांगितलें. सारांश छत्रपतींना आतां तिघां शत्रूंबरोबर लढण्याची तयारी करावी लागणें भाग पडलें.

## सुरत शहरावर स्वारी.

आपला खजिना भरलेला आहे, तर कितीही शत्रू उठले तरी त्यांचें निवारण करितां येईल हें छत्रपतींचें मोठें धोरण होतें. आपल्या प्रजेला लुटून कोश भरायचा हें छत्रपतींचे ब्रीद नव्हतें. शत्रूचा मुलूख व शहरें लुटून आपल्या कोशाची भरती करण्यांत त्यांना पातक वाटत नसे. अवरंगजेब, विजापूरकर व शिद्दी यांच्या बरोबर लढतांना, पाण्यासारखा पैसा खर्च होईल हें त्यांना दिसत असल्यामुळें, त्यांनीं पैसा कोठून

अधिक मिळेल याची बातमी आणण्याकरितां आपले गुप्त हेर परमुलखांत पाठविले होते. त्यांपैकीं बहिरजी नांवाचा त्यांचा एक गुप्त हेर सुरतेहून आला व त्यानें सांगितलें कीं, सुरत शहर लुटलें तर अगणित द्रव्य सांपडेल. सुरत शहर हें पैशाचें माहेरघर आहे, याचा अनुभव छत्रपतींना पहिल्या लुटीच्या वेळेस आलाच होता. यामुळें सुरत शहरावर स्वारी करावी असें त्यांच्या मनानें घेतलें.

आपण या आर्यभूमीचें खरे मालक आहोंत हा अभिमान छत्रपतींच्या हृदयांत वसत होता हें सांगायला नको आहे. ही सर्वभूमी परकीयांच्या सत्तेतून घ्यायला पुष्कळ काळ लागेल, पण तोंपर्यंत आपल्या मालकी हक्काबद्दल यांच्यापासून कांहीं घेत गेलें पाहिजे हा विचार छत्रपतींच्या मनांत फार दिवस घोळत होता. किती तरी उमदा विचार हा ! आपलेपणाचा केवढा हा अभिमान ! अरे ज्या रक्तमांसांनीं छत्रपतींचें व तत्कालीनांचीं शरीरें बनलीं होतीं, त्याच रक्तमांसाच्या शरीराचे आपण, त्यांचा धर्म तोच आपला धर्म, ते ज्या भूमींत वाढले तीच ही भूमी, ते जें अन्न खात होते तेंच अन्न आपण खात आहोंत, पण त्यांच्यांत व आपणांत किती किती तरी अंतर ! धिक्कार असो आपल्या परवशतेला ! त्या धन्यात्म्यांच्या आपलेपणांतील एक लेश तरी आपल्यांत असायचा होता ! आपण सद्यःकालीन आपल्याला सुविद्य म्हणवितों. आपल्या राज्यकर्त्यांच्या व आपल्या हिताकरितां, अलीकडे आपण राष्ट्रीय परिषद भरवीत असतों,

पण तिच्या मंडपाकरितां जर शेत जमीन घेतली, तर सरकारला निमूटपणें भाडें भरतों ! मग सर्व आर्यांपासून पैसा मिळवीत असलेल्या रेलवेनीं आपले मुखत्यार राष्ट्रीय परिषद् भरेल तेथें मोफत नेले पाहिजेत, अशी कल्पना आपल्या मनांत कोठून येणार ? ! खचित खचित पूर्वजांच्या आपलेपणाचा एक लेश जरी आपल्यांत असता, तरी वरच्या सारख्या गोष्टी आपण केव्हांच केल्या असत्या. पण त्या आपलेपणाचा आपल्याला गंधही नसल्यामुळें, एके जागीं जमून ऊर बडवून रडणाऱ्या मारवाड्यांच्या बायकांप्रमाणें यथास्थित रडण्यापलीकडे आपल्या हातून कांहीं होत नाहीं ! काय सांगावें ! आपल्या राष्ट्रीय परिषदेचे भक्त ह्मणविणाऱ्यांत कित्येक नुसत्या नांवाकरितां, आणि चार दिवस गंमत व चैन चालते म्हणून तिला जाणारे आहेत!

वरच्या कल्पना परस्वाधीनच्या आहेत, असें म्हणणारे पुष्कळ भेटतील. ते भेटावेत असाच हा काळ आहे ! पण आपलेपणाच्या दर्शक अशा आपल्या स्वाधीनच्या दुसऱ्या गोष्टी मुळींच नाहींत काय ? प्रत्यक्ष आपल्या कितीक स्वदेशबंधूंची उपासमार चालली आहे, पण त्यांची आपणाला कशी ती कींव येत नाहीं ! कित्येक तुपसाखरेंत घोळणारीं श्रीमंतांचीं कुलें अशीं दाखवितां येतील, कीं ज्यांचे आप्त उपाशी मरत आहेत. पण या तूपसाखरेंत घोळणारांना एक दिवस त्यांची आठवण होत नाहीं ! आळशी लोकांना फुकट काय ह्मणून अन्न घाला ? हें यावर ठरावीक उत्तर यायचें. पण असलें उत्तर देतांना मनाला शरम वाट-

त नाहीं कीं, आपल्या देशांत आपणाकरितां काम करीत असलेल्या मजुरांना आपण मजुरी देत नाहीं. कोट्यवधि रुपयांचें लुसलुशीत, गुळगुळीत व दिखाऊ विलायती कापड घेऊन परदेशीयांची धन करितों. त्यांतली एक पै स्वदेशबांधवांना देत नाहीं ! आपणांत जर यत्किंचित् स्वाभिमान असता, आपलेपणा असता, स्वजातिप्रीति असती, तर ही गोष्ट आपण मागेंच केली नसती काय ? जिथें आपलेपणा असतो तिथें महान् महान् कष्टांचा विचार केला जात नाहीं, हें या छत्रपतींच्या चरित्रांत ठिकठिकाणीं दिसून येत आहे. स्वदेशबंधूंना पारतंत्र्यांतून मुक्त करण्याकरितां, ज्याच्या कथा ऐकायला किंवा वाचायला रम्य, त्या युद्धाचे आजन्म कष्ट करणाऱ्या शिवरायांचें चरित्र वाचतांना, स्वदेशबंधूंचें कापड राठ निघतें ह्मणून आह्मी विलायती कापड घेतों, असें ह्मणणाऱ्या आपण लाजलें पाहिजे ! सुविद्य ह्मणवून घेतेवेळीं आपल्याला शरम वाटली पाहिजे ! परकीयांनीं आपल्या तोंडावर थुंकावें अशीच आपली ही विद्या नव्हे काय ? ! सुशिक्षणानें बांधवप्रेमा उत्पन्न व्हायचा कीं बांधववंचना ? ! वाचकहो, या गोष्टीचा विचार करा ! आतां याहून अधिक लिहवत नाहीं. असो !

मुसलमानी सत्तांपासून आपल्या जमिनीच्या मालकी हक्काबद्दल कांहीं घेत गेलें पाहिजे, हा विचार छत्रपतींच्या मनांत फार दिवस घोळत होता हें वर सांगितलें आहे. तो विचार साधेल तितका अमलांत आणण्याचा निश्चय या सुरतेच्या स्वारीवर निघतांना

छत्रपतींनीं केला. हा विचार अंशतः तरी सिद्धीस नेण्याची यावेळीं छत्रपतींना ताकद आली होती, ह्मणून त्यांनीं वरचा निश्चय केला हें उघड आहे. त्यांनीं आपल्या सैन्यापैकीं करोल वीस हजार सैन्य घेऊन सुरतेचा रस्ता धरला. सुरतेजवळ जाऊन पोहोंचल्यावर तेथें त्या शहराच्या रक्षणाकरितां जें सैन्य होतें तें छत्रपतींच्या बरोबर लढाईला उभें राहिलें. छत्रपतींच्या शूर सैनिकांनीं तेव्हांच त्यांची दाणादाण उडवून दिली. शहराचें रक्षण करणाऱ्या सैन्याचा पराभव केल्यावर ते आपले लोक घेऊन शहरांत शिरले व त्यांनीं एकसारखी लूट चालविली. छत्रपतींचें सैन्य तीन दिवस शहर लुटीत होतें. ही लुट करतेवेळीं स्त्रियांना कोणी हात लावूं नये, गरीबांना व्यर्थ त्रास देऊं नये, प्राणनाश करूं नये, घरें जाळूं नयेत, निष्कारण मोडतोड करूं नये, अशी छत्रपतींची त्यांच्या सैन्यांतील सर्व लोकांना सक्त ताकीद होती. छत्रपती आपला हुकुम मोडणारास अति कडक शासन करीत, त्यामुळें त्यांचा हुकूम मोडण्याची कोणाचीही छाती होत नसे. प्रत्येक लुटीच्या वेळेस छत्रपती आपल्या सैन्यांतील लोकांना वरच्यासारखी सक्त ताकीद देत, म्हणून त्यांच्या लुटींत स्त्रियांवर जुलूम व त्यांच्या अवहेलना, गरीबांची दुर्दशा, ह्मातारेकोतारे व मुलें यांचा छल आणि व्यर्थ प्राणनाश हीं होत नसत. ही सुरतेची दुसरी लूट छत्रपतींना पांच सहा कोटींची मिळाली. खेरीज या लुटींत त्यांना चार हजार घोडे सांपडले. सुरत शहर लुटल्यावर छत्रपतींनीं आपला फारा दिवसांचा हेतु

अंशतः सिद्धीस नेण्याकरितां खानदेशचा मुलूख बरा आहे असें मनांत आणून ते खानदेशांत शिरले. दाऊदखान वगैरे अवरंगजेबाच्या सरदारांनीं वणी दिंडोरी येथें छत्रपतींना गांठलें. पण छत्रपतींनीं जोरानें लढाई करून त्यांना पळायला लावलें. छत्रपतींनीं खानदेशांत लुटालूट चालविली आणि गांवउत्पन्नापैकीं जेथून आह्मांला चौथाई मिळणार नाहीं, तेथें आह्मी अशीच लूट चालवूं अशीं बोलणीं लाविलीं. छत्रपतींचा पराक्रम सर्वप्रसिद्ध झाला असल्यामुळें खानदेशांत बऱ्याच ठिकाणीं हा चौथाईचा अंमल बसला. पुढें या चौथाईचें उत्पन्न स्वराज्याला पुष्कळ होऊं लागलें हें बऱ्याच वाचकांना माहीत असेल.

## जंजिऱ्याच्या शिद्दीबरोबर लढाई.

विजापूरकरांच्या सांगीवरून कोंकणांत शिद्दीनें छत्रपतींच्या मुलुखांत पुंडाई सुरू केली होती. त्याचें पारिपत्य छत्रपतींना करावयाचें होतेंच, पण त्यांचा विचार कोंकणांत आपला अंमल जास्त वाढवावा, देसायांचा समाचार घ्यावा, आपलें आरमार वाढवावें व नवे किल्ले बांधावेत असा होता, ह्मणून त्यांनीं आपलें लक्ष तिकडे पुरविलें. त्यांनीं ब्राह्मण सरदार रघुनाथ बल्लाळ सबनीस यांजबरोबर पुष्कळ सैन्य व कोंकणचा अधिकार देऊन त्याला शिद्द्यावर पाठविलें. त्यानें शिद्द्यावर लागोपाठ हल्ले करून, त्याला अगदीं गाय बनविलें. रघुनाथपंताबरोबर पुढें लढाई चालविण्यास आपल्या अंगांत ताकद राहिली नाहीं, अशी जेव्हां शिद्द्याची खातरी झाली, तेव्हां त्यानें तहाचें बो-

ळणें लाविलें. रघुनाथपंतानें सर्व वृत्तांत छत्रपतींना कळवून शिद्द्याबरोबर तह करायचा किंवा पुढें लढाई चालवावयाची असें विचारिलें. छत्रपतींनीं त्याला शिद्द्याबरोबर तह करून, कल्याण, भिवंडी, राजापूर, हा मुलूख स्वराज्याला मिळविण्याच्या उद्योगाला लागावें असें लिहिलें. छत्रपतींच्या आज्ञेप्रमाणें रघुनाथपंतानें शिद्द्याबरोबर तह करून वर लिहिलेला कोंकणप्रांत, काबीज करण्याचे यत्न चालविले. शिवरायांच्या पुण्यप्रतापाचा प्रभाव मोठा. त्याला यापुढें कोठेंच अपयश नाहीं, मग ते कोंकणांत तरी कसें येणार ? रघुनाथपंत विजापूरकरांचीं एकेक ठाणीं उठवीत असतां, वर्षाकाल आल्यामुळें त्याला आपल्या सैन्याचा तळ एके ठिकाणीं देऊन स्वस्थ रहावें लागलें. पण रघुनाथपंताला कोंकणची हवा न सोसल्यामुळें, कांहीं विकार होऊन तो मृत्यु पावला !

वर्षाकाल संपतांच आपल्याला जेर केलेला रघुनाथपंत मेला, असें पाहून शिद्द्यानें फिरून धुंडाई आरंभिली. छत्रपती मोठे योजक होते. ब्राह्मणांची किंमत ते जाणून होते. मुत्सदगिरींत ब्राह्मणांची चातुरी पाहून त्यांना परमानंद होई. पण मुत्सदगिरी करून लढाईवर जायलाही तयारी, अशा कारकूनबच्चावरून आपला जीव ओवाळून टाकावा कीं काय असें त्यांना वाटे ! नुसती ज्या ठिकाणीं तलवार गाजवायाची असे, अशा कामगिरीवर ते आपल्या पदरच्या अनेक लढायांतून निभावलेल्या मराठे सरदाराला पदरचा एकादा कारकून बरोबर देऊन पाठवीत. पण ज्या ठिकाणीं तलवार

गाजवायाची असून आणखी इतर महत्त्वाचीं कामें करायचीं असत अशा कामावर ते ब्राह्मण सरदाराला पाठवीत. कोंकणांत लढाईशिवाय आणखी पुष्कळ महत्त्वाचीं कामें कर्तव्य असल्यामुळें, छत्रपतींनीं रघुनाथ बल्लाळ सबनीस या शूर व हुषार गृहस्थाला तिकडे पाठविला होता. त्याच्या मृत्यूची वार्ता ऐकून छत्रपतींना फार वाईट वाटलें ! त्याच्या योग्यतेचा दुसरा मनुष्य कोण पाठवावा, हा त्यांना विचार पडला. परंतु छत्रपतींना याचें संकट वाटावें अशी स्थिति नव्हती. त्यांच्या महत्पुण्याईनें, त्यांच्या पदरच्या मुत्सद्दी मंडळींत तूं पुढें कां मी पुढें अशा ईर्षेनें पुढें धांवणारे कारकूनबच्चे, पण प्रसंगीं नांव निघण्यासारखी तलवार गाजविणारे पुष्कळ होते. ज्यांना हातांत तलवार धरायची माहित नव्हती, असे त्यांच्या मुत्सद्दी मंडळींत कमी होते असें म्हटलें तरी चालेल. कोंकणांत व्यंकाजी दत्तो यांस पाठवावें असें पेशवे आदिकरून मंडळींनीं छत्रपतींना सुचविलें. आपल्या पदरच्या मंडळींत कोण कसा आहे, कोण कसा आहे, इकडे छत्रपतींचें बारीक लक्ष असेच. व्यंकाजी दत्तो हा कर्तबगार आहे, हें छत्रपतींना माहीत होतें. तेव्हां त्यांनीं कोंकणच्या कामगिरीवर त्याचीच योजना केली.

व्यंकाजी दत्तो कोंकणांत जाऊन पोंचल्यावर प्रथम त्यानें छत्रपतींच्या मुलखांत पुंडाई चालविलेल्या शिद्द्याची खोडकी मोडण्याचा विचार केला. रघुनाथपंताप्रमाणेंच व्यंकाजी दत्तोनें शिद्दीवर हल्लया मागें हल्ले करून त्याला अगदीं जेर केलें. नंतर छत्रपतींच्या

आज्ञेप्रमाणें त्यानें कोंकणांतली विजापूरकरांची सत्ता लयास पोंचविण्याचे प्रयत्न चालविले. व्यंकाजी दत्तो या शूर पुरुषानें थोड्याच दिवसांत विजापूरकरांचा कोंकणांतला मुलूख स्वराज्यांत सामील केला. त्या मुलखाचें आपल्या हातून चांगलें रक्षण व्हावें, ह्मणून छत्रपतींनीं त्यांत कित्येक किल्ले बांधण्यास सांगितलें. व्यंकाजी दत्तोनें छत्रपतींच्या आज्ञेप्रमाणें किल्ले बांधले, आणि लखमसांवत देसाई विजापूरकराबरोबर कारस्थान करीत होता, त्याच्या कृत्यांवर चांगलें लक्ष ठेविलें. हा देसाई विजापूरकरांना, मी तुह्मांला कोंकणप्रांत सोडवून देतों असें म्हणत होता. सावंत काय काय करीत आहे, याची डांक व्यंकाजी दत्तोकडून छत्रपतींकडे जात असे. छत्रपतींनीं व्यंकाजी दत्तो यास सांवताची खोडकी मोडण्याबद्दल आज्ञापत्र पाठविलें. त्यानें सांवताबरोबर लढाई सुरू करून आपल्या शौर्यानें त्याचा इतका मोड केला कीं, आतां कोणाचा आश्रय धरूं असें त्याला झालें ! तो फिरंग्यांकडे आश्रय मागण्याकरितां गेला, परंतु त्यांना छत्रपतींचा दरारा माहीत असल्यामुळें, त्यांनीं त्याला आश्रय दिला नाहीं. सांवताला कोठेंच जेव्हां आश्रय मिळेना, तेव्हां तो छत्रपतींना शरण आला. छत्रपतींनीं त्याचे सर्व अपराध क्षमा करून त्याला जहागीर करून दिली, व त्याच्या सरदारांना आपल्या पदरीं ठेविलें.

आपल्या पदरीं असावें तसें अरमार नाहीं, हें वैगुण्य छत्रपतींच्या लक्षांत होतें व तें नाहींसें करण्यासंबंधानें ते विचार करीत होते. परंतु मध्यंतरीं काल

प्रतिकूल आल्यामुळें, अरमारासंबंधाचे त्यांचे विचार इतर विचारांप्रमाणेंच मनच्या मनांत राहिले होते. परंतु आतां त्यांनीं कांहीं जहाजें आयतीं खरेदी घेतलीं, व पुष्कळ नवीन तयार करविलीं. मिळून छत्रपतींपाशीं सातशें जहाजें झालीं. या जहाजांवर तीन आरमारांचे सरदार नेमिले. परकीयांना आपल्या पदरीं ठेवायचे नाहींत असा अगदीं प्रारंभाला छत्रपतींचा आग्रह होता. परंतु हा आग्रह त्यांनीं फार दिवस धरिला नाहीं, हें वाचकांस प्रथम गुच्छांतच समजलें आहे. सांगायचें कारण, छत्रपतींनीं आपल्या आरमारावर जे तीन सरदार नेमले होते, त्यांत मायनाईक भंडारी हा एकटा हिंदु होता. दुसरे दोघे, दर्यासागर सुभेदार व इब्राईमखान, हे मुसलमान होते. सारांश, जातीपेक्षां विश्वासुपणाकडे व गुणाकडे लक्ष देणें इष्ट, हें छत्रपती जाणून होते. छत्रपतींचे हे तिघे आरमारावरचे सरदार, चांचेपणा करीत आणि त्यामुळें छत्रपतींना पुष्कळ फायदा होत असे. कोठें आधिक पैसा मिळेल याचा शोध आणण्याकरितां, छत्रपतींनीं आपले गुप्त हेर परमुलुखांत पाठविले, असें मागें सांगितलेंच आहे. त्यांतल्या एका हेरानें, शिवाप्पा नाइकाच्या बसनुरांत पुष्कळ संपत्ति सांपडेल असें सांगितलें. तेव्हां छत्रपतींनीं आपलें सैन्य जहाजांतून नेऊन बसनूर लुटलें. तेथें दोन कोट होनांची संपत्ति सांपडली. असो.

## अवरंगजेबाची घमेंड जिरली.

अजूनपर्यंत दक्षिणची सुभेदारी, अवरंगजेबानें त्या-

चा बंद केलेला पुत्र मोअझिम याजकडेच ठेविली होती. छत्रपतींचा व त्याचा स्नेह आतां संपला होता, हें ज्याअर्थीं छत्रपतींनीं सुरत शहर लुटलें, आपले बहुतेक किल्ले व मुलूख लढाया करून परत घेतला, खानदेशांत धुमाळी उडवून कांहीं ठिकाणीं चौथाईबाब बसविली, त्याअर्थीं निराळें सांगायला नको आहे. छत्रपती आपलें राज्य वाढवीत आहेत हें वर्तमान अवरंगजेबाला जाऊन पोहोंचत होतें, परंतु त्याचा आतां मोअझिमावर विश्वास बेताचाच असल्यामुळें, त्याच्यानें मोअझिमाच्या हाताखालीं अधिक सैन्य पाठवून देववत नव्हतें. मोअझिमाच्या हाताखालीं दक्षिणेंत जें सैन्य होतें, तें छत्रपतींच्या वाढलेल्या सैन्याबरोबर लढाई करण्यास असमर्थ होतें. छत्रपतींच्या सैनिकांनीं अवरंगजेबाच्या सैन्याला अगदीं जेर करून सोडलें होतें. या वेळीं छत्रपतींच्या सरदारांत कांहीं विलक्षण वीरश्री संचरली होती. ते जिकडे जात तिकडून फत्ते करून येत. बसनूर लुटल्यावर छत्रपतींनीं, औरंगाबाद लुटून औरंगजेबाला पुरा खिजवावा असें मनांत आणलें, व त्यांनीं आपलें सैन्य औरंगाबादेकडे पाठविलें. औरंगाबाद येथें असलेल्या मोअझिमाच्या सैन्यानें छत्रपतींच्या सैन्याबरोबर निकराची लढाई केली. परंतु सूर्यराव कांकडे, गोमाजी नाईक पानसंबळ, बहिरजीनाईक इंगळे, मानसिंग मोरे, रामाजी पांगेरी, भुजबलराव, आनंदराव निंबाळकर, रावपाटील यशवंतराव, बाजीराव दरेकर, तानाजी डुंदुसकर, दादाजी बापूजी या घोडेस्वारांच्या व पायदळांच्या रणशूर सरदारांनीं

सेनापति प्रतापराव यांच्या उत्तेजक पराक्रमाचें अनुकरण करून मुसलमानांच्या सैन्याला पळतां भुई थोडी केली. मग त्यांनीं औरंगाबादची पेठ शांतपणें लुटली. या लुटींत ह्मणण्यासारखी संपत्ति सांपडली नाहीं. पण संपत्ति सांपडेल या इच्छेनें छत्रपतींनीं औरंगाबादची पेठ लुटविली नव्हती. आपल्या सैन्याची तयारी चांगली झाली आहे, आतां स्वतः अवरंगजेब जरी आपल्या बरोबर मोठें सैन्य घेऊन दिल्लीहून आला, तरी त्याचा आपण चांगला समाचार घेऊं, असें छत्रपतींना वाटूं लागलें होतें. कारण त्यांनीं आपलें सैन्य इतकें वाढविलें होतें कीं, किल्ले, ठाणीं येथील सैन्य न हालवितां लढाईवर जवळ जवळ पन्नास हजार सैन्य नेण्याची त्यांची तयारी झाली होती. त्यांच्या सैन्यांत तोफांची मात्र कमताई होती. पण तसा प्रसंग आलाच, तर तोफांची उणीव पडून पदरीं अपयश येऊं नये ह्मणून गोवळकोंड्याच्या बादशहाशीं त्यांनीं आपला स्नेह कायम ठेवला होता. त्याच्यापासून त्यांना तोफा मिळण्यास मुळीं नड पडली नसती. आणि याचा अनुभव पुढें आलेला आहे. आपल्यापाशीं कुबेरासारखी संपत्ति असावी या इच्छेनें छत्रपती लुटी करीत नसत. त्यांना आपल्या पदरीं पुष्कळ सैन्य ठेवणें जरूर होतें, पण मुलखाच्या वसुलांतून इतकें सैन्य ठेवतां येणें अशक्य होतें, तेव्हां त्यास लुटी करणें भाग पडे.

छत्रपतींच्या संबंधाच्या सर्व बातम्या अवरंगजेबाकडे जात. परंतु तो आपल्या बादशाही जोरांत होता. शिवाजी वाढला ह्मणून किती वाढणार, बेडूक फुगला

ह्मणून कांहीं हत्ती होत नाहीं, या घमेंडींत अवरंगजेब होता. मोआझिम, त्याजपाशीं आहे तेवढ्या सैन्यांत शिवाजीला बांधून आणील, अशीही अवरंगजेबाला आशा होती. पण औरंगाबादेची पेठ छत्रपतींनीं लुटल्याचें जेव्हां त्याच्या कानावर गेलें, तेव्हां मोआझिमाच्या मदतीला दक्षिणेंत सैन्य पाठविलेंच पाहिजे अशी त्याच्या मनाची खातरी झाली. व त्यानें मोहोबतखानाला बरोबर चाळीस हजार लोक देऊन दक्षिणेंत पाठविण्याचा बेत ठरविला.

औरंगाबादेची पेठ लुटल्यावर छत्रपतींचें सैन्य कारंजाकडे वळलें. तेथें जाऊन त्यानें तें लुटलें. कारंजाहून छत्रपतींचें सैन्य परत येत असतां, दिलेरखान, बहादूरखान एरवलासखान वगैरे अवरंगजेबाच्या मुसलमान सरदारांनीं मोठ्या त्वेषानें छत्रपतींच्या सैन्यावर हल्ला केला. छत्रपतींच्या सैनिकांची इच्छा समोर उभें राहून लढाई देण्याची होती. परंतु दिलेरखानानें लढाईला समोर उभें न राहतां, छापे घालून छत्रपतींच्या सैन्याला जेर करायचें असें आपल्या सरदारांत ठरविलें होतें. छापे घालून शत्रूला रडकुंडीला आणायचें, ही विद्या ज्या छत्रपतींच्या सैनिकांना करतलामलकवत झालेली, त्यांच्या सैन्यावर मुसलमान सरदार छापे घालून त्यांना जेर आणणार, हें व्हावें कसें ? मुसलमान सरदारांचा आपल्यावर छापे घालण्याचा बेत झाला आहे असें पाहतांच, छत्रपतींच्या शूर सरदारांनीं आपल्या टोळ्या फोडून, एकेक मुसलमान सरदाराची पाठ धरून त्यांची दुर्दशा उडविली. एक काय

तो दिलेरखान मात्र पळून गेला नाहीं. बाकीचे सर्व मुसलमान सरदार पळून गेले. दिलेरखान मात्र छत्रपतींचें सैन्य भीमेच्या अलीकडे येईपर्यंत छापे घालून आपल्याकडून होईल तितकें नुकसान करूं पहात होता. पण त्याच्या एकट्याच्या सैन्याच्या छाप्यांनीं छत्रपतींच्या सैन्याचें किती नुकसान होणार ? त्याच्या सैन्याचा छापा आला कीं, छत्रपतींचे शूर सैनिक उलट मारा करून दिलेरखानाच्या सैन्याला पळायला लावीत. तरी दिलेरखानानें जो त्रास दिला, तो छत्रपतींच्या कित्येक शूर सरदारांच्या मनाला लागून राहिला होता. थोडक्याच दिवसांत रामाजी पांगेऱ्यानें व आणखी एक दोन छत्रपतींच्या सरदारांनीं दिलेरखानाला गांठून, त्याजबरोबर लढाई करून तींत त्याचा अगदीं मोड केला. तिकडे मोरोपंत पेशव्यांनीं कोळवण स्वराज्याला मिळवून दिलें. रामनगर जवाहीर प्रांत छत्रपतींच्या दुसऱ्या कित्येक सरदारांनीं हस्तगत केला. छत्रपतींनीं खानदेशांत चौथाई वात्र सर्वत्र बसविण्याकरितां आपल्या पराक्रमी सरदारांच्या हातांखालीं सैन्य देऊन त्यांना पाठविलें. त्यांस छत्रपतींनीं आज्ञा केली कीं, खानदेशांत आवडा व सालहेर हे दोन किल्ले बळकट आहेत ते हस्तगत करून घ्या. हे दोन्ही किल्ले छत्रपतींच्या सैनिकांना आपल्या शौर्याची परमावधी केल्याशिवाय घेतां आले नाहींत. तात्पर्य किल्लेदारांनीं हे किल्ले मोठ्या धैर्यानें लढविले.

वर सांगितल्याप्रमाणें छत्रपतींच्या सरदारांनीं अवरंगजेबाच्या दक्षिणेंतल्या सत्तेची व मुसलमान सरदा-

रांची दशा उडविल्यावर, दिल्लींहून चाळीस हजार सैन्य बरोबर घेऊन निघालेला मोहबतखान दक्षिणेंत येऊन पोंचला. तेव्हां मुसलमान सरदारांना फिरून जीव आला. आतां आपण हं हं म्हणता शिवाजीला खाऊन टाकूं, असें ते बोलूं लागले. मोहबतखानानें सालहेर किल्ला परत घेण्याकरितां आपलें सैन्य पाठविलें. मोहोबतखान आला, अशी छत्रपतींना बातमी समजतांच त्यांनीं मोरोपंत पेशवे व सेनापति प्रतापराव गुजर यांच्या हातांखालीं आपल्या पदरचे निवडक सरदार देऊन, एकंदर वीस हजार सैन्य मोहबतखानाबरोबर लढण्याकरितां पाठवून दिलें. मुसलमान सरदार, छत्रपतींच्या सैनिकांना हे लढवय्ये नव्हेत, वाटमाऱ्यासारखे दबा धरून चोरटी लढाई करणारे आहेत असें नेहमीं ह्मणत. हा मुसलमान सरदारांचा आरोप नाहींसा करावा, आणि छत्रपतींचे सैनिक समोर उभें राहून लढणारे आहेत अशी त्यांची खातरी करावी, असा या लढाईला निघतेवेळीं मोरोपंत पेशवे व प्रताराव यांनीं बेत केला होता. हे दोघे आपलें सैन्य घेऊन सालहेर किल्ल्याजवळ गेले. मोहबतखानानें आपलें कांहीं सैन्य किल्ला परत घेण्याकरितां प्रथम पाठविलें होतेंच. तो आणखी सैन्य घेऊन आला. दोन्ही सैन्यांचे किल्ल्याजवळ तळ पडले. छत्रपतींच्या सैन्यापेक्षां मोहबतखानाचें सैन्य अधिक असल्यामुळें मुसलमान सरदारांना जय आपल्याला येणार असें वाटत होतें. छत्रपतींच्या सैनिकांना आपलें सैन्य थोडें आहे हें दिसत होतें, तरी छत्रपतींना अपयश यायचें नाहीं, अशी त्यांना एक प्रकारची खातरी

होती व त्यांचा हुरूप फारच मोठा होता. ते लढाई-विषयीं अगदीं उतावळे झाले होते. मुसलमानांचें यथेच्छ रक्त प्यायला मिळून आपल्या तान्हेल्या तरवारींची तहान केव्हां भागते असें त्यांना होऊन गेलें होतें.

लढाईचा दिवस ठरला, व दोन्ही सैन्यें समोरासमोर लढाईला उभीं राहिलीं. लढाईच्या प्रारंभाला मुसलमान सरदारांनीं आपल्या तोफखान्याची सरबत्ती, छत्रपतींच्या सैनिकांनीं जागच्या जागीं थक्क व्हावें अशा प्रकारें चालविली. छत्रपतींच्या सैन्याबरोबरही तोफा होत्या, पण त्या फार थोड्या होत्या. त्यामुळें प्रारंभाला छत्रपतींच्या सैन्याचा कमीपणा स्पष्ट दिसूं लागला. मुसलमान सरदारांना आपण ही लढाई जिंकणार असा गर्व वाटूं लागला. मोरोपंत पेशवे व प्रतापराव यांनीं हा प्रकार पाहून आपल्या घोडेस्वारांना, फळी धरून शत्रूच्या तोफखान्यावर चढाव करून जाण्याची आज्ञा केली. छत्रपतींच्या सैन्यांतील लोकांना अंगचोरपणा मुळींच माहित नव्हता. छत्रपतींचा दिग्विजय करायचा, मग त्याकरितां प्राण गेले तरी बेहेत्तर; अशा प्रकारची स्वामिनिष्ठा त्यांच्यांत वसत असल्यामुळें, कालस्वरूपी तोफखान्यावर आपण चढाव करून कसें जावें, हा विचार घोडेस्वारांच्या मनांत आला नाहीं. आज्ञा होतांच, ‘ हरहर महादेव ’ असा गजर करून घोडेस्वारांच्या फळ्या मुसलमानांच्या तोफखान्यावर चढाव करून गेल्या. त्यापैकीं कांहीं घोडेस्वार तोफांचे गोळे लागून पडले खरे, पण बाकीच्यानीं तोफखान्यावरच्या गोलंदाजांचा व सरदार शिपायांचा धु-

व्वा उडविला. तसें लागलींच लढाईचें पहिलें स्वरूप बदललें. औरंगजेबाच्या सैन्यांतील तोफखान्याच्या सरबत्तीचा भयंकरपणा नाहींसा होतांच छत्रपतींच्या सैन्यांतील लोकांना अवसान आलें, व झपाट्यानें वीरश्रीच्या लढाईला सुरुवात झाली. आणि लढवय्ये नव्हत अशा मराठ्यांच्या सैन्यानें शत्रूंचा भारी मोड केला. या लढाईविषयीं लिहितांना कित्येक परकीय इतिहासकारांनीं, दिलेरखानानें मोहबतखानाचें व त्याचें बरें नसल्यामुळें, कसून लढाई केली नाहीं असें म्हटलें आहे. आणि यामुळें मुसलमानांना लज्जा उत्पन्न व्हावी, अशा प्रकारचा पराभव छत्रपतींच्या सैन्यानें केला, असें पराभवाचें कारण दाखविलें आहे; पण एक दिलेरखान उदास राहिल्यामुळें दिल्लीहून आलेल्या मोहबतखानाच्या हाताखालच्या करोल सैन्याचा पराभव व्हावा, यांत त्या सैन्याची दुर्बलता सिद्ध होत नाहीं काय ? तरी दिलेरखानावर वरच्यासारखा आरोप करणें म्हणजे आजपर्यंत त्यानें औरंगजेबाची जी एकनिष्ठपणानें सेवा केली, तिच्यावर पाणी ओतण्याप्रमाणें आहे ! दिलेरखान हा स्वामिभक्त सेवक होता यांत तिळप्राय संदेह नाहीं. मागच्याच लढाईंत सर्व मुसलमान सरदारांनीं लढाई सोडून कृष्णवदन केलें असतां, एकनिष्ठपणें स्वामिसेवा करायची ह्मणून ज्या दिलेरखानानें भीमातीरापर्यंत छत्रपतींच्या सैन्याचा पाठपुरावा केला, तो आपल्या स्वामीचें सर्व सैन्य एके ठिकाणीं उभें राहून छत्रपतींच्या सैन्याबरोबर लढतें आहे असें पाहत असतां स्वस्थ बसला असेल कीं काय, याची क-

रपना वाचकांनींच करावी. आपल्या पक्षाचें सैन्य पुष्कळ आहे, मग उगीच आपले लोक कशाला दमवा, असा विचार करून दिलेरखान कदाचित् प्रथम स्वस्थ बसला असेल. पण छत्रपतींच्या सैन्यानें कालभैरवरूप धरून औरंगजेबाच्या सैन्याचा स्वाहा चालविला, मुसलमान शिपायांना नको हें रण असें करून सोडलें, त्या वेळीं तो स्वामिनिष्ठ शूर दिलेरखान उदास राहिला नसेल. असो.

या लढाईत छत्रपतींच्या सैनिकांनीं औरंगजेबाच्या सैन्याचा फार नाश केला आणि समोरासमोरच्या लढाईत मराठे आपल्यापेक्षां पुष्कळच सरस आहेत, अशी पहिल्याच प्रसंगानें मुसलमान सरदारांची खातरी केली. समोरासमोर सैन्यें उभीं राहून औरंगजेबाच्या व छत्रपतींच्या सैन्यांची लढाई झाली अशी हीच पहिली होय. छत्रपतींच्या सैन्यानें औरंगजेबाच्या सैन्याचा पराभव करून पुष्कळ नाश केला इतकेंच नाहीं, तर त्याच्या सैन्यांतील पुष्कळ लोकांचा पाडाव केला व त्यांत दोन मुसलमान सरदार होते. छत्रपतींनीं त्या सरदारांना वस्त्रें देऊन परत पाठविलें आणि इतर लोकांस सोडून दिलें. त्यांतील कित्येक आपखुषीनें छत्रपतींच्या सैन्यांत नोकरीस राहिले. या लढाईचें वर्तमान जेव्हां औरंगजेबाच्या कानावर गेलें, तेव्हां त्याच्या ह्रदयांत प्रकाश पडला कीं, आपण व्यर्थ घमेंडींत राहिलों, तिकडे शिवाजी पुष्कळच प्रबल झाला, तो आतां आपल्या हातीं लागेल अशी आशा करणें व्यर्थ आहे ! औरंगजेबाला येथपर्यंत आपण द-

क्षिणेचे मालक होऊं असें वाटत होतें, परंतु यापुढें ती त्याची इच्छा दबत चालली. आणि जोंपर्यंत शिवाजी जिवंत आहे तोंपर्यंत तरी आपल्या हातीं महाराष्ट्र येत नाहीं, अशी त्याची पक्की खातरी झाली. या लढाईत छत्रपतींकडील पांच हजार शिपायांवरचा फाकडा काकडे सरदार पडला. हा छत्रपतींच्या विश्वासांतला होता आणि छत्रपतींची नोकरी प्रारंभापासून एकनिष्ठपणें करीत होता. छत्रपतींनीं जावलीचें राज्य घेतलें, त्या प्रसंगीं यानें आपला पराक्रम चांगला गाजविला होता. याचप्रमाणें यानें रोहिडा किल्ला मोठ्या शौर्यानें घेतला होता. याच्या मरणानें छत्रपतींना व त्यांच्या सैन्यांतील सर्व लोकांना फार वाईट वाटलें. या लढाईत छत्रपतींच्या सैन्यांतील पांचशें लोक पडले. औरंगजेबाच्या सैन्यांतल्या लहान मोठ्या मिळून बावीस सरदारांना मराठ्यांनीं धारातीर्थी निजविलें. इतर सैन्यांतील लोक तर, दोन हजारांपेक्षां अधिक मेले. याखेरीज पुष्कळच जखमी झाले होते. अशा प्रकारचा या लढाईचा शेवट झाला. या लढाईनें सालहेर किल्ला छत्रपतींना मिळावा यांत नवल नाहीं.

## उत्तर कोंकणांत छत्रपतींच्या सैन्याचे पराक्रम.

छत्रपतींचें सैन्य उत्तर कोंकणांत होतेंच. त्यानें लहान लहान पाळेगार राजांबरोबर लढाया करून, त्यांना छत्रपतींचे अंकित करण्याचा धडाका लावला होता. त्या सैन्यानें बहुतेकांना नरम आणून त्यांच्यापासून खंडण्या ठरवून छत्रपतींचे त्यांना मांडलिक केलें.

पोर्तुगीज लोक जरी छत्रपतींचा पराक्रम ओळखून त्यांच्याबरोबर गरित्वीनें वागत होते, तरी छत्रपतींचा उत्कर्ष व्हायचा असल्यामुळें त्यांनाही लढण्याची खुमखूम आली. परंतु छत्रपतींच्या सैन्यानें त्यांच्याबरोबर लढाया करून, आपला पाय हिंदुस्थानांत टिकतो कीं नाहीं अशी त्यांना शंका यावी, इतकी त्यांची त्रेधा उडविली. दमण आणि वसई छत्रपतींचे लोक घेतात कीं काय असें वाटून इंग्रज लोकही आपली तयारी करूं लागले. परंतु त्यांच्या तयारीचा हेतु छत्रपतींबरोबर लढाई करण्याचा नसून स्वसंरक्षण करितां यावें इतकाच होता. इंग्रजांची व छत्रपतींची मात्र लढाई झाली नाहीं. छत्रपतींनीं सुरत लुटली त्यावेळीं इंग्रज छत्रपतींच्याबरोबर स्नेहानें होते. तरी छत्रपतींनीं सन १६६१ च्या सुमाराला राजापूर लुटलें होतें, त्यावेळीं आपलें दहा हजार पागोडाचें नुकसान झालें, तें भरून घ्यावें अशी इंग्रजांची छत्रपतींच्या मागें कुरकूर होती. छत्रपती त्यांना ह्मणत होते कीं, जंजिऱ्याच्या सिद्धीबरोबर लढण्यास तुम्ही मदत करा ह्मणजे तुमच्या नुकसानीचा विचार करूं. यावर जें इंग्रजांचें उत्तर होतें तें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. इंग्रज ह्मणत कीं, आह्मी केवळ व्यापारी, स्वतःचें संरक्षण करण्यावांचून आह्मी कधींही हातांत शस्त्र धरीत नाहीं. यावरून इंग्रज लोक वचनाचे धड नाहींत असें नाहीं कां होत ? सतराशें शतकांतलें हें त्यांचें भाषण जर खरें असतें, तर ते एकोणिसाव्या शतकांत साऱ्या हिंदुस्थानचे राजे झाले असते काय? स्वतःचें संरक्षण व व्यापार-

करितां करितां ते हिंदुस्थानचे अलगत राजे बनले काय? असो. यासंबंधानें टीका करण्याचा सध्यांचा प्रसंग नव्हे. सांगायचें तात्पर्य, छत्रपतींचा पराक्रम पाहून व्यापाराच्या मिषानें आलेले त्या वेळचे इंग्रज अगदीं गरिबीनें वागत होते.

## छत्रपतींनीं हुबळी शहर लुटविलें.

इ. स. १६७३ त छत्रपतींनीं फिरून पन्हाळा किल्ला घेतल्यावर, हुबळी शहर लुटायचें असा जो त्यांचा फारा दिवसांचा बेत होता, तो अमलांत आणण्याकरितां अण्णाजी दत्तो याच्या हाताखालीं निवडक सैन्य देऊन त्याला तिकडे पाठविलें. हुबळी शहर विजापूरकरांच्या ताब्यांतलें होतें. शहराच्या रक्षणाकरितां त्यांचें तेथें कांहीं सैन्य होतें. त्या सैन्यानें अण्णाजी दत्तोला शहरांत न शिरूं देण्याबद्दल प्रथम प्रयत्न केला. पण थोड्याच वेळांत सैन्यावर जो मुख्य होता त्याला कळून आलें कीं, मराठ्यांच्या आलेल्या सैन्याबरोबर आपण लढाई चालविण्याचा परिणाम, मरून जाण्यावांचून दुसरा कांहीं एक होणार नाहीं, तेव्हां आपण व्यर्थ खराबीला येण्यापेक्षां मराठ्यांना शहर लुटूं द्यावें हें बरें. असा विचार करून त्यानें अण्णाजी दत्तोला शहरांत जाऊं दिलें.

त्यावेळीं हुबळी हें व्यापाराचें मोठें शहर होतें. सर्व जातींचे व्यापारी येथें व्यापार करण्याकरितां येऊन राहिले होते. सुरतेच्या बरोबरीनें हुबळी शहरांत व्यापार चालत असे. सुरत शहरच्या लुटींत छत्रपतीं-

च्या सैन्यानें इंग्रजांच्या गोदीला हात लावला नव्हता. पण या लुटींत इंग्रजव्यापाऱ्यांनाही अण्णाजी दत्तोच्या सैन्यानें लुटलें. या हुबळी शहरच्या लुटींत, छत्रपतींना मागील कोणत्याही लुटींत संपात्ति सांपडली नाहीं इतकी संपात्ति सांपडली असें ह्मणतात. अण्णाजी दत्तो हुबळी शहरांतून लूट घेऊन गेल्यावर विजापूरकरांचें तेथें जें सैन्य होतें त्यानें राहिल्यासाहिल्यावर हात मारला.

हुबळीकडे सैन्य पाठविण्यांत छत्रपतींचा आणखी एक हेतु होता. बेदनूरकराला आपल्या अंकित करावा असें त्यांच्या मनांत होतें. परंतु बेदनूरच्या राण्यानें हुबळीच्या लुटीचें वर्तमान ऐकल्याबरोबर नम्रतादर्शक बोलणें करण्याकरितां अण्णाजी दत्तोकडे आपलीं माणसें पाठविलीं. त्यांनीं अण्णाजी दत्तोला सांगितलें कीं, आमचे यजमान छत्रपतींच्या आश्रयाची इच्छा करीत आहेत. छत्रपतींच्या बरोबर विरोध करावा अशी त्यांच्या मनांत कल्पनाही नाहीं. ते त्यांच्या शक्तीप्रमाणें छत्रपतींना खंडणी देण्यास कबूल आहेत. अण्णाजी दत्तोनें हा सर्व मजकूर छत्रपतींना कळविला व त्यांनीं बेदनुरास आपला एक वकील नेहमीं रहावा असें ठरवून त्याला आपला मांडलिक केलें.

याखेरीज छत्रपतींनीं आपलीं लढाऊ जहाजें कारवार, अंकोला वगैरे शहरें घेण्याकरितां पाठविलीं होतीं. त्यांनीं त्या बाजूला छत्रपतींची सत्ता वाढविली. आणि तिकडील देशमुखांस छत्रपतींचे अंकित करून त्यांच्याकडून मुसलमानांचीं ठाणीं उठविलीं.

## विजापूरकरांची छत्रपतींबरोबर लढाई.

छत्रपतींनीं हुबळी शहर लुटविलें आणि कारवाराकडील विजापूरकरांचीं ठाणीं उठविलीं, हीं दोनच लढाईची तयारी करायला त्यांना कारणें झालीं नाहींत. छत्रपतींनीं पन्हाळा किल्ला घेतला याचें त्यांना वैषम्य वाटत होतेंच, त्यांत सातारचा किल्ला, चंदन, वंदन, पांडवगड, नांदगिरी हे किल्ले छत्रपतींनीं घेतल्यामुळें, विजापूरकरांना मोठ्या लढाईची तयारी करणें भाग पडलें.

या वेळीं विजापूरचा सुलतान मरून त्याच्या गादीवर त्याचा पांच वर्षांचा मुलगा होता. सर्व राज्यकारभार सुलतानाची मुलगी पादशहा बिब्बी, वजीर अबदुल महमद, आणि वजनदार सरदार खवासखान, अबदुल करीम व मुजफरखान यांच्या विचारानें चालला होता. विजापूरकरांच्या पदरीं वरच्या मंडळींच्या हाताखालीं जबाबदारीचीं कामें पहाण्यास कारकुनीच्या कामांत हुषार असलेली ब्राह्मण मंडळी असे. छत्रपती आपल्या गुप्त हेरांकडून दिल्लीस अवरंगजेबाचीं काय काय खलबतें चाललीं आहेत त्याच्या बातम्या आणवीत ! विजापूर तर दिल्लीपेक्षां किती तरी जवळ, आणि तेथील कारस्थानांत स्वजातियांचा प्रवेश, मग विजापूरकरांचीं खलबतें छत्रपतींना कळत असत यांत नवल कसचें ? विजापुराहून अबदुल करीम, बरोबर सैन्य घेऊन पन्हाळा किल्ला व त्याच्या भोंवतालचा प्रदेश परत घेण्याकरितां येत आहे असें छत्रपतींना समजतांच, त्यांनीं प्रतापराव गुजर याजबरोबर सैन्य

देऊन त्याला विजापूरच्या भोंवतालचा मुलूख सर क-रण्याकरितां पाठविला. अबदुल करीम बरोबर पुष्कळ सैन्य घेऊन आला होता, तेव्हां त्यानें पन्हाळ्याच्या भोंवतालचा कांहीं प्रदेश परत घेतला. पण पन्हाळगड मिळविण्याकरितां तो जंगजंग पछाडीत होता, तरी तो त्याच्या हातीं लागेना. इतक्यांत विजापुराहून त्याला परत बोलावणें आलें! पन्हाळा परत घेण्याविषयीं त्यानें प्रतिज्ञा केली होती. त्यानें पन्हाळा तरी परत घेतला असता, किंवा तो घेण्याकरितां आपला जीव खर्ची घातला असता, अशा वीरश्रीनें तो लढत होता. पण विजापुराहून जें बोलावणें आलें तें निकडीनें परत गेलें-च पाहिजे असें होतें. प्रतापरावानें विजापूरच्या भोंव-तालच्या मुलखांची नासधूस करून आपला रोख वि-जापुरावर धरला होता. इकडे अबदुल करीम पन्हाळ-गड घेत होते, पण तिकडे विजापूर जातें कीं काय असें लोकांना वाटूं लागलें होतें ! तात्पर्य अबदुल क-रीमला पन्हाळा घेण्याचा विचार सोडून आपल्या रा-जधानीच्या संरक्षणाकरितां धांवत जाणें भाग पडलें.

विजापूरच्या दरबारांत प्रवेश असलेल्या ब्राह्मणांचा छत्रपतींना आजपर्यंत पुष्कळ उपयोग झाला ही गोष्ट खरी आहे. परंतु त्याच ब्राह्मणांनीं यावेळीं छत्रपतींचें मोठें नुकसान केलें. प्रतापरावाबरोबर छत्रपतींनीं मोठें सैन्य देऊन त्याला विजापुराकडे जो पाठविला होता, त्यांत त्यांचा विचार विजापूरकरांना अगदीं घाईला आणावें असा होता. प्रतापरावानें तशी वेळही आणिली होती. त्यानें अबदूल करीमला वाटेंत गांठून त्याच्या सैन्या-

वर कित्येक छापे घातले. प्रतापराव तसेच छापे घालीत रहाता, तर अब्दुल करीम याच्या सैन्याचा नाश होऊन विजापूरकरांचे पंचप्राण व्याकुळ झाल्यावांचून राहिले नसते. पण विजापूरकरांच्या पदरच्या ब्राह्मणांनीं हें पुढचें भविष्य जाणून आपल्या अन्नदात्यांची कड घेऊन प्रतापरावाला फितूर करण्याचे प्रयत्न चालविले !

प्रतापराव सेनापतीच्या कामांत कुशल होता, धाडसी होता, कशाही प्रसंगाला न डगमगणारा होता, यशस्वी होता, पण या संबंधांत त्याच्या नांवाचा लौकीक झाल्यावर त्याला बराच गर्व झाला. छत्रपतींच्या पुढें तो अति लीनता धारण करी हें जरी खरें असलें, तरी छत्रपतींच्या पश्चात् तो आपलाच तोरा मिरवूं लागला होता. हें छत्रपतींच्या लक्षांत आलें नव्हतें असें नाहीं, परंतु प्रसंगाकडे नजर देऊन त्यांनीं कानाडोळा केला होता. विजापूरकरांच्या पदरच्या मंडळींनीं प्रतापरावाला फितूर करण्याचे जे प्रयत्न केले, त्यांनीं तो धनाशेंत गुंतून छत्रपती आपल्याला काय ह्मणतील याचा विचार न करितां फितूर झाला ! त्यानें अब्दुल करीम याच्या सैन्याला पुढें काडीइतका धक्का न लावतां विजापुरास जाऊं दिलें. यानंतर छत्रपतींच्या आज्ञेची वाट न पाहतां तो विजापूरकरांच्या मुलखांतून वळून वऱ्हाडांत शिरला. प्रतापरावाचें हें कृत्य छत्रपतींना मुळीं आवडलें नाहीं. त्यांना प्रतापरावानें विजापूरकरांपासून पैसे खाल्ले, हा सर्व मजकूर समजला. छत्रपतींनीं प्रतापरावाला याची ओळख दिली

नाहीं, पण त्याला पुष्कळ दोष दिला व असा प्रकार आपल्याच मनानें तुह्मी फिरून कराल तर क्षमा केली जाणार नाहीं अशी तंबी दिली.

वरच्या प्रसंगांतून विजापूरकरांनीं जरी मोठ्या मिनतवारीनें आपली सुटका करून घेतली, तरी छत्रपतींनीं त्यांचा पुष्कळ मुलूख व किल्ले घेतले असल्यामुळें त्यांच्यानें स्वस्थ बसवेना. त्यांनीं फिरून लढाईची चांगली तयारी चालविली. विजापूरकरांनीं पन्हाळा घेण्याबद्दल फिरून जारीची तयारी चालविली आहे, हें वर्तमान छत्रपतींना समजलें व त्यांनीं प्रतापरावाला विजापूरकरांच्या सैन्याबरोबर लढण्याकरितां बोलाविलें. त्यांनीं प्रतापरावाला रागानें निरोप पाठविला कीं, तुह्मीं जें विजापूरकरांबरोबर वर्तन केलेंत तें आह्माला आवडलें नाहीं. आतां त्या वर्तनाची साफी केल्यावांचून तुह्मी आह्माला तोंड दाखवूं नका. छत्रपतींचा हा निरोप ऐकून प्रतापरावाला फारच वाईट वाटलें. तो आपलें सैन्य घेऊन, विजापूरकरांचा पुरा मोड करीन तेव्हांच छत्रपतींना तोंड दाखवीन असा निश्चय करून पन्हाळ्याकडे गेला.

अब्दुल करीम या वेळीं लढाईची जय्यत तयारी करून आपले गेलेले किल्ले व मुलूख परत घेण्याकरितां आला होता. त्याच्या सैन्याला विसावा मिळालेला होता, पण प्रतापरावाच्या सैन्याची स्थिति अशी नव्हती. तें दमलेलें होतें. खेरीज छत्रपतींनीं प्रतापरावाला जो रागानें निरोप पाठविला होता, त्यानें प्रतापरावाला अगदीं वाईट वाटलें होतें. नेहमीं आपण कोणत्या त-

ऱ्हेनें लढतों, शत्रूला आपल्या अंगावर घेऊन फिरून उसळी मारून त्याच्या अंगावर कसे जातों याचें प्रतापरावाला विस्मरण पडल्यासारखें झालें. तो आपल्या कांहीं सैन्यानिशीं पन्हाळगडाशेजारीं जातांच, विजापूरकरांचें सैन्य पाहून त्यावर चवताळून जाऊन पडला. विजापूरकरांचें सैन्य व्यवस्थेनें उभें राहिलेलें होतें. त्यानें न डगमगतां मोठ्या शौर्यानें लढाईला सुरवात केली. प्रतापराव आपलें सर्व सैन्य घेऊन विजापूरकरांच्या सैन्यावर कोसळता, तर त्याचा परिणाम कांहीं निराळा झाला असता. परंतु त्याला विलक्षण घाई सुटली होती, अथवा काळाचेंच बोलावणें आलें होतें असें ह्मणण्यास हरकत नाहीं ! त्यामुळें विजापूरकरांच्या सैन्याचा जोर जास्त होऊन तें प्रतापरावाच्या सैन्याला कापीत सुटलें. आपल्या सैन्याची दशा उडत आहे हें पाहून प्रतापराव त्याला धीर देऊन दमानें लढण्याविषयीं सांगत असता, एक जेजलेचा गोळा येऊन त्याच्या वर्मीं लागला. प्रतापरावाची अशी स्थिति होताच त्याच्या सैन्यांत हाहाःकार उडाला. त्याच्या सैन्यांतील. लोक धीर सुटून जीव घेऊन रानोमाळ पळूं लागले ! तेव्हां विजापूरकरांच्या सैन्यानें त्यांचा पाठलाग चालविला व सापडेल त्याला कापण्याशीं गांठ घातली ! ज्या प्रतापरावारानें ढलाईत कधींही आपजय घेतला नाहीं, ज्यानें छत्रपतींच्या निरोपावरून विजापूरकरांचा पुरा मोड करीन तेव्हांच महाराजांना तोंड दाखवीन अशी प्रतिज्ञा केली होती, तो मर्मस्थळीं गोळा लागून पडला असता, त्याच्या सैन्याची अशा प्रकारें दुर्दशा

झालेली पाहून त्याच्या अंतःकरणाची अवस्था काय झाली असेल बरें ? शूरांना मरणाचें कांहीं वाटत नाहीं. त्यांत रणांत मरण ह्मणजे त्यांना एक प्रकारचें समाधान. पण शेवटीं अपयश घेऊन आपण मरत आहोंत, हें जलाल विष, लागलेल्या जेजलेच्या गोळ्यापेक्षां प्रतापरावाला अत्यंत व्यथा देत होतें. त्याचें अंतःकरण या विषानें जळत होतें ! त्याच्या नेत्रांतून उष्णाश्रूंचे पाट वाहात होते. विजापूरकरांच्या सैन्याचा मोड झाला अशी कोणी तरी सुखवार्ता येऊन सांगेल, याचीच वाट पहात त्याचे पंचप्राण त्याच्या कुडींत राहिले होते.

लढाईच्या जागेपासून मागें थोड्याच अंतरावर हंसाजीराव मोहिते व आणखी एक दोन छत्रपतींच्या पदरचे लहान सरदार सात आठ हजार सैन्यानिशीं होते. त्यांच्या कानावर प्रतापरावाच्या पराजयाची दुर्वार्ता जातांच, सिंहबालकांप्रमाणें त्यांच्या अंगांत वीरश्री संचरली. विजापूरकरांच्या गर्वानें फुगलेल्या सरदारांना जमिनीवर लोळवून त्यांच्यावरून आह्मी आपले घोडे केव्हां नाचवूं, आणि प्रतापरावाच्या स्वर्गीं चाललेल्या प्राणांना विजयाची गोड वार्ता केव्हां ऐकवूं, असें त्यांस होऊन गेलें. हंसाजीराव मोहिते हा वीरपुरुष प्रतापरावाच्या जोडीचाच. तो आपल्या सर्व सैनिकांना म्हणाला, गडेहो आपलीं अपजयानें काळीं झालेलीं तोंडें महाराजांना दाखविण्याकरितां आपण येथून परत जायचें काय ? प्रतापराव आजपर्यंत जय घेऊन, आज अपयश आलें म्हणूनच कीं काय, मरणाच्या वाटेला लागले आहेत! खऱ्या शूराचें जें कर्तव्य

तें ते करीत आहेत. आपण मात्र हीं काळीं तोंडें घेऊन परत जाण्याच्या विचारांत आहोंत ! आपण काय हातांत बांगड्या भरल्या आहेत, कां आपण बाजारबुणगीं आहोंत ह्मणून येथून जीव घेऊन पळत सुटायचें?! मर्दहो चला; आपल्या तलवारी म्यानांतून बाहेर काढा. एक प्रतापरावांचा तरी मार्ग धरूं, किंवा विजापूरकरांच्या बायकांना रंडक्या करून महाराजांच्या नांवाचा जयजयकार करीत त्यांचें दर्शन घ्यायला जाऊं. वाचकहो, ज्यांनीं पुढें दिल्लीपति अवरंगजेबाच्या दाढीला हिसडे मारमारून त्याला रंजीस आणलें इतकेंच नाहीं, मरण्याकरितां त्याला दिल्लीसही जाऊं दिलें नाहीं, ते धनाजी, संताजी ऐन ज्वानींत, केवळ बांड असे हंसाजीरावाच्या हाताखालीं होते. ते, हंसाजीरावाचें असें उत्तेजक भाषण ऐकून आपल्या जीवाची भीति धरून काय मागें फिरतील ? छे, छे; ते विक्रमशाली बांड रणभूमी गांठण्याकरितां लागलींच तयार झाले. हंसाजीराव मोहित्याबरोबरचे सात आठ हजार लोक शिवनामाचा गजर करून विजापूरकरांनीं हरण केलेली विजयश्री परत आणण्याकरितां आपलीं शस्त्रें चमकावीत निघाले.

यावेळीं विजापूरकरांचें सैन्य विजयश्रीनें फुगून, प्रतापरावाचें सैन्य फुटून रानोमाळ पळत होतें त्याच्या मागें लागलेलें होतें. अर्थात् तें विस्कळीत झालेलें होतें. यामुळें हंसाजीराव मोहित्यांच्या वीरश्री संचरलेल्या सैन्यास, विजापूरकरांच्या सैन्याचा धुव्वा उडविण्यास चांगली संधि मिळाली. पुराणकालीं परशुरामानें ज्या-

प्रमाणें आपला कुठार क्षत्रिय कुलावर अप्रतिहत चाचविला, तद्वत प्रकार प्रस्तुत प्रसंगीं हंसाजीराव मोहिते, धनाजी व संताजी यांनीं केला. विजापूरकरांचे शिपाई, हा नवीन मराठ्यांचा तोबा, तोबा करायला लावणारा मारा आलेला पाहून, गर्भगळित झाले ! ज्यांना भिऊन आपण रानोमाळ पळत आहोंत, त्यांच्यांत प्रेतांचे ढीग पडूं लागलेले पहातांच, प्रतापरावाच्या पळत सुटलेल्या शिपायांना दुप्पट जोर आला. त्यांनीं आपलीं शस्त्रें सरसावलीं व ते विजापूरकरांच्या शिपायांवर चालून येऊं लागले. आडकित्त्यांत सुपारी सांपडली ह्मणजे तिचा परिणाम फुटण्यापलीकडे दुसरा कांहीं नाहीं, तशी विजापूरकरांच्या, चार घटकांपूर्वी विजयानंदानें नाचत असलेल्या सैन्याची अवस्था झाली. त्यांच्यापैकीं ज्यांना जीव घेऊन पळण्याला सवड सांपडली, ते रण सोडून पळूं लागले. ते थोड्या वेळापूर्वी ज्या प्रतापरावाच्या शिपायांचा पाठलाग करीत होते, ते शिपाई आतां यांचा पाठलाग करूं लागले. अबदुल करीम याला हा प्रकार पाहून मेल्यापेक्षां मेल्यासारखें झालें. आणि त्याला अपजय घेऊन विजापुरास जावें लागलें.

प्रतापरावाच्या मृत्यूनें छत्रपतींना अति दुःख झालें. त्यांचा त्याच्यावर थोडा राग झाला होता खरा, पण ते प्रतापरावाची कर्तबगारी जाणून होते. बाप मेला कीं त्याची नौकरी त्याच्या मुलाला द्यायची, असा शिरस्ता छत्रपतींचा नव्हता. ते कुळाच्या मोठेपणाकडे पहात नसत. गुण पाहून नौकरी देत. तरी प्रतापरावानें अश्रांत श्रम करून छत्रपतींची जी नौकरी केली, त

लक्षांत आणून त्यांनीं प्रतापरावाच्या कुळांतील माणसांना चांगल्या स्थितीनें रहातां यावें अशी व्यवस्था केली. प्रतापराव गुजराच्या मागून निळो सोनदेव ज्याला अबाजी सोनदेवही म्हणत तो मृत्यू पावला. याच्याकडे मुजुमदारीचें काम असे. बापाची जागा मुलाला द्यायची नाहीं असा छत्रपतींचा कांहीं दुराग्रह नव्हता. मुलगा कर्ता असेल तर त्याला छत्रपती त्याच्या बापाची जागा आनंदानें देत, हें निळो सोनदेवाचा मुलगा रामचंद्रपंत यास मुजुमदारीच्या कामावर नेमून त्यांनीं सिद्ध करून दाखविलें. प्रतापरावाच्या बरोबरीचा हंसाजीराव मोहिते हा आहे हें छत्रपतींना माहीत होतें. खेरीज त्यानें नुक्ताच जो पराक्रम केला होता तो मनांत आणून त्यांनीं त्याला हंबीरराव हा किताब देऊन सेनापतीच्या जाग्यावर नेमलें. धनाजी जाधव व संताजी घोरपडे यांनीं लढाईंत चांगलें शौर्य गाजविलें, ह्मणून त्यांना योग्यतेस चढविलें. हें वर्तमान इ. स. १६७४ च्या प्रारंभाला झालें. छत्रपतींनीं या पूर्वींच आपल्या नांवाचें नाणें पाडायला सुरुवात केली होती व आपल्या मागें राजा हें पद लावून घेतलें होतें, तरी त्यांनीं पदरच्या सचिव मंडळाच्या आग्रहावरून रजपूत राजाप्रमाणें यथाशास्त्र राज्याभिषेक करून घेण्याचा विचार केला. पण त्या महोत्सवाची हकीकत लिहिण्यापूर्वीं, प्रतापराव गुजर व मोरोपंत पेशवे यांनीं मोहबतखानाचा पराभव केल्यानंतर अवरंगजेबानें काय व्यवस्था केली, हें वाचकांस सांगितलें पाहिजे.

मोहबतखानाला आपण दक्षिणेंत सैन्य देऊन पाठ-

विला खरा, परंतु आपल्या कीर्तीला काळोखी लागण्यासारखा त्यानें अपजय घेतला हें ऐकून अवरंगजेबाची मोहबतखानावरची मर्जी उडाली. कित्येक इतिहासकार असेंही ह्मणतात कीं, मोहबतखानाला दिल्लीहून पाठविला, तेव्हांपासून त्याच्यावर अवरंगजेबाची दृष्टि होती, आणि तो दक्षिणेंत येऊन पोंचण्याच्या अगोदरच अवरंगजेबाची त्याच्यावरून मर्जी उडाली होती. अशांत त्याचा मराठे सरदारांनीं पूर्ण पराभव केला, मग अवरंगजेबाचा राग काय विचारावा? त्यानें पराभवाची बातमी ऐकतांच मोहबतखान व मोअझिम यांस परत बोलाविलें, आणि दक्षिणेच्या सुभेदारीवर गुजराथचा सुभेदार खानजहान यास नेमिलें. खानजहान आपल्या कामावर आल्यावर त्याला पूर्णपणें कळून आलें कीं, आपलें जें दक्षिणेंत सैन्य आहे तें मराठ्यांच्या बरोबर लढाया करण्याला अपुरें आहे. सारांश, अवरंगजेबानें खानजहान मराठ्यांबरोबर लढाया करून त्यांचा मुलूख घेईल, अशा हेतूनें त्याची सुभेदारीच्या जागेवर नेमणूक केली होती, पण खानजहानानें मुळांतच नांगी टाकली ! अवरंगजेबानें दिलेरखान हा शूर आहे असें पाहून त्याला खानजहानाच्या हाताखालीं ठेवलें होतें. तो आपल्याकडून खानजहान यास लढाई करण्याबद्दल उत्तेजन देत होता. परंतु खानजहान याचा अगदीं धीर खचला असल्यामुळें तो लढाई करण्याची गोष्ट बोलेना. त्यानें, छत्रपतींच्या सैन्यानें खानदेशांत शिरूं नये ह्मणून कित्येक रस्ते आपल्या सैन्याकडून रोखून धरविले. परंतु छत्रपतींच्या

सैन्यानें ते रस्ते सोडून अहमदनगर व अवरंगाबाद इकडे दुसऱ्या रस्त्यांनीं जाऊन चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्यास सुरवात केली. खानजहानानें या सैन्याचा पाठलाग केला, परंतु त्यांत त्यास यश आलें नाहीं. शेवटीं त्यानें भीमेच्या कांठीं पेडगांवीं आपल्या सैन्याचा तळ देऊन तेथें एक बहादुरगड या नांवाचा किल्ला बांधला. तात्पर्य, अवरंगजेबानें हा जो नवा सुभेदार दक्षिणेंत खातरीचा ह्मणून पाठविला, त्याच्या हातून छत्रपतींचा मोड तर झाला नाहींच. पण त्याच्या कारकीर्दींत छत्रपतींचें वैभव पुष्कळ वाढून नर्मदेपावेतों सर्वांना त्यांच्या नांवाचा दरारा वाटूं लागला. हें दक्षिणचें वृत्त नेहमीं अवरंगजेबाच्या कानावर जात होतेंच. तें त्याला इतकें झोंबे कीं, कैकवेळां त्यानें ह्मणावें कीं, माझ्या पदरच्या शूर ह्मणविणाऱ्या सरदारांनीं आतां हातांतलीं शस्त्रें टाकून दासींचीं कामें करायला लागावींत. दक्षिणेंतलीं खुरटीं माणसें माझ्या सरदारांना आवरूं नयेत याची त्यांना शरम वाटली पाहिजे ! केव्हां केव्हां तर अवरंगजेब दक्षिण ताब्यांत येत नाहीं यानें खिन्न होऊन, स्वतः सैन्य घेऊन दक्षिणेंत जावें व मराठे कसे ताब्यांत येत नाहींत तें पहावें, अशा विचाराला लागे. पण तिकडे महत्त्वाचीं कामें निघालीं ह्मणजे तो त्यांच्या मागें लागे, आणि दक्षिणेंत येण्याचा विचार जागच्याजागीं मुरे. या वेळीं अवरंगजेब स्वतः दक्षिणेंत आला असता तर त्याला छत्रपतींचा व त्यांच्या खुरट्या मराठे सरदारांचा पराक्रम कसा आहे हें चांगलेंच समजलें असतें. छत्रपतींच्या मागें

त्याला मराठे सरदारांचा पराक्रम समजला नाहीं असें नाहीं. असो.

## राज्याभिषेकोत्सव.

छत्रपतींनीं क्षत्रिय राजाप्रमाणें आपला राज्याभिषेकोत्सव करावा, असा त्यांच्या सचिवमंडळाचा आग्रह होता. छत्रपतींना जसा स्वधर्माभिमान, स्वदेशाभिमान व स्वजात्यभिमान होता, तसाच त्यांना स्वकुलाभिमानही होता. त्यामुळें क्षत्रियकुलोत्पन्नाला अनुरूप असें आपलें वर्तन ठेवावें, असें त्यांच्या मनानें घेतलें होतें. आपलें वैभव सर्वांच्या नजरेस पडावें, याकरितां त्यांनीं राज्याभिषेकोत्सव करण्याला आपल्या अष्टप्रधानांना रुकार दिला नाहीं ! त्यांची वैभवसंपादनाची इच्छा पूर्ण झाली नव्हती. तेव्हां प्राप्त झालेलें वैभव लोकांना दाखविण्यांत त्यांना भूषण नव्हतें हें उघड आहे. परकीय इतिहासकार व त्यांच्या छंदानें बोलणारे, या संबंधानें कांहींही ह्मणोत, परंतु छत्रपतींनीं जो राज्याभिषेकोत्सव करून घेतला तो, त्यांच्या मनाचा जो स्वधर्माचरणाकडे ओढा होता त्यामुळें होय. आपण क्षत्रिय कुलोत्पन्न आहोंत अशी त्यांनीं आपल्या मनाची खात्री करून घेतल्यावांचून ते या गोष्टीस कबूल झाले नाहींत. अधर्माला ते फार भीत असत. आपल्या कुलाला नसतें महत्व द्यावें अशी त्यांची इच्छा नव्हती.

छत्रपती जर शूद्र कुलोत्पन्न असते तर तत्कालीन एक–विद्वान् गागाभट्टा सारखा ब्राह्मण केवळ दक्षिणेच्या लालचीनें राज्याभिषेकांग व्रतबंध व होमहवनादि

विधि करण्यास कधीं तयार झाला नसता, हें वाचकांनीं पक्कें ध्यानांत ठेवावें. शूद्राला क्षत्रिय बनवून दक्षिणा उपटण्यासारखा गागाभट्ट पोटबाटू ब्राह्मण नव्हता! त्याची योग्यता फार फार मोठी होती. सरस्वति दासीसारखी त्याजपुढें सदा हात जोडून उभी होती. दक्षिणेंत कोणी शिवाजी ह्मणून हिंदु राजा झाला आहे, त्याजपासून आपल्याला पुष्कळ दक्षिणा मिळेल याकरितां गागाभट्ट दक्षिणेंत आला नव्हता. छत्रपतींची पुण्याई मोठी, गागाभट्टासारख्या विद्वान् ब्राह्मणाच्या हातून त्यांना राज्याभिषेक व्हायचा ह्मणूनच तो सहज काशीहून पैठणास आला होता. हें वर्तमान कळल्यावर छत्रपतींनीं त्याला पैठणाहून सत्कारानें रायगडास आणविलें. छत्रपतींनीं गागाभट्टाखेरीज आणखी पुष्कळ वैदिक, शास्त्री, पंडित ब्राह्मण राज्याभिषेकोत्सवाकरितां रायगडास आणविले होते.

शके १५९६ ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशी हा राज्याभिषेकोत्सवाचा मुहूर्त ठरून अष्टप्रधान, सर्व पदरचे सरदार, उमराव, दोस्तराजे, मांडलिक, आप्त, इष्ट, स्नेही, या सर्वांस मंगल निमंत्रण चिठ्या केल्या, सर्वांना रहाण्याकरितां पृथक् पृथक् जागा करून, त्यांच्या आदरातिथ्याकरितां हुषार माणसें नेमण्यांत आलीं. अनिमंत्रित असे कितीही ब्राह्मण आले, तरी त्यांच्या रहाण्याची व भोजनाची गैरसोय होऊं नये ह्मणून त्यांना राहण्याकरितां व जेवणाकरितां मोठमोठे मांडव घालण्यांत आले. राज्याभिषेकाकरितां बत्तीस मण सोन्याचें सिंहासन करवून त्याला हिरे, पाच, माणीक इत्यादि

रत्नें जडविलीं. ज्येष्ठ शुद्ध ६ पासून सशास्त्र राज्याभिषेक संबंधी होमहवनास सुरवात होऊन आज जो रायगड आपल्याला अगदीं उदास दिसतो, तो इंद्रभुवनासारखा दिसूं लागला. राज्याभिषेकोत्सव साजरा करण्याकरितां योग्य लवाजम्यानिशीं निमंत्रित मंडळी येऊं लागली. ब्राह्मणभोजनाला तर षष्ठीपासूनच सुरवात झाली. रायगड जणूं काय राजलक्ष्मीच्या गाढपरिरंभांत वेदघोष, मंगलवाद्यें व गायक नर्तकी यांच्या आलापांनीं डोलूं लागला. शिवरायांच्या राज्याभिषेकाच्या महोत्सवसमयाचे यथातथ्य वर्णन करण्यास ही लेखणी असमर्थ आहे. त्या मंगल समयाच्या नुसत्या स्मरणानें झालेल्या आनंदातिरेकानें ती भांबावून गेली आहे. आणि ह्मणून वाचकांनीं तिच्यापासून आतां अधिक माहिती घेण्याची अपेक्षा न करावी हें बरें. असो.

षष्ठीपासून होमहवनादि विधीस सुरवात होऊन ज्येष्ठ शुद्ध १३ इ. स. १६७४ जून तारीख ६ रोजीं प्रातःकाळीं पट्टराणी पुतळाबाई यांस पटबंधन करून त्यासह वर्तमान रत्नजडित सुवर्ण सिंहासनावर गागाभट्टादि विद्वान् ब्राह्मणांच्या हस्तें शिवरायांना राज्याभिषेक होऊन हजारों तोफा सुटून, वाद्यें वाजायला लागून आनंदींआनंद झाला. राज्याभिषेक झाल्यानंतर वैदिक, शास्त्री, पंडित वगैरे निमंत्रित विद्वान् ब्राह्मणांना दक्षिणा, वस्त्रें वगैरे वांटलीं. निमंत्रणाप्रमाणें आलेले सर्व राजेरजवाडे, अष्टप्रधान, सरदार, अमीरउमराव यांना योग्यतेप्रमाणें वस्त्रें, शस्त्रें, हत्ती, घोडा, चौरी, पालखी वगैरे देण्यांत आलीं. शिवरायांनीं आपली सुवर्ण-

तुला केली ती ब्राह्मणांस वाटण्यांत आली. व याखेरीज अनिमंत्रित ब्राह्मणांस त्यांचा संतोष होईशी छत्रपतींनीं दक्षिणा वांटविली. आणि या दिवसापासून छत्रपती आपल्याला क्षत्रियकुलावतंस श्री राजा शिवछत्रपती असें ह्मणवूं लागले. असो.

छत्रपतींच्या इतर अभिमानांप्रमाणें त्यांना स्वभाषेचाही विशेष अभिमान होता. आजपर्यंत अष्टप्रधान, बारा महाल, अठरा कारखाने, यांचीं नांवें फारशी भाषेंत होतीं, तीं बदलवून छत्रपतींनीं त्यांना संस्कृत नांवें देवविलीं, पेशवे, मुजूमदार, सुरनीस, वाकनीस, सरनोबत, डबीर, न्यायाधीश, न्यायशास्त्री हीं बादशाही अष्टप्रधानांचीं नांवें रूढ होतीं, तीं मागें पडून मुख्य प्रधान, पंत अमात्य, पंतसचिव, मंत्री, सेनापति, सुमंत, न्यायाधीश, पंडितराव हीं नांवें छत्रपतींच्या राज्यारोहणापासून रूढ झालीं. याचप्रमाणें बारा महालांना द्रव्यभांडार, धान्यागार, गोधन, अश्वधन, वसनागार आरामक्षेत्रें अशीं नांवें देण्यांत आलीं. अठरा कारखान्यांना रत्नशाला, शस्त्रशाला, रथशाला, यंत्रशाला, लेखनशाला, पाकशाला वगैरे नांवें देण्यांत आलीं. एखादी मित्राला चिठ्ठी ल्याह्यची झाली, तर ती इंग्रजीमध्यें लिहिणाऱ्या आधुनिक पंडितांनीं, छत्रपतींचा हा स्वदेश भाषेबद्दलचा अभिमान ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. पण सध्यांच्या आधुनिक पंडितांना आपलें तितकें गचाळ दिसतें त्याला काय करणार ? हें असें कां होतें तें कांहीं समजत नाहीं ! ज्यांना आपलेपणाचा थोडा तरी अभिमान वाटतो, त्यांनीं परमेश्वरापाशीं हिंदूंच्या कुलांना

भूषणभूत होईल अशी प्रजा यापुढें उत्पन्न होण्याविषयीं प्रार्थना करीत असावें, त्याला शरण जावें, एवढाच सध्यांसारखे पंडित ह्मणविणारे कुलांगार न उपजण्याला खातरीचा मार्ग दिसतो. असो.

छत्रपतीनीं यथाशास्त्र राजपदाचा स्वीकार केल्यावर, त्यांना आपण आश्रमबद्ध झालों याचा आनंद वाटावा, आणि त्यांनीं क्षत्रिय धर्माप्रमाणें वागण्याचा निश्चय करावा हें त्यांच्या सारख्या धर्मनिष्ठ पुरुषांना उक्तच होय. सांगायचें कारण, छत्रपतींना गागाभट्टांच्या हातून राज्याभिषेक झाल्या दिवसापासून, त्यांनीं नेम, धर्म, ईशाचिंतन, ईशपूजन, खाद्याखाद्य, पेयापेय या संबंधांत विशेष दक्षता राखली. आधींच त्यांचा धर्माचरणाकडे ओढा, त्यांत तीन धर्मांचा अधिकार त्यांना मिळाल्यामुळें त्यांना जन्मास आल्याचें सार्थक झालें, असें वाटूं लागलें. अत्यंत कष्टांनीं मिळविलेल्या राज्याचा उत्कर्ष होत होता, याचें त्यांना समाधान वाटत होतें, परंतु दोन गोष्टींमुळें त्यांना दुःख होत होतें. छत्रपतींनीं इ. स. १६६४ त आपल्या नांवाचा दाब बसावा ह्मणून, त्यांनीं आपल्या मागें राजा हें पद लावून घेतलें, त्यापूर्वींच थोडे दिवस त्यांचे वडील शहाजी हे वारले होते. कोणीही एखादें मोठें कृत्य केलें आणि जर त्याचीं वडील माणसें कौतुक करण्यास असलीं तर त्याचा आनंद कांहीं विशेष असतो. पण आपल्या मुलानें राजा हें पद आपल्या मागें लावून घेतलें याचें कौतुक करण्यास शहाजी वांचले नाहींत याचें दुःख छत्रपतींना अद्याप वाटत होतें. त्यांच्या

मातोश्री जिजाबाईसाहेब ज्यांच्यावर त्यांचें अवर्णनीय प्रेम होतें, त्या तरी छत्रपतींचा हा राज्यारोहणसमारंभ पहाण्यास जगाव्यात कीं नाहीं ? ! पण छत्रपतींच्या हृदयाला अत्यंत क्लेश व्हावेत अशी त्यांच्या मृत्यूनें वेळ गांठली. राज्यारोहणाच्या अगोदर थोडे दिवस त्या हा लोक सोडून गेल्या ! या समारंभाला जर जिजाबाईसाहेब जिवंत असत्या, तर त्यांना किती तरी आनंद वाटला असता ? पण हा समारंभ पाह्यला जिजाबाईसाहेब राहूं नयेत असा परमेश्वराच्या घरचाच नेमानेम होता असें ह्मणावें लागतें.

## छत्रपतींचें सैन्य नर्मदा उतरून पुढें गेलें.

छत्रपतींनीं ज्याअर्थीं राज्यारोहणाचा मोठा समारंभ केला, त्याअर्थीं त्या मानानें त्यांच्या प्रताप-दिनकराचें तेज वाढणें जरूर होतें. आणि त्याप्रमाणें त्यांचे नवीन सेनापति हंबीरराव यांनीं तें वाढविलें. छत्रपतींचें सैन्य या मागें नर्मदा-पार कधीं गेलें नव्हतें. पण हंबीररावांनीं इ. स. १६७५ त जी स्वारी केली, तींत ते सुरतेकडून चौथाई वसूल करीत, आडवे आले त्यांना कापीत, वऱ्हाणपुरच्या मुलखांत शिरले. त्यांनीं त्या मुलखांत प्रवेश केल्यावर चौथाई वसूल करण्यास प्रारंभ केला. जेथें गरिबीनें चौथाई मिळे तेथें हंबीररावांच्या हताखालचे सरदार कोणालाही त्रास देत नसत. परंतु जेथें गरिबीचें वर्तन दिसून येत नसे, तेथें हे मराठे सरदार आपलें विश्वस्वरूप प्रगट करून जो अनर्थापात करीत त्याचें वर्णन करण्यास जिवावर येतें !

छत्रपतींना चौथाईचा अंमल वसविण्याकरितां कित्येक गांवेंच्या गांवें जाळावीं लागलीं. एवढ्यावरून हंबीररावांना बऱ्हाणपूरच्या मुलखांत काय अनर्थापात करावे लागले असतील याची कल्पना वाचकांस होईल. हंबीररावांच्या हाताखालचे कांहीं सरदार आपलीं सैन्यें घेऊन भडोच भोंवतालच्या मुलखांत शिरले व त्यांनीं तेथें चौथाई वसूल केली. पुढें हंबीरराव माहूर देशांत शिरून तेथेंही त्यांनीं चौथाई वसूल केली. कितीही प्रयत्न केले तरी शिवाजीचा मोड न होतां त्याचीं सैन्यें नर्मदा उतरून आलीकडे आलीं, हें वर्तमान ऐकून अवरंगजेबाची काय स्थिति झाली असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. माहूर देशांत चौथाई वसूल केल्यावर हंबीरराव आपल्या बरोबरचें सैन्य घेऊन छत्रपतींच्या दर्शनाकरितां परत फिरले.

छत्रपती ज्याप्रमाणें अवरंगजेबाच्या मुलखांतून चौथाई वसूल करीत, त्याचप्रमाणें विजापूरकर, पोर्चुगीज, शिद्दी, यांच्याही मुलखांतून करीत. हंबीरराव सैन्य घेऊन बऱ्हाणपूर, भडोच, माहूर इकडे चौथाई वसूल करीत असतांना, मोरोपंत पेशवे यांनीं शौर्य गाजवून अवरंगजेबाच्या सरदारांचा मोड करून औंध व पट्टा हे दोन किल्ले परत घेतले. छत्रपतींचा जन्म ज्यांत झाला, तो शिवनेरी किल्ला घेण्याचें मोरोपंतांच्या मनांतून फार होतें. तेव्हां वरचे दोन किल्ले घेतल्यानंतर त्यांनीं आपलें सैन्य शिवनेरीकडे नेलें. या किल्ल्यावर अवरंगजेबाचें करोल सैन्य होतें, यामुळें मोरोपंतांनीं जरी मोठ्या कस्तीचे प्रयत्न केले, शिपायांच्या जिवाकडे ल-

क्ष दिलें नाहीं, तरी शेवटीं किल्ला हस्तगत न होतां त्यांना आपलें सैन्य घेऊन परतावें लागलें. शिवनेरीच्या संबंधांत छत्रपतींचें जें नुकसान झालें, तें हंबीररावांनीं केलेल्या पराक्रमाच्या मानानें पाहतां लक्षांत येण्यासारखें देखील नव्हतें व त्यामुळें त्याचें कोणास इतकेंसें वाईट वाटलें नाहीं. इकडे छत्रपतींनीं स्वतः पोंडा किल्ल्याला वेढा घालून तो मोठ्या शौर्यानें हस्तगत केला. नंतर ते पन्हाळा आणि तातोरा यांच्या मधील मुलूख घेण्याकरितां वळले व त्यांनीं या दोन किल्ल्यांमधील बहुतेक मुलूख आपल्या राज्याला मिळविला. या मुलखांत थोडें सैन्य ठेवून ते कोंकणांत गेले असता, विजापूरकरांच्या पदरचे घाडगे, निंबाळकर वगैरे मराठे सरदारांनीं, छत्रपतींनीं घेतलेल्या मुलखापैकीं कांहीं मुलूख परत घेऊन आपल्या सरकारच्या मुलुखास मिळविला.

हंबीरराव पुष्कळ संपत्ति घेऊन परत येत असतां, छत्रपतींना पाण्यांत पाहणाऱ्या, अवरंगजेबाची एकनिष्ठपणें चाकरी करणाऱ्या दिलेरखानानें गोदावरीच्या अलीकडे हंबीररावांच्या सैन्यावर मोठ्या त्वेषानें छापा घातला. हा छापा घालण्यांत दिलेरखानाचा विचार हंबीरराव जी मोठी संपत्ति घेऊन येत होते ती लुटण्याचा होता. दिलेरखानानें आपल्या पठाण स्वारांकडून हंबीररावाच्या सैन्यानें आपल्याबरोबर चालविलेली संपत्ति परत नेण्याकरितां जिवांची माती करविली. पण महाराष्ट्र देशाचा अभिमान राखणाऱ्या छत्रपतींच्या सरदारांनीं आपला एक सुताचा तोडा देखील त्यांच्या

हातीं लागूं दिला नाहीं. त्यांच्यांत व अलीकडील पिढ्यांत अंतर इतकेंच कीं ते अभिमान असा राखीत, व परदास्य करण्याकरितां निर्माण झालेल्या अलीकडल्या पिढ्या त्याला नांवानें ओळखतात ! ते त्याच्या करितां जिवाची पर्वा बाळगीत नसत. पण या संबंधांत, त्यांच्याशीं आधुनिकांचें साम्य लावतां येत नाहीं. कारण त्यावेळीं अभिमानाकरितां मरणारांचें भूषण समजलें जाई, आणि या काळीं तो सरकारी तुरुंग दाखविणारा मोठा गुन्हा झाला आहे! तेव्हां दोघांचें साम्य या संबंधांत लावूं पहाणें प्रशस्त होणार नाहीं. पण हा बाऊ दाखवून, मग अभिमानाची नांवानें ओळख आहे तीच बरी नव्हे का? असें ह्मणणें कोणाला शोभेल तें शोभो ! मानवी प्राण्याला हें उचित नव्हे, एवढें मात्र खरें. असो.

हंबीरराव नर्मदापार जाऊन अवरंगजेबाच्या सैन्याचा समाचार घेत मोठी संपत्ति बरोबर घेऊन परत आले, परंतु दुसऱ्याचें घेतां घेतां स्वतःच्या पागोट्याचा पदर जावा, अशांतला प्रकार झाला नाहीं हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. छत्रपती कोंकणांत स्वारीला गेल्याचा उल्लेख मागें झाला आहे. त्यांनीं दक्षिण कोंकणांत स्वारी करून तिकडूनही पुष्कळ संपत्ति आणिली. सारांश, छत्रपतींच्या राज्यारोहणानंतरच्या स्वाऱ्यांत त्यांना चांगलें यशच आलें.

## दक्षिण कोंकणांतल्या स्वारीविषयीं थोडा विचार.

छत्रपतींच्या या स्वारीबद्दल लिहितांना, परकीय इतिहासकारांनीं छत्रपतींविषयीं अनुदार बुद्धि ठेवून

आपल्या पूर्व अभ्यानानुसार तोंडसुख घेण्यास कमी करूं नये, हें त्यांचें ब्रीदच आहे. मुसलमान इतिहासकारांनीं छत्रपतींना शिव्या दिल्या, तर त्याचें नवल वाटायला नको. त्यांनीं मुसलमानांना तसेंच डवचलें होतें. पण इंग्लिश इतिहासकारांनीं त्यांचाच कित्ता गिरवावा हा मात्र चमत्कार आहे ! या स्वारीचा उल्लेख करितांना ज्याला खरा इतिहास ल्याह्यचा होता, त्यानें छत्रपतींवर, त्यांनीं पूर्वीं सारखीं भयंकर कृत्यें केलीं, गांवच्यागांव लुटले, जाळले असे आरोप करणें ह्मणजे सत्यापलाप करणें होय ! पण इंग्लिश पेनांतून जें निघालें तें सारें खरें, असा आधुनिकांचा बळकट समज ! असो !

छत्रपती परक्याच्या मुलखांत शिरले ह्मणजे आपला अंमल बसविण्याकरितां अति भयंकर स्वरूप धारण करीत, प्रसंगीं भारी क्रूर होत, या गोष्टी कोणालाही नाकबूल करितां येणार नाहींत. त्यांत अति मगरूर असे यवन जर कां त्यांच्या तडाक्यांत सांपडले, तर त्यांच्या आरक्त नेत्रांतून अग्नीच्या ठिणग्या पडताहेत कीं काय असें वाटावें, असा प्रखरकोप त्यांना येई. अशा वेळीं त्यांनीं इतरांची बोबडी वळून जाण्यासारखीं कृत्यें करावींत, ते शरीरानें जरी ह्मणण्यासारखे मोठे नव्हते तरी बालराक्षसासारखे दिसावेत, त्या वेळीं विपक्षाचा नाश करायचा या पलीकडे त्यांच्यांत कसा तो विचार उरूं नये हें स्वाभाविक आहे. आणि जगांतील लोकोत्तर वीरांची स्थिति पाहिली असतां अशीच दिसून येईल. छत्रपतींच्या अंगांत वीरश्री संच-

रली ह्मणजे ते इतके भयानक दिसूं लागत, कीं सामने-वाला कसाही वीरमणी असला तरी त्यानें त्यांच्यापुढें गाय व्हावें. परंतु छत्रपतींची नेहमींची वृत्ति अशी नसे. त्यांच्या भोंवतीं सदां शांतीचें आवरण असे. आणि यामुळेंच शरणागताचें रक्षण करितांना ते शशिकरासारखे शांत दिसत. लढाई किंवा छापा संपल्यानंतर शत्रूकडील जे सरदार व शिपाई त्यांच्या हातीं लागत त्यांना ते सन्मानानें वागवीत. जखमी झाले असल्यास औषध पाणी देववून त्यांना बरे करवीत, व मग पोषाख देऊन त्यांना निरोप देत. या गोष्टी परकीय इतिहासकारांना कबूल कराव्या लागल्या आहेत. छत्रपती जर दरवडेखोर, लुटारू, वाटमारे, सारांश राक्षसाच्या स्वभावाचे असते, तर त्यांच्या हातून थोर थोर न्यायी ह्मणविणाऱ्या राजांनीं अनुकरण करण्यासारखे हे प्रकार झाले असते काय ?

परकीय इतिहासकार छत्रपतींच्या राज्यारोहणानंतरच्या दक्षिण कोंकणांतील स्वारीविषयीं लिहितांना, छत्रपतींनीं अमानुष कृत्यें करून चौथाई अंमल बसविला व सुंडा संस्थानापर्यंत मुलूख लुटला असें ह्मणोत, पण खरा इतिहास याच्या अगदीं विरुद्ध आहे. छत्रपतींचा लौकिक आज कित्येक दिवस वाढत होता. छत्रपती धर्मभीरु आहेत, त्यांच्यावर देवीची पूर्ण कृपा आहे, ते न्यायी आहेत, हिंदूंचा उत्कर्ष व्हावा याकरितां ते आश्रांत श्रम करीत आहेत, ते यशोध्वज आहेत, अपयश असें त्यांना कमी, त्यांचें आचरण शुद्ध आहे, पाडाव झालेल्या शत्रूंच्या रमणींना ते मायभगि-

नी समजतात, या छत्रपतींच्या गुणांनीं ते कोंकणांतील हिंदु प्रजेला हवेहवेसे झाले होते. छत्रपतींचें आपल्यावर स्वामित्व असावें ही त्यांना आशा लागून राहिली होती. ही गोष्ट छत्रपतींना कळूं नये अशा प्रकारच्या अंदाधुंदीचा रोजगार त्यांच्या गोटांत नव्हता हें विस्तारानें सांगण्याची जरूर नाहीं. छत्रपती कोंकणांत जे वळले, ते वरची गोष्ट लक्षांत आणूनच वळले होते. अशा स्थितींत ते परकीय इतिहासकारांनीं उल्लेख केल्याप्रमाणें वागले असतील कीं काय, याची कल्पना वाचकांनींच करावी. ह्या दक्षिण कोंकणच्या स्वारींत छत्रपतींनीं गरीब प्रजेला त्रास होईल अशा प्रकारची क्रूरता मुळींच धारण केली नाहीं. जेथें लढण्याचे प्रसंग आले तेथें मात्र त्यांनीं आपलें साहसादि गुण दाखविलें, पण तेवढ्यावरून परकीय इतिहासकारांना छत्रपतींना दोष देतां येणार नाहीं. कारण लढाई ह्मटली कीं, घात, पात, मनुष्यहानी हे प्रकार तिच्या पाठींशी उभे असायचेच. आणि लढाईसंबंधाचा दोष एका पक्षाला देऊन कधींही भागायचें नाहीं. फार चिकित्सा करीत बसलें तर दोषाचें प्रमाण कमीजास्त होईल इतकेंच. सांगायचें तात्पर्य, छत्रपतींनीं जरी या दक्षिण कोंकणच्या स्वारींत कित्येक ठिकाणें लुटलीं, तरी सर्वसाधारण लोकांच्या प्रीतींतून ते उतरले नाहींत इतकेंच नाहीं, तर या महात्म्या हिंदु राजाची प्रजा आपण केव्हां होऊं, असा दक्षिण कोंकणांतील लोकांना चटका लागला.

छत्रपतीं परकीय सत्तांपासून चौथाई घेऊं लागले, तिचा प्रारंभ करतेवेळीं त्यांना मारहाण, जाळ, लूट अ-

सले प्रकार करावे लागले खरे. पण त्यांनीं तेव्हांच जाहीर केलें कीं, जे आमचा चौथाई अंमल बिनतक्रार देतील त्यांना आमच्यापासून कधींही त्रास पोंचणार नाहीं. याप्रमाणें ज्या भागांतून त्यांना बिनतक्रार चौथाई मिळूं लागली त्या भागांना त्यांनीं त्रास तर दिला नाहींच. परंतु चौथाईचा वसूल करतेवेळीं, ज्या प्रजेकडून आपल्याला चौथाई पोंचते तिला तिच्या सरकाराकडून जुलमानें वागविलें जातें कीं काय याची छत्रपती चौकशी करवूं लागले. मुसलमानी सत्तांच्या नौकरींतले मुसलमान कामगार, त्यांच्या लहरीप्रमाणें हिंदु प्रजेला भारी छळीत. आजपर्यंत त्यांचीं दुःखें ऐकून घेणारा व त्यांच्या प्रतिकाराकरितां यत्न करणारा कोणी नव्हता, यामुळें त्या गरीबांना होतील तितके जुलूम निमूटपणें सोसावे लागत असत. पण छत्रपतींच्या सरदारांनीं चौथाई घेण्यास सुरवात केल्यापासून आपलीं दुःखें सांगण्यास त्यांस एक चांगली जागा झाली. छत्रपतींचे सरदार मुसलमानी प्रजाजनापासून त्यांचीं दुःखें ऐकून घेऊन त्यांच्यावर असलेल्या मुसलमान कामदारास चांगली दहशत घालीत. छत्रपतींच्या पराक्रमाचा वारंवार अनुभव येत असल्यामुळें, त्यांच्या पदरच्या सरदारांनीं मुसलमान कामदारांना घातलेल्या दहशतीचा चांगला उपयोगही होत असे. सारांश, छत्रपतींनीं मनगटाच्या जोरावर तर खराच, पण जो चौथाई अंमल सुरू केला त्यापासून प्रजाजनांचा जुलूम पुष्कळ कमी झाला. या अशा गोष्टींचा उल्लेखही न करितां परकीय इतिहासकारांनीं छत्रपतींसारख्या न्यायी व पापभीरु दयाभूत

अंतःकरणाच्या हिंदु राजाला नुसत्या शिव्या द्याव्यात हा एक जगांतील ध्यानांत ठेवण्यासारखा चमत्कारच नव्हे काय ? असो.

## छत्रपतींचा आजार.

छत्रपतींनीं, क्षत्रिय कुलावतंस श्रीराजा शिवछत्रपती अशीं जीं आपल्या नांवाला उपपदें राज्यारोहणमहोत्सवप्रसंगीं लावून घेतलीं, त्यांना साजेसा दसऱ्याचा दरबार केल्यावर सेनापति हंबीरराव यांना बरोबर सैन्य देऊन अवरंगजेबाच्या मुलखांत पाठविलें. हंबीररावांनीं खानजहान व दिलेरखान ज्या प्रांतांत नव्हते त्या प्रांतांत शिरून कांहीं ठिकाणची त्यांचीं ठाणीं उठविलीं व चौथाईचा वसूल पुष्कळ केला.

इकडे छत्रपतींनीं निंबाळकर, घोरपडे वगैरे विजापूरकरांच्या पदरच्या सरदारांनीं तातोरा व पन्हाळा यांच्या मधील जो मुलूख परत घेतला होता तो घेतला. या दोन किल्ल्यांमधील मुलूख चांगला सुपीक असल्यामुळें विजापूरकरांच्यानें तो सोडववत नव्हता. छत्रपतींनीं हा मुलूख आतां जो घेतला तो तिसऱ्यांदां घेतला, यावरून हा मुलूख आपल्या हातांतून न जाऊं देण्याबद्दल विजापूरकर किती प्रयत्न करीत होते, याची वाचकांस कल्पना करितां येईल. आपण जरी तिसऱ्यांदां हा मुलूख घेतला, तरी विजापूरकर तो परत घेण्याविषयीं प्रयत्न केल्यावांचून रहाणार नाहींत असें छत्रपतींच्या मनांत येऊन, त्यांनीं तो फिरून विजापूरकरांच्या हातीं जाऊं नये ह्मणून त्यांत कित्येक किल्ले बांधण्या-

चा विचार ठरविला. हा विचार त्यांनीं मनांत न ठेवतां लागलीच किल्ल्यांच्या कामांना सुरवात करविली व त्यांना वर्धनगड, भूषणगड, सदाशिवगड व मच्छिंद्रगड अशीं नांवें दिलीं. छत्रपतींच्या चरित्रांत आजपर्यंत ते आजारी पडले असें कोठेंही आढळांत आलें नाहीं. परंतु यावेळीं त्यांना ज्वर व कपाळशूळ यांनीं अगदीं बेजार करून सोडलें. ज्या मनुष्याला रोगाची संवय असते त्याला त्याचें कांहीं विशेष वाटत नाहीं. परंतु ज्याला पडसें व हलकेंसें कपाळ दुखणेंही माहीत नाहीं, अशाला थोडा जरी ताप आला तरी तो अगदीं गळून जातो. तेवढ्याशा तापानें हें आपल्याला काळाचें बोलावणें आलें, असें त्यांस वाटूं लागून तो धीर सोडतो. छत्रपतींच्या वरील आजारांचा प्रकार असाच झाला. आजपर्यंत त्यांना कांहीं आजार झाला नसेल असें नाहीं. पण तो त्यांना बिछान्यावर निजविण्यासारखा नसल्यामुळें, वरील बिछान्याची प्रार्थना करायला लावलेल्या आजारांनीं छत्रपतींचा धीर खचविला. आपण या आजारांतून उठत नाहीं असें त्यांच्या मनानें घेतलें. अवरंगजेब, विजापूरकर, शिद्धी, गोवळकोंड्याचे कुतुबशहा, पोर्तुगीज, इतके सगळे एकदम उठले असते तरी जो गृहस्थ गयावया झाला नसता, त्याला फारा दिवसांच्या बेसुमार श्रमांनीं आलेल्या ज्वरानें व कपाळदुखीनें गोगलगाय बनविलें ! अशा वेळीं काळजीनें आपलीं शस्त्रास्त्रें सावरावींत हा तिचा धर्मच. छत्रपतींना आपल्या मागें आपल्या कुटुंबाचें कसें होईल एवढीच काळजी नव्हती. आपल्या मागें आपण मि-

ळविलेल्या राज्याचें रक्षण कसें होईल, त्याचा उत्कर्ष कसा होईल, ही राक्षसरूपी काळजी आधींच आजारांनीं धीर सोडविलेल्या त्यांच्या हृदयावर नाचत होती आणि तिच्यामुळेंच छत्रपतींच्या शक्ति झपाट्यानें क्षीण होऊं लागल्या.

आजारांचा व काळजीचा जसजसा जोर होत चालला, तसतसें आपली जीवयात्रा संपत आली असें छत्रपतींना वाटूं लागलें. तेव्हां त्यांनीं आपलें लक्ष राज्यसंबंधी विचारांतून काढून त्याला ईशचिंतनाकडे व सत्कर्माकडे वळविलें. त्यांनीं सत्पशतीचे पाठ, शिवावर रुद्रावर्तनाच्या संततधारा वगैरे धार्मिक प्रकार सुरू करविले. ब्राह्मण, बहिरागी, साधुसंत यांना संतुष्ट करण्याचें त्यांनीं व्रत धारण केलें. ईशचिंतनांत व्यत्यय येऊं नये ह्मणून त्यांनीं बहुतेकांना आपली भेट बंद करविली. तात्पर्य मृत्यु केव्हां येतो अशा तयारीनें ते त्याची वाट पहात बसले. परंतु छत्रपतींच्या हातून आणखी कित्येक महाकार्यें व्हावयाचीं होतीं, तेव्हां मृत्यु त्यांच्यावर झडप कोठून घालणार ? सांगायचें कारण, कांहीं दिवसानीं छत्रपतींच्या रोगास उतार पडत चालला. तेव्हां त्यांच्या मनांत घोळूं लागलें कीं, ईश्वराच्या मनांतून आपल्या हातून स्वदेशाची सेवा आणखी घ्यावयाची आहे, तर आपण ती काय ह्मणून अंगाच्या बाहेर टाकावी ? असा विचार करून छत्रपतींनीं फिरून आपलें लक्ष स्वराज्याच्या उत्कर्षाकडे लाविलें. त्यांनीं कर्नाटकांत मोठी स्वारी नेऊन तिकडील मुलूख स्वराज्याला मिळवावा आणि

आपल्या वडलांनीं मिळविलेल्या जहागिरीपैकीं निम्मा हिस्सा व्यंकोजीपासून घ्यावा असें मनांत आणिलें.

छत्रपतींनीं ही मोठी स्वारी करण्याचें मनांत आणिलें खरें, पण ही स्वारी करायची ह्मणजे आपलें राज्य तीनशें कोसांवर टाकून जायचें होतें. त्यांत राज्याला कोणी शत्रु नाहीं अशी स्थिति असती, ह्मणजे इतक्या लांबची स्वारी करण्यास हरकत नव्हती. पण तशी स्थिति कोठें होती? छत्रपतींनीं नवीन स्थापिलेलें महाराष्ट्रियांचें राज्य बुडवावें अशी इच्छा करणारे शत्रु पुष्कळ होते, आणि तेही प्रबळ होते. आपल्या एकट्याच्या हातून मराठ्यांचें पारिपत्य होत नाहीं, असें पाहून, खानजहान बहादुर विजापूरकर व गोवळकोंडेकर यांचें साहाय्य घेऊन छत्रपतींची सत्ता नामशेष करण्याच्या विचाराला लागले होते. पण त्यांचे यजमान अवरंगजेब यांची भूक फार मोठी. विजापूरकरांचें व गोवळकोंडेकरांचें साहाय्य घेण्यांत त्यांना कमीपणा वाटत होता. त्यांचे विचार असे चालले होते कीं, दक्षिणेंतल्या या तिन्ही सत्ता नाहींशा कराव्यात. सरळ लढाया करून या तिन्ही सत्ता नाहींशा करणें दुरापास्त आहे याचा अवरंगजेबाला अनुभव आल्यासारखाच झाला होता. फितुरावांचून आपली आशा पूर्ण होत नाहीं हें अवरंगजेबाला समजून चुकलें असल्यामुळें, त्यानें दिल्लीहून आपल्या कपटप्रयोगांना सुरवात केली होती. आपल्या वकिलांमार्फत लांच देवून त्यानें विजापूर व गोवळकोंडें यांच्या दरबारांत कांहीं फितूर करविला. आणि या फितुरानें त्याला

अशीही उमेद आली कीं, आतां आपण सैन्य पाठविण्याचाच काय तो अवकाश आहे, लढाईला सुरवात झाली कीं हीं दोन्ही राज्यें आपल्या पदरांत पडतील. पण छत्रपतींच्या अष्ट प्रधानांत व रणशूर सरदारांत फितूर व्हावा अशी मोहनी अवरंगजेबाच्या कपटप्रयोगांत नव्हती म्हणा, किंवा छत्रपतींच्या नैसर्गिक बुद्धिवर्चस्वापुढें अवरंगजेबाची कर्तबगारी बोथटली होती असें म्हणा. सारांश त्याची लटपट छत्रपतींच्या दरबारांत चालली नाहीं, अथवा तिकडे त्याच्यानें पाहववले देखील नाहीं. तरी असा महा बलाढ्य शत्रु टपून बसला असतांना, छत्रपतींनीं इतक्या लांबच्या स्वारीवर जाणें ह्मणजे अति धाडसाचें होतें हें कोणीही कबूल करील. दुसरें असा एखादा मोठा शत्रु उठला, कीं लहानांचेंही चांगलें फावतें. ते अशा वेळीं, सापडेल तेवढें हाताखालीं घालून स्वस्थ बसल्यावांचून रहात नाहींत हा अनुभव जगतांत वारंवार येतो. तात्पर्य, विजापूरकर, शिद्दी, फिरंगे यांना या स्वारीनें आपापले मुलूख परत घेण्यास सवड देण्याप्रमाणें होतें. गोवळकोंडेकर जरी छत्रपतींशीं स्नेहानें वागत होते, तरी अशी सोन्यासारखी संधि आल्यावर त्यांनीं ह्मणजे आपला स्नेह कायम ठेवलाच असता, असें ह्मणतां येत नाहीं. एकंदरींत कर्नाटकांत मोठ्या स्वारीवर जावें अशी छत्रपतींच्या मनांत ते आजारांतून बरे झाल्यावर कल्पना आली, परंतु तिच्या मागून लागलींच त्यांना हीं पुढील संकटेंही दिसूं लागलीं !

परंतु छत्रपतींचा स्वभाव नुसत्या मनोराज्यावर आ-

रूढ होणारा नव्हता. एकदां एखादी गोष्ट त्यांच्या मनांत भरली, ह्मणजे ती घडवून आणल्यावांचून त्यांना चैन पडत नसे. त्या गोष्टीचा त्यांना निजध्यास लागून राही. ती घडवून आणण्यांत त्यांना जरी सहस्र संकटें दिसूं लागलीं तरी त्यांचें मन निराशेच्या स्वाधीन होत नसे. एकेक संकटाची वाट लावण्याच्या ते उद्योगाला लागत. आणि यामुळें थोड्याच दिवसांत जी गोष्ट प्रथम त्यांना दुरापास्तशी वाटत असे, ती हळूं हळूं त्यांना साध्य आहे अशी दिसूं लागे. जे लोक छत्रपतींचा हा कित्ता गिरवितील त्यांना सध्यांसारख्या काळांत देखील सिद्धी वश झाल्यावांचून रहाणार नाहींत. सिद्धीची खुबीच ही आहे कीं, हें कसें होईल, हें कसें होईल, असें रडगाणें गात बसलें कीं, तीही तोंड फिरविते. पण जर हुरूप धरून तिचा पिच्छा पुरविला तर ती आपण होऊन सेवेला येते. असो. कर्नाटकांत आजपर्यंत स्वारीबरोबर कधीं सैन्य घेतलें नाहीं किंवा पाठविलें नाहीं एवढें सैन्य घेऊन जायचें, हा छत्रपतींनीं निश्चय तर केला. अवरंगजेबाची सगळ्यांत मोठी भीति, ती कशी नाहीशीं होईल या विचाराला मग ते लागले. अवरंगजेबाचा दक्षिणचा सुभेदार खानजहान याजबरोबर छत्रपतींनीं तात्कालिक लीनता धारण करून पत्रव्यवहार सुरू केला. छत्रपतींचा हा अशा प्रकारचा पत्रव्यवहार सुरू होतांच, आपल्या हातून यजमानांची कांहींएक कामगिरी झाली नाहीं असें वाटत असलेल्या खानजहानास नागवें कोल्हें भेटल्यासारखें झालें. त्यानें वि-

शेष आढेवेढे न घेता, अवरंगजेबाबरोबर सख्य करण्याकरितां छत्रपती जी रक्कम देण्यास कबूल झाले होते ती कबूल केली व छत्रपतींशीं सख्य केलें. छत्रपतींनीं खानजहानानें आपलें मोठें काम केलें, ह्मणून त्यास चांगलें बक्षिसही दिलें. याप्रमाणें छत्रपतींनीं त्यांचा जो मोठा शत्रु त्याची भीति नाहींशी केली.

आपण कर्नाटकांत स्वारीवर गेल्यावर विजापूरकर स्वस्थ बसणार नाहींत हें छत्रपतींना माहीत होतें. तथापि विजापूरकरांची सध्यांची स्थिति अशी झालेली होती कीं, छत्रपतींनीं त्यांचे घेतलेले मुलूख परत घेण्याचे उद्योग करावेत असें त्यांस वाटावें, पण दरबारांत माजलेल्या दुहीमुळें ते उद्योग करण्यास विशेषसें कोणी मनावर घेऊं नये. कारण लढाया करितां करितां दरबारची सरदारमंडळी अगदीं विटून गेली होती. उघडच आहे, लढाया करून जय येत असले, ह्मणजे सरदारमंडळींना जरी पैशाच्या बाजूनें चांगलीशी स्थिति नसली तरी लढाईचा हुरूप येतो. पण तेंही नाहीं व तेंही नाहीं, असा प्रकार असल्यावर कसा हुरूप यावा? अलीकडे विजापूरकरांनीं छत्रपतींच्याबरोबर जितक्या ह्मणून लढाया केल्या होत्या, त्या सर्वांत त्यांना अपजय आले होते. आणि यामुळें मुसलमान सरदारांना तरी निदान छत्रपतींच्या सैन्याबरोबर सामना द्यायचा ह्मणजे त्याचें थरत भय वाटे. हा प्रकार छत्रपतींना पुरा कळून आला असल्यामुळें विजापूरकरांच्या तोंडावर कांहीं टाकून त्यांना स्वस्थ बसवावेत असें त्यांस वाटलें नाहीं. खेरीज छत्रपती आपलें राज्य

अगदींच मोकळें सोडून चालले होते अशांतला भाग न-व्हता. ज्या प्रदेशावर विजापूरकरांचा विशेष डोळा होता, त्यांत नवे किल्ले बांधवून त्या प्रदेशाची छत्रपतीं-नीं चांगली मजबूती करविली होती.

जंजिऱ्याच्या शिद्दीची व फिरंग्यांची छत्रपतींना इतकीशी भीति वाटत नव्हती. तथापि ते आपण कर्ना-टकांत गेल्यावर त्रास देण्यास कमी करणार नाहींत हें ते जाणून होते. याकरितां त्यांनीं पंतसचिव अण्णाजी दत्तो याजपाशीं पुष्कळ सैन्य देऊन त्याला कोंकणच्या प्रांतांचें रक्षण करण्याकरितां ठेविलें, आणि मुख्य प्र-धान मोरोपंत पिंगळे याच्यावर सर्व राज्याची व्यवस्था सोंपवून ते कर्नाटकांतल्या स्वारीच्या व्यवस्थेला लाग-ले. ही एक गोष्ट येथें सांगितली पाहिजे कीं, छत्रपतीं-ना ही कर्नाटकांतली स्वारी करण्याची कल्पना रघु-नाथ नारायण हणवंते यानें सुचविली. शहाजींचा वि-श्वासुक दिवाण नारोपंत हणवंते याचा हा मुलगा. श-हाजी वारल्यावर वेंकोजीचें व याचें पटेनासें झाल्या-मुळें तो आपली वडलार्जित नौकरी सोडून कर्नाटकांतून इकडे आला. प्रथम तो गोंवळकोंड्याकडे गेला होता. तो जातीचा हुषार असल्यामुळें गोंवळकोंड्यास दिवा-णागिरीवर असलेले महादुण्णापंत यांची तेव्हांच त्याज-वर मर्जी बसली. तथापि त्याला तेथें आपल्या योग्य-तेप्रमाणें काम मिळत नाहीं असें दिसल्यावरून तो छ-त्रपतींच्या आश्रयाला आला. आपल्या वडलांच्या दि-वाणाचा हा मुलगा हें ओळखून छत्रपतींनीं त्याचा बहुमान केला. थोड्याच दिवसाच्या सहवासानें छत्रपतीं-

ना हें समजून आलें कीं, रघुनाथपंत हा आपल्या बापासारखा किंबहुना कांकणभर अधिक हुषार आहे. तेव्हां त्यांनीं रघुनाथ नारायण यास आपला पंतअमात्य केलें. असो.

## कर्नाटकावर स्वारी.

इ. स. १६७६ च्या शेवटाला छत्रपती आपल्याबरोबर ३०,००० घोडेस्वार आणि ४०,००० पायदळ घेऊन निघाले. त्यांना आपल्याबरोबर कर्नाटकांत इतकें सैन्य नेतां आलें, यावरून त्यांच्याजवळ एकंदर यावेळीं एक लाख सैन्याची तरी भरती असली पाहिजे हें कोणीही कबूल करील. छत्रपतींना प्रथम हैदराबादेस जाऊन गोंवळकोंडेकरांशीं तह करावयाचा असल्यामुळें ते तिकडे गेले. त्यांनीं प्रल्हादपंताला आपण येत आहोंत ही बातमी कळविण्याकरितां पुढें पाठविलें. छत्रपती आपल्याबरोबर इतकें थोरलें सैन्य घेऊन येत आहेत ही बातमी समजतांच गोंवळकोंडेकरांना भीति उत्पन्न झाली. त्यांना छत्रपती इतकें सैन्य बरोबर घेऊन येताहेत, तेव्हां त्यांचा हेतु चांगला नसावा असें वाटावें हें स्वाभाविक आहे. परंतु प्रल्हादपंत महादुण्णापंताला भेटल्यावर त्यानें छत्रपती आपल्याबरोबर लढण्याच्या हेतूनें येत नसून तहाच्या हेतूनेंच येत आहेत, त्यांच्या येण्यानें आपला फायदाच होणार आहे, असें जेव्हां सांगितलें, तेव्हां गोंवळकोंडेकरांची भीति गेली. छत्रपती हैदराबादेजवळ गेल्यावर महादुण्णापंत पुष्कळ लांबपर्यंत त्यांच्या सामोरे आले, व त्यांनीं मोठ्या समारंभानें छत्रपतींना हैदराबादेंत नेलें. तेथें गेल्यावर एक

दिवस मध्यंतरीं गेल्यावर कुतूबशहा व छत्रपती यांचीं पुष्कळ वेळ गुप्त रीतीनें बोलणीं झालीं. छत्रपतींना कुतूबशहाबरोबर विरोधाचें बोलणें मुळींच करावयाचें नव्हते, यामुळें कुतुबशहाला छत्रपतींच्या भेटीनें फार आनंद झाला. आपल्यांत कधींही विरोध नसावा व परस्परांनीं परस्परांला मदत करावी. अवरंगजेबाला नेहमीं शत्रु लेखावें, विजापुरकरांची दिवाणगिरी महादुण्णापंताच्या भावाला देऊन विजापुरकरांच्या दोऱ्या आपल्या हातीं राखाव्यात वगैरे बोलणीं झालीं. छत्रपती हैदराबादेंत एक महिना राहिले होते. या मुदतींत त्यांनीं महादुण्णापंताला वश करून स्वारी खर्चाला पुष्कळ पैसा गोंवळकोंडेकरापांसून घेतला. छत्रपतींनीं आपल्याजवळ ज्या मानानें पुष्कळ सैन्य ठेविलें होतें त्या मानानें पाहतां, त्यांच्यापाशीं तोफा कमी होत्या. तेव्हां त्यांनीं गोंवळकोंडेकरापांसून तोफा घेतल्या. आणखी एक त्यांच्याबरोबर त्यांनीं असा ठराव केला कीं, आह्मी कर्नाटकांत असतांना जर आमच्या राज्यावर परचक्र आलें तर तुह्मीं मोरोपंत पिंगळे यांना मदत करावी. या सर्व गोष्टी गोंवळकोंडेकरांनीं कबूल केल्यावर, या सर्वांचा मोबदला ह्मणून छत्रपतींनीं कर्नाटकाच्या या स्वारींत जो मुलूख काबीज होईल त्यांतला निम्मा तुह्माला देऊं असें सांगितलें. छत्रपती हैदराबादेंत असतांना गोंवळकोंडेकरांनीं त्यांचा फार फार सन्मान केला. त्यांनीं छत्रपतींना मोठी मेजवानी व नजराणे दिले. छत्रपतींनींही कुतुबशहा, महादुण्णापंत व सर्व दरबारी मंडळी यांना जंगी मेजवानी, नजराणे,

पोषाख वगैरे देऊन सर्वांचा संतोष केला. हें इतकें लिहिल्यावर छत्रपतींचें सैन्य जोंपर्यंत गोंवळकोंडेकरांच्या हद्दींत होतें तोंपर्यंत त्यानें त्यांच्या प्रजेला मुळींच त्रास दिला नाहीं, हें लिहिलेंच पाहिजे असें नाहीं.

छत्रपतींच्या इच्छेप्रमाणें हैदराबादेंतील सर्व कामें झाल्यावर, ते सैन्य घेऊन दक्षिण दिशेनें चालले. कृष्णा नदी उतरून कर्नूलावरून छत्रपतींचें सैन्य कडाप्पाकडे जात असतांना, वाटेंत पूर्वेकडे थोड्या अंतरावर श्रीशैल्य मल्लिकार्जुनाचें स्थान आहे त्याच्या दर्शनाला छत्रपती अगदीं सड्या स्वारीनें गेले. तें शंकराचें अवर्णनीय स्थान पाहून छत्रपतींना तेथें थोडे दिवस वास करावा असें वाटलें. तेथील वनशोभा पाहण्याकरितां व कांहीं दिवस आनंदानें विश्रांति घेण्याकरितां, तेथें रहावें असें छत्रपतींच्या मनांत आलें नाहीं. आनंदाची विश्रांति घेण्याकरितां छत्रपतींचा जन्म नव्हता. ईशसेवा, देशसेवा, धर्मरक्षण, गोब्राह्मणप्रतिपालन, हींच ते आपली विश्रांति मानीत. त्यांची देवावर पक्की निष्ठा होती. कट्या निष्ठेनें बसलें असतां, जो आपल्याला दगडाचा दिसतो, तो देव आपल्याबरोबर बोलल्यावांचून रहाणार नाहीं, हें त्यांच्यावर समर्थासारख्यांचे जे प्रसाद झाले होते त्यांनीं त्यांना पक्कें कळून आलें होतें. सारांश, तें शंकराचें स्थान पाहून छत्रपतींना आपल्या भविष्यांत काय आहे तें देवाजवळून समजावून घेण्याची स्पृहा उत्पन्न झाली. त्यांनीं देवापुढें खडतर तपश्चर्या करण्याचा निश्चय केला व ते लागलींच तपश्चर्येला बसले ! वाचकहो, केवढी जबरदस्त ही ईशनि-

ष्ठा ! अशा प्रकारची ईशनिष्ठा सध्यांच्या काळीं मुळींच दिसून येत नाहीं असें नाहीं. दिसून येते, पण ती अशा लोकांत कीं, ज्यांनीं संसार असार मानला आहे. संसार असार नाहीं, असें मानणाऱ्या कर्त्या ह्मणून मिरविणाऱ्या पुरुषांत मात्र, ती मुळींच दिसून येत नाहीं. आणि असा प्रकार झाला असल्यामुळेंच तर आपणा आर्यांना ही सध्यांची दुर्दशा बिलगली नसेलना ? ! धर्म सोडला, ईशनिष्ठा सोडली ह्मणजे अवनति बोकांडीस बसते इतकेंच नाहीं, तर प्रत्यक्ष मृत्यु येतो असें सर्वमान्य वृद्ध ह्मणत आले आहेत, त्याचा आपण अवश्य विचार केला पाहिजे. नुसता विचार करूनच उपयोग नाहीं, ज्या मार्गानें छत्रपतींसारखे धन्यात्मे गेले, त्याच मार्गाचें अनुकरण आपण केलें पाहिजे. दगडाचा देव आपल्याला काय देणार, त्याची पूजा केल्यापेक्षां ह्मशीची चाकरी केली तर ती दूध तरी अधिक देईल, असें ह्मणणाऱ्या आपणाला नरकवास भोगण्याकरितां दुसरीकडे कोठें जायला नको आहे, सध्यां आहे हाच नरकवास नव्हे काय ? छत्रपतींच्या काळीं आपल्या पूर्वजांना जें समाधान वाटत असेल, त्यांना जो आनंदानुभव असेल, त्यांच्यांत जी दिलदारी असेल, त्यांच्या ज्या आशा असतील, त्यांचा एक लक्षांश तरी आपल्याला आहे काय ? मनुष्य ह्मणवून घेण्याची योग्यता तरी आपल्यांत उरली आहे काय ? नरकांतले किडे आपणासारखेच जन्मास येतात, जन्मास आलेल्या ठिकाणीं वाढतात, व कोणी मारले किंवा मृत्यु आला ह्मणजे आपणासारखेच मरून जातात. मग त्यांच्यांत व

आपणांत फरक तो कोणता ? उदरभरणाकरितां ते वळवळ करितात, तशीच आपण करितों. मनुष्य जातीला शोभेल असें त्यांच्यापेक्षां आपण अधिक कांहीं करतों काय ? ! ईश्वरानें त्या किड्यांना जर मनुष्याची बुद्धि व विचारशक्ति दिली असती, तर खचित खचित जरी त्यांना हातपाय नाहींत तरी त्यांनीं त्या बुद्धीचा व विचारशक्तीचा अधिक उपयोग केला असता ! पण आह्मी मनुष्यासारखे मनुष्य असतांना, बुद्धि व विचारशक्ति ईश्वरानें आह्मांला दिली असतांना, आह्मी तिचा कांहीं एक उपयोग करीत नाहीं ! वाटेल त्यांनीं आह्मांला येऊन तुडवावें, लुबाडावें, आह्मांला हवें तसें वागवावें; पोटापुरती वळवळ करायची एवढें आह्मी जाणतों ! हर हर! धिक्कार असो आह्मां कुलांगारांना! असो!

श्री शैल्य मल्लिकार्जुनापुढें छत्रपतींनीं बारा दिवस कांहीं एक न खातां कठोर तपश्चर्या केली. ती त्यांची कठोर तपश्चर्या पाहून महादेव त्यांना प्रसन्न व्हावेत हें स्वाभाविक आहे. छत्रपतींच्या या तपश्चर्येसंबंधानें कित्येकांचें असें ह्मणणें आहे कीं, अकरा दिवस तपश्चर्या केली असतां महादेव जेव्हां प्रसन्न होईनात, तेव्हां छत्रपतींनीं बाराव्या दिवशीं तलवारीनें आपला कंठनाळ चिरून आपल्या रक्ताचा शिवाला अभिषेक करून आपला अवतार संपवावा अशा हेतूनें तलवार काढली ! धन्य तो शिवराय, कीं जो शंकराला प्रसन्न करण्याकरितां आपला जीव देण्यास तयार झाला. करुणाघन शंकराला अशा परम भक्ताची करुणा कशी येणार नाहीं ? त्या करुणाघनानें शिवरायांची निष्ठा ओ-

ळखून अंतःकरणांत द्रवून जाऊन आपलें स्वरूप प्रगट केलें व शिवरायांच्या हातांतली तलवार धरून सांगितलें—बा शिवबा, अद्याप तुझ्या हातून पुष्कळ कार्यें व्हावयाचीं आहेत. ज्या कार्याला तूं निघाला आहेत तें आपलें कार्य कर. तुला कोठेंही अपयश येणार नाहीं. शिवरायांच्या निष्ठेबद्दलची एक गोष्ट समर्थ रामदास स्वामींच्या बखरींत आहे. ती येथें सांगितली असतां विषयांतर झालें असें केवळच कांहीं वाचकांना वाटणार नाहीं. एकदां समर्थांच्या मनांत आपल्यावर शिवरायाची निष्ठा किती आहे ती आजमावयाचें आलें. समर्थांचें फार पोट दुखायला लागलें, तें इतकें कीं समर्थ गडबडा लोळूं लागले. हजारों औषधी उपाय केले, पण गुण ह्मणून कशानेंही येईना. सर्वांचें उपाय थकले, तेव्हां समर्थ ह्मणाले, मला एक उपाय माहीत आहे, परंतु तें औषध मिळणें कठिण आहे. शिवराय समर्थांच्या चरणाजवळ बसले होते, ते ह्मणाले महाराज असें कां ह्मणतां, औषध कोणतें तें सांगा, ह्मणजे मी तें कितीही दूरचें असलें तरी आतां आणवितों. समर्थ ह्मणाले, राजा मला जर वाघिणीचें दूध प्यायाला दिलेंस, तर माझें पोट आत्तां राहील. शिवराय ह्मणाले एवढेंचना, मी महाराजांना वाघिणीचें दूध आणून देतों ! शस्त्रांनीं ज्या वाघिणीची शिकार करायची तिचें दूध जिवंतपणीं काढून आणायचें, गोष्ट सोपी नव्हे ! पण छत्रपतींची सद्गुरुचरणीं अशी निष्ठा कीं, महाराजांना औषध आणण्यांत मेलों तरी हरकत नाहीं, पण त्यांची सेवा करायची. शूर पुरुष तो. लागलींच घोड्यावर स्वा-

र होऊन वाघिणीचें दूध आणण्याकरितां अरण्यांत गेला. त्यानें तेथें एक वाघीण गांठली, तिला जिवंत धरून तिचे हातपाय बांधून तो सद्गुरुभक्त तिचें दूध काढून तें घेऊन त्वरेनें समर्थांना देण्याकरितां आला. अशा एकनिष्ठ भक्तानें शंकराला स्वशिरकमल वहाण्याकरितां तयार व्हावें, यांत अतिशयोक्ति असेल असें हल्लींच्या नास्तिकांवांचून कोणालाही वाटणार नाहीं. पण या संबंधांत त्यांना आंधळे ह्मणून स्वस्थ बसावें हेंच बरें. पण असे अंधळे अलीकडे फार होत चालले हें मात्र वाईट आहे ! असो.

छत्रपतींनीं हें त्यांच्या आवडीचें ईशसेवेचें कार्य करून प्रत्यक्ष दर्शन घेतल्यावर ते आपल्या सैन्यास जाऊन मिळाले. पुढें मद्रासेस जाऊन ते जिंजीकडे आपलें सैन्य घेऊन गेले. जिंजीचा किल्ला चांगल्या माऱ्याचा व मजबूत होता. तो यावेळीं विजापूरकरांकडे होता. छत्रपतींनीं हा किल्ला घेतला. हा किल्ला लवकर हातीं येण्यास रघुनाथ नारायण याचा फार उपयोग झाला. याच सुमारास शहाजींचा संताजी नांवाचा एक दासीपुत्र होता तो छत्रपतींना येऊन मिळाला. छत्रपतींनीं त्याचा आदर करून त्याला आपल्या जवळ ठेवून घेतलें. आपल्या सरकारचा जिंजी किल्ला घेतला, असें पाहून विजापूरकरांच्या पदरचा शेरखान सरदार आपलें पांच हजार सैन्य घेऊन लढण्याकरितां आला. या वेळीं छत्रपतींचें सारें सैन्य त्यांच्या बरोबर नाहीं असें पाहूनच हा मुसलमान सरदार त्यांच्याबरोबर लढाईकरितां आला होता. परंतु छत्रपतींच्या बरोबर असले-

त्या सैन्यानें त्या सरदाराचा अगदीं मोड करून त्याला कैद केलें व त्याच्या सैन्यांतील सर्व घोडे व शस्त्रें घेतलीं.

छत्रपतींनीं जें सैन्य मागें ठेविलें होतें, त्यांनीं वेलोरच्या किल्ल्याला वेढा घालून तो मोठ्या शौर्यानें हस्तगत केला. छत्रपती त्रिवेदीस राहिले होते. तेथून त्यांनीं आपला भाऊ वेंकोजी यांस भेटण्याकरितां बोलाविलें. त्याला रघुनाथ नारायण हा छत्रपतींच्या बरोबर आहे, आणि त्यांनीं आपल्याला जें भेटावयाला बोलाविलें आहे यांतला त्यांचा हेतु वडलांच्या जहागिरींतला निम्मा हिस्सा मागण्याचा आहे हें समजलें होतें. वडलांच्या जहागिरीपैकीं निम्मा हिस्सा छत्रपतींना द्यायचा नाहीं, असा त्याचा विचार होता. त्यानें छत्रपतींच्या बरोबर लढण्याकरितां जवळच्या पाळेगारांस वगैरे तयार केलें होते. पण रघुनाथ नारायण तिकडचा माहितगार असल्यामुळें, त्यानें त्याला साहाय्य करणारांच्या गांठी घेऊन त्यांना छत्रपतींचें सामर्थ्य मोठें आहे, वेंकोजीला तुम्हीं साहाय्य केलेंत तर त्यांत तुमचें नुकसान झाल्यावांचून रहाणार नाहीं, वगैरे गोष्टी सांगितल्या. छत्रपती महाराष्ट्रांतून आपल्या बरोबर सत्तर हजार सैन्य घेऊन आले आहेत, हें वेंकोजीला साह्य करायला तयार झालेल्याना कळलें असल्यामुळें, त्यांचीं मनेंही त्यांना, वेंकोजीला आपण साह्य करून स्वतःवर संकट ओढून घेऊं नये, असें सांगूं लागलीं होतीं. छत्रपतींनीं जें वेंकोजीला बोलावणें पाठविलें, त्याला तो आज येऊं उद्यां येऊं, अशा चाळवण्या दाखवीत हो-

ता. छत्रपतींनीं त्याला जें पत्र लिहिलें होतें, त्यांत आपल्याला कोणत्याही प्रकारें परत जायला हरकत केली जाणार नाहीं असें वचन दिलें होतें. शेवटीं तें लक्षांत आणून वेंकोजी तंजेराहून छत्रपतींना भेटायला आला. छत्रपती त्याला मोठ्या प्रेमानें भेटले व त्यांनीं एखाद्या राजासारखा त्याचा आदरसत्कार केला. येथपर्यंत वेंकोजीला बरें वाटलें. पण छत्रपतींनीं जेव्हां वडलांच्या जहागिरीविषयीं गोष्ट काढिली, तेव्हां त्यानें तोंड फिरविलें. छत्रपती त्याला ह्मणाले, महाराष्ट्रांत मीं स्वपराक्रमावर मोठें राज्य मिळविलें आहे. मला तुझ्या जहागिरीची अपेक्षा आहे अशांतला भाग नाहीं. परंतु वडलार्जित वस्तु आपल्याजवळ असावी असें मनुष्यमात्राला वाटतें, त्याप्रमाणें वडलांच्या जहागिरींतला निम्मा हिस्सा आपल्याला मिळावा असें मला वाटतें. तो तूं आनंदानें द्यावास आणि तुझ्या माझ्यांत सलोखा असावा हें दोघांनाही भूषण आहे. या जहागिरीकरितां मी येथें रहाणार आहें असें फारच आहे ? मी तरी सर्व जहागिरीची व्यवस्था तुजकडेच ठेवीन; पण जहागिरीचा निम्मा वसूल मला मिळाला पाहिजे. तो मिळाल्यानें मी श्रीमंत होईन व नाहीं मिळाला तर गरीब होईन असें कांहीं नाहीं. पण तो मिळावा यांत एक प्रकारचा आनंद आहे. छत्रपतींनीं आपल्या भाषणांत वेंकोजीला धाकदपटशा दाखविण्याचा मुळींच प्रयत्न केला नाहीं. ते आपला हिस्सा अगदीं गरिबीनें मागत होते. पण वेंकोजी कांहीं केल्या जहागिरीचा हिस्सा देण्याचें कबूल करीना. तेव्हां मात्र छत्रपतींना

वेंकोजीचा फार राग आला. त्यांच्या मनांत असें आलें कीं, याला येथल्या येथें कैद करून जहागिरीचा निम्मा हिस्सा व दौलतींतला निम्मा हिस्सा घेऊन, मग याला सोडून द्यावें. परंतु त्यांनीं मागून विचार केला कीं, असें आपण केलें, तर वेंकोजीच्या हातून आपलें कांहीं वांकडें होईल अशांतला भाग नाहीं; पण आपण याला जें पत्र लिहिलें आहे त्याला बाध येईल व तसें होणें आपल्या पक्षीं बरें नाहीं. शेवटीं वेंकोजीला छत्रपतींनीं परत तंजोरास जायला परवानगी दिली.

वेंकोजी तंजोरास गेल्यावर छत्रपतींनीं फिरून त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न, पत्रें पाठवून केला. पण त्या प्रयत्नाचाही कांहीं उपयोग झाला नाहीं, तेव्हां छत्रपतींना कोल्हार, बंगलोर, औसकोटा, बाळापूर व सेरा हें शहाजींच्या जहागिरीचे प्रांत घेण्यास आपल्या सैन्याचा उपयोग करावा लागला. हे प्रांत त्यांच्या हातांस तेव्हांच लागले. छत्रपती इकडे याप्रमाणें आपल्या जहागिरीचा कबजा घेत असतांना त्यांचें सैन्य विजापूरकरांच्या मुलखांत शिरून चौथाई व सरदेशमुखीचा वसूल करीत होतें. ज्या प्रांतांत हे हक्क देण्याविषयीं हरकत घेतली गेली, ते प्रांत छत्रपतींच्या सैन्यानें लुटले. इकडे असा प्रकार चालला असतांना, छत्रपतींचे स्नेही गोंवळकोंडेकर यांजवर संकट उद्भवलें.

खानजहानानें छत्रपतींपासून तह करून खंडणी घेतली, ही गोष्ट अवरंगजेबाला मानवली नाहीं. त्यानें खान जहान यास परत बोलावून दिलेरखानास दक्षिणेंत लढाई चालविण्याविषयीं लिहिलें. याच्या अगोदर

विजापूरकरांचा व अवरंगजेबाचा तह झाला होता. तेव्हां दिलेरखानानें विजापूरकरांचें साह्य मिळालें तेवढें घेऊन गोंवळकोंडेकरांवर स्वारी करण्याची तयारी केली. गोंवळकोंडेकरांचा दिवाण महादुण्णापंत याला ही बातमी समजतांच त्यानें हें वर्तमान छत्रपतींना लिहून पाठविलें, आणि दिलेरखानाबरोबर लढाई देण्याची तयारी केली. दोघांची लढाई झाली, त्यांत महादुण्णापंतानें दिलेरखान व विजापूरकरांचें सैन्य यांचा मोड केला. त्यांत विजापूरकरांच्या सैन्याची फारच दुर्दशा झाली.

छत्रपतींना हें इकडचें वर्तमान समजतांच त्यांनीं संताजी, रघुनाथ नारायण, व हंबीरराव यांस कर्नाटकांतली व्यवस्था लावण्याकरितां ठेवून ते आपण स्वतः-बरोबर सैन्य घेऊन महाराष्ट्रांत येण्यास निघाले. ते बेलारीजवळ आले असतां, त्या किल्ल्याची मालकीण एक विधवा देसाईण होती, तिच्या लोकांनीं त्यांच्या सैन्याच्या एका टोळीवर हल्ला करून कांहीं लोक मारले. तेव्हां या महावीरास एका विधवा देसाइणीनें छत्रपतींचे लोक मारले, अशी आपली अपकीर्ति होईल याबद्दल वाईट वाटून लढाईस उभें रहावें लागलें. छत्रपतींनीं लागलींच बेलारीच्या किल्ल्यास वेढा घालविला. छत्रपतींनीं बेलारीचा किल्ला घेऊन त्याच्या मागून कोप्पलचा किल्ला व भोंवतालचा प्रदेश हस्तगत करून घेतला. यांत तेथील देसाईण छत्रपतींच्या हातीं आली. परंतु पाडाव झालेल्या स्त्रियांवर छत्रपती कधींच वांकडी नजर ठेवीत नसत. आजपर्यंत त्यांच्या हातीं पुष्कळ वेळां अशा स्त्रिया आल्या होत्या. अफजुलखा-

नाच्या वधानंतर त्याच्या सैन्याची छत्रपतींच्या सैन्यानें दुर्दशा उडविली, तेव्हां अफजुलखानाच्या गोषांतल्या सुंदर स्त्रिया पाडाव झाल्या होत्या, पण त्यांना छत्रपतींनीं वस्त्रें भूषणें देऊन विजापुरास पाठवून दिलें. कल्याणच्या सुभेदाराच्या खुपसुरत कन्येचा छत्रपतींनीं अंगिकार करावा, अशी त्यांच्या सरदारांनीं विनंति केली होती,परंतु तिला आई ह्मणून वस्त्रें भूषणें देऊन त्यांनीं पाठवून दिलें. त्याचप्रमाणें या देसाइणीचाही त्यांनीं योग्य सन्मान राखला. छत्रपतींच्या या गुणाबद्दल त्यांची तारीफ करावी तितकी थोडी आहे हें कोणीही कबूल करील. असो. छत्रपतींनीं बेलारीच्या भोंवतालच्या मिळविलेल्या प्रांताच्या बंदोबस्ताकरितां सुमंत जनार्दनपंत हणवंते यांस ठेवून ते पुढें निघाले.

त्यांचा मुक्काम तोरगल येथें असतांना, रघुनाथ नारायण याजकडून त्यांना पत्र आलें. त्यांत मजकूर लिहिला होता कीं, वेंकोजीनें कित्येक मुसलमान सरदारांचें साहाय्य घेऊन आमच्यावर हल्ला केला, परंतु शेवटीं त्याच्या पक्षाचा नाश होऊन त्याला पळून जावें लागलें. छत्रपतींना हा मजकूर ऐकून फार वाईट वाटलें. त्यांनीं वेंकोजीला एक पत्र लिहिलें. त्या पत्रांत छत्रपतींनीं वेंकोजीला जो बुद्धिवाद सांगितला आहे, तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे. त्यांनीं लिहिलें आहे कीं, तुजबरोबरच्या लढाईंत जे मुसलमान मेले त्यांच्याबद्दल मला वाईट वाटत नाहीं. पण तुझ्या पदरचे जे लोक मेले त्यांच्याबद्दल मला फार वाईट वाटतें. कारण त्यांना मी ते माझे आहेत असेंच समजत होतों. तूं जर न्यायानें

मला मिळणारा माझा हिस्सा देतास, तर सध्यां मेले असे आपले लोक का मेले असते? या तुझ्या अविचारानें आपल्या जिवाला जीव देणारे लोक निष्कारण मेले, असें झालें नाहीं काय? चांगल्या प्रसंगाला ते किती तरी उपयोगीं पडले असते? पण आपसांत अविचारानें वाद माजविल्यामुळें, ते आज मातीस मिळाले! ते आतां उपयोगीं पडतील अशी आशा उरली नाहीं. आपसांतल्या वादाचा परिणाम किती वाईट होतो हें लक्षांत आणून आतां तरी समजूत घे. अशा प्रकारचा प्रत्येकानें ध्यानांत ठेवण्यासारखा उपदेश करून छत्रपतींनीं तुझ्या हिश्शाच्या मोबदला महाराष्ट्रांतला हवा तर मुलूख घे वगैरे मजकूर लिहून पत्र संपविलें आहे. छत्रपतींच्या या पत्रानें वेंकोजीच्या अंतःकरणावर पुष्कळ प्रकाश पडला. खेरीज छत्रपतींच्या बरोबर आपला निभाव लागणार नाहीं, हें नुकत्याच झालेल्या पराजयानें त्याला कळून आलें होतें. यामुळें त्यानें रघुनाथ नारायण याच्या वतीनें जहागिरीची व दौलतीची वांटणी करून देण्याचें कबूल केलें.

छत्रपती तोरगलजवळ असतांना विजापूरकरांच्या पदरचे घाडगे व निंबाळकर या सरदारांनीं पन्हाळा प्रांतावर स्वारी करून मुलूख लुटला. छत्रपतींना हें समजतांच त्यांनीं निळोजी काटकर या नांवाच्या सरदाराबरोबर सैन्य देऊन त्याला त्यांच्यावर पाठविलें. त्यानें कुर्ल्याजवळ त्या दोन्ही सरदारांना गांठून, त्यांची पांचावर धारण बसविली. त्यांनीं जी लूट मिळविली होती ती त्यांना पचली नाहींच, पण त्यांच्या घोडे-

स्वारांचे घोडे, अंगावरचीं वस्त्रें व शस्त्रें हीं देखील त्यांना काटकराच्या शिपायांना द्यावीं लागलीं ! घाडगे व निंबाळकर यांनीं आपल्या प्रजेला लुटलें, याबद्दल छत्रपतींनीं त्यांचें चांगलें पारिपत्य केलें. परंतु त्यांनीं त्यांच्यापासून जी लूट परत घेतली तिचा अभिलाष धरला नाहीं. घाडगे व निंबाळकर यांनीं ही लूट आपल्या प्रजेपासून मिळविली होती, हें लक्षांत आणून छत्रपतींनीं ती लागलीच ज्यांची त्यांस परत देवविली. घाडगे व निंबाळकर यांचें शासन केलें, त्यांस स्वारी खर्च लागला तेवढा घेऊन मग लूट ज्यांची त्यांस द्यावी, असें देखील त्यांनीं मनांत आणिलें नाहीं. या गोष्टीवरून छत्रपतींची प्रजा त्यांच्यावर किती प्रेम करीत असेल, याची कल्पना वाचकांस करतां येईल.

छत्रपती तोरगलकडून पुढें येत असतां जनार्दनपंतावर विजापूरकरांच्या कांहीं सरदारांनीं हल्ला केल्याचें वर्तमान त्यांना समजलें. तेव्हां त्यांनीं जनार्दनपंताच्या मदतीला कांहीं सैन्य पाठवून देऊन ते अगदीं थोड्या सैन्यानिशीं अठरा महिन्यांनीं रायगडास परत आले. वेंकोजीचा तंटा संपल्यावर हंबीरराव आपल्या बरोबरचें सैन्य घेऊन महाराष्ट्रांत येण्यास निघाला. जनार्दनपंत हंबीररावाची वाट पहात होता, तों तो येऊन जनार्दनपंताला मिळाल्यावर, दोघांनीं मिळून विजापूरकरांच्या सरदारांबरोबर लढाई करून त्यांना पळायला लावलें. या लढाईंत त्यांना पुष्कळ घोडे व पांच हत्ती मिळाले. तुंगभद्रा व कृष्णा या दोन नद्यांमधील विजापरकरांचा सर्व मुलूख छत्रपतींच्या राज्यांत सामील झा-

ला. बेलारी व कोप्पल यांच्या जवळचे देशमुख विजापूरकरांना वसूल देत नव्हते ते छत्रपतींना देण्यास कबूल झाले. तात्पर्य, छत्रपतींनीं जी कर्नाटकावर मोठी स्वारी केली त्या स्वारींत त्यांस शंकरांनीं प्रसन्न होऊन सांगितल्याप्रमाणें, चांगलें यश आलें. इकडे मुख्य प्रधान मोरोपंत पिंगळे यांनीं राज्याची व्यवस्था शिस्तवार राखली होती. त्यांनीं विजापूरकरांच्या सैन्यांतले बरेच लोक आपल्या चाकरीला ठेवलें, व त्यांच्या, अवरंगजेबाची वरचेवर मदत होत असलेल्या जंजिऱ्याच्या शिद्धीबरोबर, लढाया चालल्याच होत्या. त्या लढायांत त्यांनीं अपयश घेतलें नाहीं व सुईच्या अग्राइतकी देखील आपल्या राज्यांतली जमीन शिद्धीच्या हातीं लागूं दिली नाहीं.

## विजापूरकरांनीं छत्रपतींना साहाय्याला बोलाविलें.

या वेळीं विजापूरकरांची स्थिति फार वाईट झाली होती. अवरंगजेबाच्या कपटप्रयोगांनीं व दिलेरखानाच्या शौर्यानें विजापूरचें राज्य बहुतेक मोडकळीस आलें होतें. राज्याचा कारभार मसाऊदखान हा पहात होता. विजापुराला दिलेरखानानें वेढा घातला होता. आतां कोणाची मदत घेतल्यावांचून राज्याचें रक्षण होत नाहीं असें पाहून मसाऊदखानानें छत्रपतींचें साहाय्य मागितलें. छत्रपतींनीं विजापूरकरांना साह्य देण्याचें कबूल करून पन्हाळ्यावर आपलें सैन्य जमविलें आणि ते विजापुराकडे चालले. विजापुराजवळ गेल्यावर त्यांना

समजून आलें कीं, दिलेरखानाचें सैन्य पुष्कळ आहे तेव्हां त्याच्याबरोबर लढाई करून आपला निभाव लागणार नाहीं. तेव्हां त्यांनीं मनांत आणिलें कीं, आपण अवरंगजेबाच्या मुलखांत शिरून तो उध्वस्त करायला सुरवात करावी, ह्मणजे दिलेरखानाला विजापूरचा वेढा उठवून आपल्या मुलखाच्या रक्षणाला येणें भाग पडेल. असा विचार करून छत्रपती लागलेच उत्तरेकडे वळून भीमा उतरून अवरंगजेबाच्या मुलखांत शिरले व त्यांनीं गांव व खेडीं लुटून जाळून अवरंगजेबाच्या प्रजेला घरें-दारें नाहींशीं करण्यास सुरवात केली. खानजहानाच्या जागीं अवरंगजेब यानें मोअझिम यास दक्षिणचा सुभेदार करून पाठविलें होतें. त्याजकडे व दिलेरखान याजकडे छत्रपती आपल्या मुलखाची दाणादाण करून सोडताहेत हें वर्तमान गेलें. पण दिलेरखान यास अवरंगजेबाचीं विजापूरचें राज्य बुडविण्याविषयीं वरचेवर पत्रें येत होतीं, त्यामुळें त्यास वेढा उठवून आपल्या मुलखाच्या रक्षणाकरितां येतां येईना. मोअझीम छत्रपतींचा प्रतिकार करण्याकरितां सैन्याची जमवाजमव करीत होता. इतक्यांत छत्रपती भीमा व गोदा या दोन नद्यांमधील मुलूख लुटून, गोदा उतरून जालना शहरावर स्वारी करून लूट घेऊन, मोअझिम राहिला होता त्या औरंगाबादेवर पडले. मोअझिमाजवळ कांहीं सैन्य होतें, त्यानें छत्रपतींचा प्रतिकार न करितां आपल्या जीवाचें रक्षण व्हावें ह्मणून शहर मोकळें सोडलें. छत्रपती अवरंगाबादेंत तीन दिवस राहिले व त्यांनीं तें शहर मनसोक्त लुटलें. आजपर्यंत कोणत्याही लुटींत छत्रपती मु-

सलमानांच्या मशिदी, पीर व फकीर यांना हात लावीत नसत. परंतु कशा रीतीनें तरी विजापुरचा वेढा उठवून दिलेरखानानें आपल्या मुलखाच्या रक्षणाला यावें, ह्मणून छत्रपतींनीं औरंगाबादेंतील मशिदी लुटल्या व त्यांतील फकिरांस नागविलें. तेव्हां त्यांनीं छत्रपतींना शिव्या श्राप द्यावेत हें स्वाभाविक आहे. यापुढें छत्रपती एका वर्षानें मृत्यु पावले ते या फकिरांच्या शिव्याश्रापांनींच होत, असा त्या काळच्या पुष्कळ लोकांचा समज होता.

या स्वारींत छत्रपतींनीं औरंगाबादेपर्यंत एकसारखा अवरंगजेबाचा मुलूख लुटल्यामुळें त्यांच्याजवळ लूट पुष्कळ जमली. ती रायगडावर पोंचविण्याची व्यवस्था करणें जरूर होतें, यामुळें ते आपलें सैन्य घेऊन परत फिरले. छत्रपतींच्या बरोबर लढाई देण्याकरितां मोआझिम सैन्याची जमवाजमव करीत होता, तें त्यानें दहाबारा हजार सैन्य जमविलें आणि रणमस्तखान यास त्याजवर मुख्य नेमून छत्रपतींवर पाठवून दिलें. या सैन्यानें छत्रपतींना संगमनेर येथें गांठलें. छत्रपतींनीं औरंगाबादेस जी मशीदींची लूट केली होती व फकिरांना छळलें होतें, त्यानें रणमस्तखान व त्याच्या बरोबरच्या सैन्यांतील त्याच्या हाताखालचे मुसलमानसरदार अगदीं चवताळून गेले होते. त्यांनीं अति त्वेषानें छत्रपतींवर हल्ला केला. परंतु छत्रपती इतके सुद्धां गडबडले नाहींत. त्यांनीं आपलें सैन्य उभें करून लढाईला सुरवात केली. रणमस्तखानानें सूड उगविण्याच्या ईर्षेनें ही लढाई मोठ्या नि-

करानें चालविली. पण छत्रपतींच्या युद्धचातुर्यापुढें खानाच्या निकराची प्रौढी कितपत टिकणार ? खानानें आपल्या लोकांना उत्तेजन देऊन छत्रपतींच्या सैन्यावर वर्षाकालांतील मेघांप्रमाणें चढाव करून यावें, पण छत्रपतीरूप प्रभंजनानें आपल्या भुजबलानें तेव्हांच त्यांना पळवून लावावें, अशा प्रकारें ही लढाई चालली होती. इतक्यांत छत्रपतींचें प्रेम ज्याच्यावर कर्तबगारीमुळें उत्तरोत्तर वाढत होतें, तो संताजी घोरपडे आपले निवडक हजार लोक घेऊन रणमस्तखानाच्या सैन्याच्या एका भागावर पडला आणि त्यानें एकदम कत्तलीला सुरवात केली. त्यानें योग्य वेळीं कत्तलीला केलेला आरंभ पाहून छत्रपतींनीं त्याला शाबासकी दिली व आपल्या सर्व सैनिकांना रणमस्तखानाच्या सैन्यावर निकर करण्याविषयीं उत्तेजन दिलें. संताजी खानाच्या ज्या सैन्याच्या टोळीवर पडला, तेवढी सारी टोळी त्यानें कापून काढली. हें त्याचें उग्र रणकर्म पाहूनच, खानाच्या सैन्याच्या हातांतलीं शस्त्रें गळूं लागलीं होतीं. त्यांत छत्रपतींनीं आपल्या सर्व सैनिकांकडून निकर करविल्यामुळें खानाच्या सैन्याची दाणादाण उडून गेली. ज्यांना जिकडून वाट सांपडली तिकडून ते पळून गेले.

रणमस्तखानाच्या सैन्याचा पराभव केल्यावर छत्रपतींनीं आपलें सैन्य पट्टयाकडे चालविलें. पण रणमस्तखानाला मिरझा राजा जयसिंग याच्या नातवांपैकीं एक किसनसिंग हा आपल्या करोल सैन्यासह येऊन मिळाला. या दोन्ही मिळालेल्या सैन्याबरोबर लढाई

देण्यास छत्रपतींच्या बरोबरचें सैन्य असमर्थ होतें. त्यामुळें छत्रपतींना शत्रूच्या सैन्यानें आपल्याला गांठलें तर काय परिणाम होईल, याची मोठी काळजी पडली. इतक्यांत छत्रपतींच्या सैन्याच्या एका टोळीवर वरील सैन्यांनीं हल्ला करून तिचा पुष्कळ नाश केला ! तेव्हां शत्रूचीं सैन्यें अगदीं जवळ आलीं, यानें छत्रपतींची कंबर खचल्यासारखी झाली. या येऊं घातलेल्या संकटांतून कसें निभावून निघावें, हें त्यांना कांहीं सुचेना. परंतु छत्रपतींच्या पदरीं हुषार जासूद असत. ते शत्रूचें सैन्य कोठें आहे, कोणच्या वाटेनें येत आहे. याच्या बातम्या आणीत व वाटाड्याचेंही काम करीत. अशा एका जासुदानें छत्रपतींना अशी एक वाट सांगितली कीं, ती शत्रूच्या लोकांना मुळींच माहीत नव्हती. त्या वाटेनें सैन्य घेऊन छत्रपती पट्टयास आले. मागें रणमस्तखान छत्रपतींचें सैन्य पहातां पहातां कोठें गेलें या विस्मयानें खिन्न झाला व बोटें मोडीत परत अवरंगाबादेस गेला.

छत्रपतींनीं पट्टा येथें आपल्या सैन्याचा तळ दिला. पट्टयाच्या भोंवतीं लढाऊ किल्ले पुष्कळ होते, ते घ्यावेत असें छत्रपतींच्या मनानें घेतलें. त्यांनीं लागलींच एकेक किल्ला सर करण्याचा उद्योग चालविला व न जाणो रणमस्तखान व किसनसिंग आपल्यावर तयारी करून चालून येतील, ह्मणून त्यांनीं मोरोपंत पिंगळे यांस आपल्या मदतीला आणखी सैन्य घेऊन येण्याबद्दल लिहिलें. छत्रपतींनीं आपला तळ पट्टयास दिला व त्यांनीं आपल्या मदतीला आणखी सैन्य आ-

णविलें, हें वर्तमान जेव्हां औरंगाबादेस मोअझिम यास कळलें, तेव्हां छत्रपतींच्या बरोबर लढाई देण्याची त्याची हुरूप जागच्या जागीं मुरली. रणमस्तखान सूड उगविण्याची गोष्ट बोलेनासा झाला. किसनसिंग बोलून चालून या प्रांताचा गैरमाहीत व छत्रपतींचे पराक्रम ऐकून दबून गेलेला, तेव्हां लढाईबद्दल तो कशाला आग्रह धरतो ? सारांश, छत्रपतींनीं पट्टयाभोंवतालचे किल्ले घेण्याचा उद्योग निर्भयपणें चालविला. छत्रपतींच्या सैन्यानें भोंवतालचे बरेच किल्ले हस्तगत केले.

तिकडे विजापुराला दिलेरखानानें वेढा घातला होता, व मसाऊदखान मोठ्या कसोशीनें आपल्या राजधानीचें रक्षण करीत होता. परंतु दिवसेंदिवस त्याला निराश व्हावें लागत होतें. कारण विजापूरची स्थिति आधींच वाईट झालेली, त्यांत दिलेरखानासारखा शत्रु राजधानीच्या भिंतीपाशीं येऊन धडकलेला. वास्तविक पाहतां मसाऊदखानानें इतके दिवस दम धरला हेंच अधीक होतें. त्यानें छत्रपतींना पत्र लिहून कळविलें कीं, आपण स्वतः बरोबर सैन्य घेऊन इकडे येऊन दिलेरखानाबरोबर रण माजविल्यावांचून आमच्या राजधानीचें रक्षण होईल असें कांहीं वाटत नाहीं. या करितां पत्रदेखत मोठ्या तयारीनें आपण इकडे येण्यास निघावें. छत्रपतींनीं मनांत आणल्याप्रमाणें पट्टयाच्या भोंवतालचे बरेच किल्ले त्यांच्या सैन्यानें हस्तगत केले. त्यांची व्यवस्था करून, मसाऊदखानाच्या पत्राप्रमाणें ते आपल्या बरोबरचें सैन्य घेऊन विजापुराकडे निघाले. पण दोन चार मुक्काम गेले असतां

त्यांना, त्यांच्या हृदयाचें पाणी पाणी करणारी एक दुष्ट वार्ता समजली. त्या दुष्ट वार्तेनें दिलेरखानाबरोबर लढाया करून विजापूरकरांचें रक्षण करण्याचा त्यांचा हुरूप समूळ नाहींसा झाला. विजापुराकडे जाण्यास त्यांचें मन घेईना. ते अति उद्विग्न झाले व त्यांनीं विजापुराकडे जाण्याचा बेत रहित करून पन्हाळ्याचा रस्ता धरला. तरी त्यांनीं विजापूरकरांना मदत करण्याचें अभिवचन दिलें असल्यामुळें, हंबीरराव याजबरोबर सैन्य देऊन त्याला विजापुराकडे पाठविलें. छत्रपती पन्हाळ्याकडे गेले ही बातमी मोअज्जिम यास कळतांच त्यानें हंबीररावावर रणमस्तखान यास सैन्य देऊन पाठविलें. त्यानें हंबीररावाला वाटेंत गांठून त्यावर हल्ला केला. परंतु हंबीरराव कांहीं लेचापेचा नव्हता. त्यानें रणमस्तखानाबरोबर लढाईला उभें राहून तींत आपलें शौर्य इतकें गाजविलें कीं, रणमस्तखानाच्या सैन्याची पूर्ववत् स्थिति होऊन तें जीव घेऊन रानोमाळ पळत सुटलें. आणि या लढाईत हंबीररावानें पूर्वीच्या लढाईप्रमाणेंच कत्तल करून रणमस्तखानाच्या सैन्यांतल्या हजारों लोकांना रणभूमीवर अक्षयींचें निजविलें.

मोरोपंत पिंगळे यांस छत्रपतींनीं आहुंत आणि नवागड हे किल्ले घेण्यास सांगितलें होतें. त्याप्रमाणें मोठा पराक्रम करून त्यांनीं ते दोन्हीं किल्ले हस्तगत केले. नंतर तें आपलें सैन्य घेऊन खानदेशांत शिरले. त्यांनीं अवरंगजेबाचा खानदेशांतील मुलूख लुटून पुष्कळ संपत्ति जमविली. सारांश दिलेरखानानें जरी विजा-

पूरची चिकाटी सोडली नाहीं, तरी छत्रपतींनीं विजापूरकरांना साह्य देण्याचें कबूल केल्याप्रमाणें त्यांनीं त्यांच्या वतीनें अवरंगजेबाच्या तोंडाला काळोखी लागण्यासारखें त्याचें नुकसान केलें, यांत कांहीं एक शंका नाहीं. ज्या बादशहानें दुसरी एक बादशाही बुडविण्याकरितां तिच्या राजधानीला मोठें सैन्य पाठवून वेढा देऊन बसावें, त्या बादशहाकडून आपल्या प्रजेचें संरक्षण होऊं नये, तिला घरादारांवांचून रहाणें भाग पडावें, तिला खाण्याची भ्रांत व्हावी, सुरक्षितपणा काडीइतका उरूं नये, हें त्यांस लांछन नव्हे काय? दिलेरखानानें विजापूरचा वेढा उठवून आपल्या प्रांतांचें रक्षण करण्याकरितां यावें ह्मणून प्रथम छत्रपतींनीं व मागून मोरोपंत पिंगळे यांनीं वर वर्णिली आहे अशा प्रकारची अवरंगजेबाच्या प्रजेची दशा दशा करून सोडली. छत्रपती अशा प्रकारें एखाद्या राजधानीला वेढा घालून बसते आणि त्यांच्या प्रजेवर जर असा प्रसंग आला असता, तर त्यांनीं तो वेढा उठवून आपल्या प्रजेचें रक्षण करण्याकरितां प्रथम धांव मारली असती यांत बिलकूल शंका नाहीं. छत्रपतींनीं मनांत असा विचार केला असता कीं, आज ही राजधानी हातीं येत असलेली जाईल खरी, पण तिकडे आपल्या प्रजाजनांची काय स्थिति झाली असेल? प्रजाजनांना दुःख होत असतांना, आपण दुसरें एखादें राज्य काबीज केलें तर त्याचें कौतुक कोण करणार? आपल्या प्रजा सुखी असतांना आपण आपलें राज्य वाढविलें तर त्यांना खरा आनंद वाटेल. आपल्या प्रजा ह्मणजे आपल्या कुटुंबां-

तील माणसें असें छत्रपती मानीत असत. प्रजेचें तिकडे कांहीं कां होईना, आपली सत्ता वाढली ह्मणजे झालें, अशा विचाराचे जर छत्रपती असते तर त्यांनीं कर्नाटकांतल्या स्वारीवर जातांना खानजहान यांस पैसे भरून तह केला नसता, आणि त्यांनीं नुक्तीच आपल्या प्रजेची लूट जी परत दिली, तसें करण्याचें त्यांच्या कधींच मनांत आलें नसतें.

अवरंगजेबाच्या अथवा यावेळीं दक्षिणचा सुभेदार असलेल्या मोआझिमाच्या विचारांत व छत्रपतींच्या विचारांत जो हा जमीनअस्मानाचा फरक दिसून येतो, यांतल्या कारणाचा शोध लावणें कांहीं फार बिकट नाहीं. हा फरक स्वराज्य व परराज्य यामुळें पडलेला होय. अति क्रूर स्वभावाचा स्वराज्याचा मालक व दयाळु ह्मणविणारा परराज्याचा मालक या दोघांतून बरा कोणता असा जर एकाद्या विचारी मनुष्याला प्रश्न केला, तर तो अति क्रूर असलेला स्वराज्याचा मालक बरा असें स्वच्छ सांगेल. कारण स्व व पर यांमध्येंच इतकें अंतर आहे. दाई कितीही मायाळू असली तरी तिच्यानें जन्मदात्या आईची बरोबरी करवणार नाहीं, अशी जीं एक ह्मण आहे ती अक्षरशः खरी आहे. परकीय मनुष्य कितीही शांत, दयाळू व शहाणा असो, त्याच्या अंतःकरणांत स्वकीय जनाइतकें निर्मळ प्रेम कधींही उत्पन्न व्हायचें नाहीं. तो जें प्रेम दाखवील त्यांत ढोंगाचा बाजार मोठा असल्यावांचून रहाणार नाहीं. कारण परकीयांच्या मनांत कळवळा उत्पन्न व्हायला जें कांहीं स्वत्व लागतें, त्याचा कायमचा अभाव असा-

यचा. परदेशच्या, परधर्मांच्या राजाच्या मनांत प्रजानांच्या दुःस्थितीबद्दल खरा कळवळा असा कधीं उत्पन्न व्हायचा नाहीं. पण तोच जर स्वदेशाचा व स्वधर्माचा यद्यपि दुष्ट स्वभावाचा राजा असला तर त्याच्या मनांत एखाद वेळ तरी आपल्या प्रजाजनांच्या दुःस्थितीबद्दल कळवळा उत्पन्न होईल व तो प्रजाजनांची दुःस्थिति नाहींशीं केल्यावांचून रहाणार नाहीं. आणि ह्मणूनच स्वराज्याची किंमत फार मोठी मानतात. असें स्वराज्य आपल्या दुर्दैवामुळें आपल्यावर नाहीं, तरी आपल्यावर राज्य करणारे अवंगजेबासारखे नाहींत हें दुःखांत सुख मानिलें पाहिजे. असो.

हंबीररावानें रणमस्तखानाचा पराभव करून त्याला पळवून लावल्यावर त्यानें आपलें सैन्य झपाट्यानें विजापुराकडे पाठविलें. मसाऊदखानानें विजापूरचें रक्षण मोठ्या शौर्यानें चालविलें होतें. हंबीरराव आपल्या मदतीला येत आहे असें त्याला समजल्यावर त्याचा जीव भांड्यांत पडला, व आतां आपण विजापूर दिलेरखानाच्या हातीं लागूं देत नाहीं, असा त्याला विश्वास आला. हंबीरराव विजापुराजवळ जाऊन पोंचतांच त्यानें दिलेरखानाच्या सैन्यावर छापे घालून त्याचा नाश करण्यास सुरवात केली. हंबीररावाचे छापे सुरू झाल्यावर दिलेरखानाच्या सैन्यांतलें लोक रोज पांच पन्नास शंभर दोनशें असे मरूं लागले. तसा मसाऊदखानाच्या विजापूरचें रक्षण करीत असलेल्या सैन्यालाही जोर आला. त्यानेंही दिलेरखानाच्या सैन्याचा नाश चालविला. हंबीरराव येऊन पोंचेपर्यंत दिले-

रखानाला आपण विजापूर हस्तगत करूं असा भरंवसा होता. पण हा विजयशाली छत्रपतींचा सेनापती मसाऊदखानाच्या मदतीला जाऊन पोंचल्यावर त्याचा भरंवसा तुटत चालला. व थोड्याच दिवसांत त्याला असेंही वाटूं लागलें कीं, आतां आपण विजापूरच्या भोंवतालचा वेढा हट्टानें न उठवूं तर याचा शेवट आपला नाश होण्यावांचून दुसरा कांहीं एक होणार नाहीं. अशी जेव्हां दिलेरखानाची पक्की खात्री झाली तेव्हां त्यानें विजापूरचा वेढा उठविला व तो आपलें सैन्य घेऊन वाटेंत लागलेले गांव लुटींत कर्नाटकांत शिरला. कृष्णा उतरून गेल्यावर त्यानें आपल्या सैन्याचें दोन भाग केले व तो विजापूरकरांचा मुलूख लुटूं लागला. छत्रपतींच्या अष्ट प्रधानांपैकीं जनार्दनपंत हणवंते सुमंत हे कर्नाटकांत होते. त्यांनीं दिलेरखानावर आपल्या सहा हजार लोकांनिशीं हल्ला करून त्याच्या सैन्यांतले कैक लोक कापून काढले व त्याच्या लक्षांत रहाण्यासारखा त्याचा पराभव केला. याप्रमाणें छत्रपतींनीं विजापूरकरांच्या साह्याला जाऊन त्यांच्या शत्रूचें पूर्णपणें पारिपत्य केलें. छत्रपतींच्या या उपकाराबद्दल विजापूरकरांनीं त्यांना कर्नाटकांतला बराच मुलूख दिला.

## छत्रपतींचा हृद्रोग.

छत्रपती जात तिकडे त्यांचा उत्कर्ष होत होता, तथापि त्यांच्या हृदयांत एक शल्य होतें. मागील प्रकरणांत हंबीररावाला विजापुराकडे पाठवून छत्रपती उद्विग्न होऊन पन्हाळ्याकडे गेले असें ह्मटलें आहे, तें वाचकांना स्मरत असेल. त्यांचा थोरला पुत्र संभाजी

हें त्यांच्या हृदयांतील शल्य होय. संभाजी छत्रपतींच्याप्रमाणें शूर होता, साहसी होता, पण छत्रपतींच्या अंगचे इतर गुण त्याच्या अंगांत मुळींच नव्हते. उलट छत्रपतींच्या सत्कीर्तीला कालिमा लावण्यासारखे दुर्गुण त्याच्या अंगीं होते. छत्रपतींचें संभाजीवर अत्यंत प्रेम होतें, परंतु त्याचें चीज संभाजीनें केलें नाहीं. बापाचें पुत्रावर प्रेम असतेंच, पण छत्रपतींचें संभाजीवर अत्यंत प्रेम असण्याचें कारण, संभाजीची आई सईबाई ही तो दोन वर्षांचा असतांना वारली होती हें होय. सईबाई ही फार शहाणी बायको होती. ती बिकट प्रसंगीं छत्रपतींना योग्य सल्ला देई व छत्रपती तशा वेळीं तिला तिचा सल्ला विचारीत. सईबाई अकालीं मेल्यानें छत्रपतींना फार दुःख झालें. छत्रपतींना तिचा मुलगा तिच्याप्रमाणें शहाणा होईल अशी त्याच्या लहानपणीं फार आशा होती. संभाजी सुस्वरूप होता. हा शूर निपजेल असें त्याच्या बालक्रीडांवरून सर्वांना वाटूं लागलें होतें. त्याप्रमाणें तो शूर निपजलाही. पण त्याचा उपयोग काय ? ! त्याच्या इतर दुर्गुणांमुळें त्याच्या अंगच्या नैसर्गिक गुणाची माती झाली ! त्याच्या शौर्याचा छत्रपतींनीं अश्रांत श्रम करून स्थापिलेल्या स्वराज्याला काडीइतका देखील उपयोग झाला नाहीं. मात्र त्याच्या दुर्गुणांनीं स्वराज्य विलयाला पोंचतें कीं काय अशी वेळ आणली होती. पण छत्रपतींची पुण्याई मोठी, त्यांनीं चांगलीं चांगलीं माणसें पदरीं बाळगिलीं होतीं, म्हणूनच त्यावेळीं स्वराज्याचा विलय झाला नाहीं.

संभाजी जसजसा मोठा होऊं लागला तसतशी त्याला खराब लोकांची संगत जडत चालली. छत्रपती कर्नाटकांतल्या स्वारीवर गेले, तेव्हां संभाजीला आपल्या तारुण्यांतले गचाळ खेळ खेळण्यास चांगलें फावलें. खराब लोकांचा त्याच्या भोंवतीं गराडा पडला. आपण राजपुत्र, आपल्याला काय कमी आहे, मनास वाटेल ती चैन करावी, रंगेल असावें, हे तारुण्याचे चार दिवस आहेत तोंपर्यंत भोग भोगून घ्यावेत असे संभाजी महाराजांना नित्य उपदेश होऊं लागले. संभाजी महाराजांची मनःप्रवृत्ति तिकडचीच, त्यामुळें त्यांच्या भोंवतीं मिळालेल्या खराब लोकांचा बाजार चांगलाच पिकला. अशा लोकांच्या उठावणीनें संभाजीची कामांधता अमर्याद झाली. ज्या ब्राह्मणांना छत्रपती देवासारखा मान देत, त्या ब्राह्मण जातींतील एका सुस्वरूप तरुणीच्या पातिव्रत्यावर घाला घालण्याचे प्रयत्न संभाजीनें केले ! संभाजीच्या अशा कृत्याबद्दल न्यायनीतिनिपुण व धर्मनिष्ठ छत्रपतींना त्याचा मनस्वी राग यावा व त्यांनीं त्याला कैदेंत टाकावें, हें स्वाभाविक आहे. छत्रपतींनीं संभाजीला कैदेंत टाकल्यावर ते विजापूरकरांना मदत करण्याकरितां गेले असतां, त्यानें पहाऱ्यावरच्या लोकांना फितवून कैदेंतून पळ काढला. तो कैदेंतून निघून दिलेरखानाला जाऊन मिळाला. हाडवैऱ्याचा मुलगा आपल्या पायांनीं चालत आपल्या गोटांत आला यानें दिलेरखानाला भारी आनंद झाला. पण याच गोष्टीनें छत्रपतींना मेल्यापेक्षां मेल्यासारखें झालें. संभाजी फितूर करून कैदेंतून निघून दुसऱ्या

कोणाला जाऊन मिळाला असता तर त्याचें छत्रपतींना इतकें वाईट वाटलें नसतें. पण ज्याच्याशीं आपण झुंजायला चाललों आहोंत, त्याकडेच संभाजी गेल्यामुळें छत्रपतींच्या मनानें मुरड घेतली, व त्यांनीं हंबीरवाला विजापुराकडे पाठवून ते स्वतः संभाजीला परत आणविण्याची खटपट करण्याकरितां पन्हाळ्याकडे गेले.

संभाजी दिलेरखानाकडे गेल्यावर त्यानें त्याला सन्मानानें वागविलें. त्यानें संभाजी आपल्याला येऊन मिळाल्याचें वर्तमान अवरंगजेबास कळविलें, व त्यांतच लिहिलें कीं, मराठ्यांची सत्ता प्रबल होते आहे तिचा मोड करण्यास आपल्याला संभाजीचा उपयोग चांगला करून घेतां येईल. दिलेरखानाला आशा होती कीं, आपल्याला अवरंगजेबाकडून या पत्राचें उत्तर लवकर येईल. परंतु अवरंगजेब हा आपल्या पदरच्या सरदारांच्या बुद्धीनेंच केवळ चालणारा नसल्यामुळें, मध्यंतरीं बरेच दिवस गेले तरी या संबंधाचें अवरंगजेबाकडून दिलेरखानाला कांहींच उत्तर आलें नाहीं. दिलेरखानाचा बेत असा होता कीं, ज्याप्रमाणें छत्रपतींनीं मोअझिमाला अवरंगजेबाबरोबर लढण्याकरितां पाठविलें होतें, त्याप्रमाणें संभाजीबरोबर सैन्य देऊन त्याला छत्रपतींबरोबर लढण्याकरितां पाठवायचें. छत्रपती पन्हाळ्यास गेले ते तिकडे न जातां जर विजापुराकडे सैन्याबरोबर गेले असते, तर दिलेरखानानें आपलें मनोगत सिद्धीस नेण्याकरितां हरप्रयत्न केले असते. तरी त्यानें अवरंगजेबाच्या उत्तराची कांहीं दिवस वाट पाहून, आपल्या मनोगताप्रमाणें कांहीं सैन्य सं

भाजीबरोबर देऊन त्याला, छत्रपतींच्या राज्याच्या पूर्व सीमेवर असलेला त्यांच्या ताब्यांतला किल्ला भोपाळगड हस्तगत करून घेण्यास पाठविलें. संभाजी शूर असल्यामुळें त्यानें तो किल्ला शौर्यानें लढून हस्तगत करून घेतला. याप्रमाणेंच संभाजीकडून छत्रपतींचे कांहीं किल्ले व मुलूख घेवविण्याचा आणि मागून त्याजकडून निम्या राज्याची मागणी करविण्याचा दिलेरखानाचा बेत होता. पण हंबीररावाच्या हल्ल्यांनीं त्याला विजापूरचा वेढा उठवून कर्नाटकाची वाट धरावी लागल्यामुळें, त्याचा बेत मनच्यामनीं राहिला. पुढें छत्रपतींनीं आपले वकील दिलेरखानाकडे संभाजीला परत पाठवून देण्याचें बोलणें करण्याकरितां पाठविले. तेव्हां दिलेरखानाला, संभाजीला छत्रपतींकडे पाठवून देणें हाच मार्ग बरा असें वाटून, त्यानें संभाजीला छत्रपतींकडे पाठवून दिलें.

## छत्रपतींचा संभाजीला उपदेश.

छत्रपतींचें संभाजीवर फार प्रेम होतें, हें मागें सांगितलेंच आहे. त्यांना संभाजी आपला दुसरा जीव वाटे. त्यांनीं संभाजीला नेहमीं जवळ बोलावून, जगांतील सर्व राजांनीं ज्याचा अनुकार करावा, असा बोध करावा. पण संभाजी दुर्गुणवश झाला असल्यामुळें छत्रपतींच्या हितकारक बोधाचा कांहीं उपयोग होत नसे. तरी छत्रपतींचें पित्याचें हृदय, त्यांना वाटे कीं, आज नाहीं उद्यां, पण आपण करितों या बोधाचा शंभूवर परिणाम होईल. संभाजी बेफाम असे. एकादी

गोष्ट करायची असें त्याच्या मनानें घेतलें ह्मणजे प्रत्यक्ष यम आला तरी त्याला तो भिणारा नव्हता. पण छत्रपतींच्या समोर तो अगदीं गोगलगाय होई. छत्रपती रागावले असतां बोलणें लांबच राहिलें, तर त्याच्यानें वर दृष्टि करून पाहवत नसे. सारांश छत्रपतींच्या समोर तो विनयी असे. आणि ह्मणूनच छत्रपतींना वारंवार वाटे कीं, आईवांचून वाढलेला असल्यामुळें शंभू हूड निपजला आहे, पण ही याची वृत्ति अशीच रहाणार नाहीं. सर्व भार याच्यावर पडला ह्मणजे या वृत्तींत फेर पडल्यावांचून रहाणार नाहीं. छत्रपतींना असें वाटे, तथापि शंभू खास सुधरेलच अशी त्यांची मनोदेवता खात्रीनें सांगत नसल्यामुळें, आपल्या मागें कसें होईल ही देह जाळणारी चिंता त्यांना खंगवीत होती. तरी प्रयत्न केल्याशिवाय त्यांच्यानें कसें रहावेल ? दिलेरखानाकडून संभाजीला आणल्यावर, त्यांनीं एके दिवशीं संभाजीला जवळ बोलाविलें. त्यांनीं ते व संभाजी यांच्यावांचून तिसरें मनुष्य तेथें बसूं दिलें नाहीं. छत्रपती अलौकिक धीराचे, दुःखांनीं व्यापून जाणें त्यांना माहीत नाहीं, पण हा शंभू आपण मिळविलेलें नांव व सत्ता घालवील, व यवन फिरून महाराष्ट्रांत आपला अंमल बसवून लोकांचा छल करतील; या गोष्टी त्यांच्या मनांत येऊन ते खिन्न झाले ! ते संभाजीला ह्मणाले,—शंभू तूं आतां कांहीं लहान नाहींस. स्वार्थ कळूं लागावा इतका तूं मोठा झाला आहेस. ज्या परकीय यवनांना देशांतून घालवून देण्याकरितां मी तहान, भूक, थंडी, ऊन, पाऊस, विश्रां-

ति या कशाचाही विचार न करितां हाडांचीं काडें केलीं, ज्यांचा आपला धर्म बुडविण्याविषयींचा निश्चय, त्यांना जाऊन मिळतांना तुला मुळीं देखील शरम वाटली नाहीं का ? आपला बाप ज्यांच्या बरोबर तीस वर्षें एकसारखा लढतो आहे, त्यांच्याकडे आपण गेलों असतां ते दगा केल्यावांचून रहाणार नाहींत, अशी चुकून देखील तुझ्या मनांत कल्पना आली नाहीं का ? तुझ्या आईचा शहाणपणा आजून कैक आठवतात, त्या तिच्या पोटीं तूं असा मनुष्यरूपी बैल कसा निर्माण झालास ? ! यापेक्षां मुळींच जन्मास आला नसतास, किंवा जन्मास आल्याबरोबर मेला असतास, तर फार बरें झालें असतें ! मीं आपल्या वयाच्या वीस वर्षांपासून हातांत तलवार धरली. ऐषाराम, विषयोपभोग यांच्याकडे लक्ष दिलें नाहीं. लाह्या तर लाह्या, फुटाणे तर फुटाणे, कित्येक दिवस वनांतील कंदमुळें खाऊन राहिलों, कैक वेळां ज्यांचें दर्शन नको अशांच्या दाढ्या धरल्या, कित्येक वेळां जिवावर उदार होऊन रक्ताचे पाट वाहविणाऱ्या मुडद्यांचे ढीग पाडणाऱ्या भयंकर कत्तली केल्या, हजारों लोक मुसलमानांच्या तरवारींना बळी दिले व हें महाराष्ट्र राज्य स्थापन केलें, तें तुझ्या सारख्या बैलाच्या हातीं देण्याइतका मी वेडा असेन, असें तुला वाटतें का ? हें राज्य तुझ्या हातीं दिलें, तर आपल्या बापाला हें कमवायला अत्यंत कष्ट पडले आहेत याचा लवमात्र विचार न करितां, दुर्व्यसनी लोकांच्या नादीं लागून तूं चार महिन्यांत घालविशील. मालोजी सारख्या देवपुरुषाच्या कुलांत तुझ्या सारखा कुलांगार ज-

न्मास आला याचें मला राहून राहून आश्चर्य वाटतें ! त्या तुझ्या वंद्य पणजाची योग्यता जनकासारखी होतीरे ! त्याचें वर्तन किती शुचिर्भूत ! पापाचा विटाळ त्याला कधीं झाला नाहीं. तोच त्याच्या पासून चवथा पुरुष तूं केवळ कलीचा अवतार निपजलास, ज्या वेदोनाराय-ण ब्राह्मणांची व त्यांच्या साध्वी पत्न्यांची आपण स-द्भावानें पूजा करायची, त्यांचें पातिव्रत्य भ्रष्ट करण्या-ला नष्टा तूं तयार झालास ! त्या तुझ्या अपराधाबद्दल तुला देहान्त शिक्षाच करायची. परंतु पुत्रवध कसा करावा, हा विचार मनांत आल्यामुळें तुला जिवंत ठे-वला. तूं दिलेरखानाला जाऊन मिळालास हे त्याचे उपकार फेडलेस ह्मणायचे ! कर्मचांडाळा, तूं त्याच्या-कडे पळून जात असतांना, आकाशांतून तुजवर वीज पडून तूं जळून कसा नाहीं मेलास ! तुझ्या मृत्यूनें मला इतकें सुद्धां वाईट वाटलें नसतें. तुला आपला पुत्र ह्मणायला मला लज्जा उत्पन्न होते. द्वाड पोरांना ता-ळ्यावर आणण्याकरितां त्यांचे आईबाप त्यांच्या पा-ठीवर वेताच्या छड्या फोडतात, तसा तुला शुद्धीवर आणण्याकरितां तुझ्या पाठीचीं सालडीं काढण्याचे दिवस आतां राहिले नाहींत. तुला जितक्या मी उपदे-शाच्या गोष्टी सांगितल्या तितक्या जर एखाद्या जना-वराला सांगितल्या असत्या तर तें खचित शहाणें झालें असतें. शंभू मी राज्य कमविण्याकरितां अश्रांत श्रम केलें, पण त्यानीं माझ्या शरीराला थकवा आला नाहीं. परंतु तूं असा दुर्वृत्त निघालास या काळजीनें माझे सर्व अवयव शक्तिहीन झाले. माझ्या शरीरावर

वृद्धकळा आली. सत्पुत्र आपल्या मातापितरांची अ-ष्टौप्रहर सेवा करितात, तशी सेवा करण्याचें राहिलें, पण तुझ्या वर्तनांत चांगला फरक पडला असें तरी माझ्या या ह्मातारपणांत मला ऐकीव! राज्यव्यवस्थेचे धडे शिकविण्याचें, तुझ्यावर हळूंहळूं राज्यकारभार सोंपविण्याचें हें तुझें वय! परंतु उपयोग काय? तूं असा दुर्वृत्त निघाल्यामुळें तुला कैदच योग्य. पन्हाळ-गडावर तूं आतां कैदेंत रहावेस. तुझ्या वर्तनांत सुधारणा झाल्यावांचून व तसें माझ्या अनुभवास आल्या-वांचून तुझी कैदेंतून सुटका होईल असें तूं मनांत देखील आणूं नकोस.

## छत्रपतींचा दुसरा उपदेश.

छत्रपतींनीं, गेल्या प्रकरणांत संभाजीला जो उप-देश केला तो कडक शब्दांनीं केलेला आहे. कारण तो प्रसंगच तसा होता. याच सुमाराला त्यांचा भाऊ वेंकोजी याला उपदेशपर पत्र पाठविण्याचा छत्रपतींना प्रसंग आला. छत्रपतींनीं त्याच्यापासून जहागिरीचा व दौलतीचा निम्मा हिस्सा घेतल्यामुळें त्याला वाईट वाटून तो वैतागल्यासारखें करूं लागला. त्यानें आप-ल्या हिश्शाची व्यवस्था पहाण्याचें सोडलें इतकेंच नाहीं, तर तो उपास तापास करून आपल्या देहाला-ही शिणवूं लागला. हें वर्तमान छत्रपतींना कळल्यावर त्यांना फार वाईट वाटलें. त्यांनीं वेंकोजीला एक उप-देशपर पत्र लिहिलें. त्या पत्रांत त्यांनीं लिहिलें कीं, तूं जी वृत्ति धारण केली आहेस ती तुझ्या वयाला

अनुरूप नाहीं. करीन, घेईन अशी हिंमत मनुष्यानें धारण केली पाहिजे. ज्याच्या अंगीं हिंमत नाहीं तो मनुष्य कसला ? आपले वडील हिंमतवान् होते ह्मणून त्यांनीं यवनांच्या पदरीं राहून तलवार गाजवून, आपल्या बाहुबलाचें व बुद्धिचातुर्याचें तेज पाडून कर्नाटकांत जहागीर मिळविली. त्यांच्या अंगीं जर हिंमत नसती, धैर्य नसतें, तर त्यांना ही जहागीर मिळाली असती काय ? मीं महाराष्ट्रांत राज्य स्थापिलें आहे, तें तुझ्यासारखा वैताग घेतल्यानें मला स्थापितां आलें असतें काय ? हिंमत धरून यत्न केल्यावर मनुष्य काय मिळवूं शकणार नाहीं ? तूं जो वैताग घेतला आहेस त्याच्यापेक्षां आपल्या जहागिरीची योग्य व्यवस्था राखलीस तर तुला स्वार्थ व परमार्थ हे दोन्ही साधतां येतील. कैकांवर तुला उपकार करितां येईल. कित्येक लोक तुला दुवा देतील. पण तूं धारण केलेल्या वैतागानें असें होण्याचा मुळींच संभव नाहीं. त्यानें तुझ्या स्वतःच्या देहाला कष्ट होतील व तुझीं मुलेंमाणसें यांनाही कष्ट सोसण्याचा प्रसंग येईल. आणि त्या पातकाचा मालक मात्र तुला व्हावें लागेल. तूं आपल्या जहागिरीकडे दुर्लक्ष केलेंस तर ती उपटायला पुष्कळ चोर टपून बसले असतील. ते तिच्यावर मजा मारतील आणि तुझ्या मुलामाणसांना हातीं भिक्षापात्र घ्यावें लागेल. आपण रजपूत आहोंत हें ध्यानांत ठेव. बहिरागी होऊन भिक्षा मागायला लागायचें हा आपला धर्म नव्हे. हिंमत धरून तलवार गाजवायची, गोब्राह्मणांचें पालन करायचें हे आपले ध-

र्म आहेत. त्या आपल्या धर्मानें वाग. वडलाचें नांव वाढीव. आपल्या देशांत मुसलमानांची सत्ता अजून पुष्कळ ठिकाणीं आहे. सारांश तलवार गाजवायला तुला पुष्कळ जागा आहे. तुला शेवटचें माझें हेंच सांगणें आहे कीं, घेतलेला वैताग टाकून रजपुत कुलांत उत्पन्न झालेल्याला भूषणभूत होतील अशीं कृत्यें कर. माझें हें पत्र वाचून तूं आपला वैताग टाकलास असें मला ऐकूं दे. कळावें हें आशीर्वाद.

## छत्रपतींचें निधन.

छत्रपती थोरला पुत्र दुर्वृत्त निवाला यामुळें रायगडावर त्याच्या काळजींत असतां, त्यांना गुडघीचा आजार झाला. त्याच्यावर औषधोपचार चालले होते. परंतु त्यांनीं गुण न येतां, गुडघीच्या आजारांतच त्यांना ताप येऊं लागला. काळ तापच तो ! उजाडला दिवस ताप अधिकाधिक होऊं लागला ! महाराजांच्या शक्ति अधिकाधिक क्षीण होत चालल्या. चार दिवस झाले, ताप कमी नाहींच, उलट वाढत चालला ! त्यानें पदरच्या लहान थोर मंडळींना, यांतून आपला अन्नदाता, कोटींचा पालनवाला, गोब्राह्मणांची माय, महा पराक्रमी, चतुरांतला चतुर, चपलांतला चपल, बडा हिंमतवान्, राज्यव्यवहारनिपुण, उद्यांचें काम आज करणारा, दीनांचा दयाळु, शरणागतांचा रक्षणकर्ता, दुष्टांचा शास्ता, गुणांचा परीक्षक, धैर्याचा सागर व सद्धर्माचा मूर्तिमंत पुतळा अदृश्य होणार असें वाटून ते खिन्न झाले. जो तो चिंतातुर दिसूं लागला. राजलक्ष्मीच्या गाढप-

रिरंभानें नटलेल्या रायगडाची भुवनश्री कोमेजल्यासारखी भासूं लागली. आलेला ताप आपल्याला या लोकांतून घेऊन जाण्याकरितां आला आहे, असें छत्रपतींना पक्कें कळलें. त्यांनीं आपल्या प्रधानांना जवळ बोलावून सांगितलें,—माझा अवतार संपण्याची वेळ जवळ येऊन ठेपली. आतां फार तर दोन तीन दिवसांचा मी तुमचा सोबती आहें. माझ्या सर्व आशा परिपूर्ण झाल्या आहेत. शंभू नीट असता तर ठीक होतें. असो, इलाज नाहीं. त्याला गादीवर बसविलें तर राज्याला अपाय होतील. याकरितां राजारामाला गादीवर बसवून त्याच्या नांवानें तुह्मी सर्व एक विचारानें राज्य चालवा. यवनांचें आपल्याला पारिपत्य करावयाचें आहे, हिमालयाच्या पायथ्यापासून दक्षिणेस कन्याकुमारीपर्यंत त्यांच्याकडे एक बोटभर देखील जागा ठेवायची नाहीं हें प्रत्येकजण मनांत वागवा. आळस करूं नका. मिजास, ऐषआराम यांना वश होऊं नका. आपआपसांत वितुष्टें पाडूं नका, हातांतली तलवार खालीं ठेवूं नका. ह्मणजे यवनांना या आर्यावर्तांतून घालवून द्यायला फार दिवस लागणार नाहींत. ही गोष्ट शक्य व्हायला जें झालें पाहिजे होतें, तें ईश्वरानें माझ्या हातून केलें आहे. हे ईश्वराचे आपणां सर्वांवर थोर उपकार आहेत. त्याला विसरूं नका. धर्माचा बळकट अभिमान धरा ह्मणजे तो सर्वसाक्षी आपले मनोरथ पूर्ण केल्याशिवाय रहाणार नाहीं. हें इतकें सांगितल्यावर छत्रपतींच्यानें अधिक बोलवेना. तेव्हां त्यांनीं सर्वांस निरोप दिला, व ते आपल्या बिछान्यावर स्वस्थ पडले.

यानंतर तीन दिवसांनीं ह्मणजे ताप आल्यापासून सातव्या दिवशीं, या महाराष्ट्रांत उदय पावलेल्या ह्या प्रतापदिनकराचा अस्त झाला ! हे पुढचे तीन दिवस छत्रपतींनीं केवळ ईशचिंतनांत घालविले. व शके १६०२ रौद्रनाम संवत्सरे चैत्र शुद्ध १५ इ. स. १६८० एप्रिल तारीख ५ रोजीं ते हा जड देह ठेवून ईशस्वरूपीं लीन झाले. छत्रपतींच्या मृत्यूनें सर्व महाराष्ट्रभर जो हाहाःकार पसरला, त्याचें वर्णन करण्यास ही लेखणी समर्थ नाहीं. छत्रपती हा शिवाचा अंशावतार होता अशी पुष्कळांची समज होती. छत्रपति आजानुबाहु होते, म्हटल्याप्रमाणें अचाट कृत्यें करून ते दाखवीत, अवरंगजेबासारख्या महा पराक्रमी कर्दनकाळ दिल्लीच्या बादशहाच्या कारकिर्दीत त्यांनीं महाराष्ट्र राज्याची स्थापना केली, यां गोष्टींवरून ते अवतारी होते असा तत्कालीनांचा समज होणें स्वाभाविक होतें. छत्रपतींना सात बायका होत्या असें पुष्कळांचें ह्मणणें आहे. त्यांपैकीं पुतळाबाई सती गेली. छत्रपतींच्या कित्येक कृत्यांवरून परकीय इतिहासकारांनीं त्यांना अनुच्चारणीय विशेषणें दिलीं आहेत. परंतु ज्याला मोठें सत्कार्य करावयाचें असतें, त्याला लहान लहान अकार्यें करावीं लागतातच. परकीय इतिहासकार मत्सरवश होऊन छत्रपतींना योग्य जागा देण्याबद्दल कुरकूर करोत; पण पृथ्वीच्या पाठीवर जीं मानव रत्नें होऊन गेलीं त्यांच्या शिरोभागीं ज्याला जरूर जागा दिली पाहिजे असा पुरुष शिव छत्रपती हाच एक होय. जगाच्या इतिहासांत हानीबॉल, सीझर, अलेकझांडर, नेपो-

लियन व वाशिंग्टन हे गृहस्थ प्रसिद्ध आहेत. त्यांची व छत्रपतींची तुलना केली तर यदृच्छाभिज्ञ मनुष्य मग तो कोणत्याही देशांत जन्मलेला असो, छत्रपतींना सर्वांच्यावर नेऊन बसवील. असा अलौकिक पुरुष हिंदुस्थानांत व त्यांत आपल्या महाराष्ट्रांत उत्पन्न झाला, याबद्दल त्याचा आपल्याला विशेष अभिमान वाटला पाहिजे. छत्रपतींच्या अंगीं जो गुणसंघ होता तशा गुणसंघानें युक्त असा पुरुष सध्यांच्या काळीं निपजणें अशक्यच दिसतें. तथापि शिवचरित्रामृताचीं आह्मीं महाराष्ट्रीयांनीं पारायणें केल्यास सध्यासारखी मेषपात्र संतति पुढें निपजणार नाहीं असें मनोदेवता सांगते. लागलेल्या विनाशकारी झोंपेंतून आह्मी महाराष्ट्रीय जागें होऊन छत्रपतींचे उत्सव करूं लागलों, हा या ग्रंथकाराला सुयोग वाटत आहे. जगन्नियंत्यानें महाराष्ट्रीयांना शिवछत्रपतींच्या अंगच्या उत्तम गुणांचें अनुकरण करण्यास अधिकाधिक स्फूर्ति द्यावी हीच शेवटची त्याच्या विमलचरणांजवळ प्रार्थना आहे.



